






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २७७, एप्रिल - जून १९९६



● या अंकाची किंमत : ३० रुपये
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी) : १०० रुपये
आजीव सदस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.

---



---

● मुद्रक- प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. (दूरभाष : ४७५९६३)
● मुद्रण स्थळ : वालोद्यान प्रेस, पुणे - २.

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका



● पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखातील मते त्या त्या लेखकाची असतात. त्या मतांशी म. सा. परिषद सहमत असेलच असे नाही.

**सूचना**

● अभ्यासपूर्ण, संशोधनात्मक लेखांना पत्रिकेत आवर्जून स्थान देण्याचा संकल्प आहे. मात्र असे लेख पाठवण्यापूर्वी त्यांचा विषय, प्रतिपादनातील वेगळेपणा व अंदाजे शब्दसंख्या इत्यादी तपशील देणारे पत्र पाठवावे म्हणजे तो लेख पत्रिकेसाठी विचारात घेता येईल की नाही हे आधी कळवता येईल.

● आपल्या लेखाची एक प्रत आपल्याकडे ठेवावी. लेखावद्दलचा निर्णय एका महिन्यात कळवला जाईल. नापसंत लेख परत पाठवण्यात येणार नाही. त्यासाठी लेखावरोवर पोस्टेज पाठवू नये.

# संपादकीय .......................

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ९१ व्या वर्षातील पदार्पणाच्या वेळी हा अंक प्रसिद्ध होत आहे . परिषदेच्या नवतीचा कार्यक्रम भव्य प्रमाणात साजरा होणार आहे . त्याची तयारी चालू आहे . येत्या दशकात - म . सा .परिषदेचा सर्वांगीण विस्तार व विकास व्हावा या दृष्टीने विविध योजना हाती घेण्यात येणार आहेत . जनताजनार्दनाचा आणि साहित्यप्रेमी रसिकांचा भरघोस पाठिंवा परिषदेला मिळेल अशी आशा आहे .

९० व्या वर्धापन दिनाच्या निमित्ताने मराठीतील ज्येष्ठ कादंवरीकार श्री . श्री . ना . पेंडसे यांना परिषदेचा पुरस्कार प्रदान करण्यात येत आहे . १९४९ मध्ये त्यांची पहिली कादंवरी 'एल्गार' प्रसिद्ध झाली . पुढच्याच वर्षी 'हद्दपार' . त्यांची सर्वाधिक गाजलेली 'गारंवीचा वापू' ही कादंवरी १९५२ साली आली . तिने पेंडसे यांना मराठी साहित्यविश्वात मानाचे स्थान प्राप्त झाले . 'रथचक्र' (१९६२) ने वादळ उठवूनही साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळवला . 'लव्हाळी'(१९६६), 'ऑक्टोपस' (१९७२) यांनी प्रादेशिक कोकणातून वाहेर पडून मुंवईसारख्या महानगरीत स्थिरावू पाहणाऱ्या कनिष्ठ मध्यमवर्गीयांच्या अस्तित्वविषयक जाणिवांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला . परंतु 'तुंवाडचे खोत' (१९८७) द्वारे कोकणमधील खोत घराण्याच्या चार पिढ्यांची वृहत्‌गाथा त्यांनी हाताळली . टालस्टॉय डोस्टोवस्कीचा सतत उद्‌घोष करणाऱ्या पेंडसे यांच्या या कलाकृतीने अपेक्षाभंग केला . परंतु 'ती माझी ताकद नाही . निदान आकाराने तशी भव्य शिल्पे कादंवरीत उभी राहावीत , ती संधी आपणास तुंवाडचे खोतने दिली' असे त्यांनी नंतर नम्रभावाने म्हटले . त्यानंतर आलेल्या 'गारंवीची राधा' (१९९४) आणि ' एक होती आजी' (१९९५) यांनी कोकण - मुंवई यांचा सांधा जुळवण्याचा प्रयत्न केला . आपल्या निर्मितिप्रक्रियेचा वेध घेणारे लेखन ही त्यांनी केले . तसेच नव्या कादंवरीकारांशी मुक्त संवाद साधून साहित्यविषयक चिंतन प्रकट करण्याचीही उर्मी त्यांना स्वस्थ वसू देत नाही .

पेंडसे यांच्या कादंवऱ्यांचे रचनाकौशल्य , त्यातील प्रादेशिकता , जीवनदर्शन , व्यक्तिचित्रण , वास्तवाचे आकलन , मूल्यांची मूलभूत जाण आणि कौटुंविक संवंधातील ताणतणाव यांचे चित्रण इत्यादी दृष्टींनी मूल्यमापन करण्याचा प्रयत्न अनेक अभ्यासकांनी केला आहे . आणि अनेक परस्परविरोधी निष्कर्ष नोंदवले आहेत . डॉ . वांदिवडेकर यांनी 'र . वा . दिघे , गो . नी . दांडेकर , व्यंकटेश माडगूळकर यांच्या संदर्भातच पेंडसे यांच्या प्रादेशिकतेच्या स्वरूपाचे आणि वैशिष्ट्यांचे आकलन करावे लागेल' , असे म्हणून पेंडसे त्यात कमी पडतात असे नमूद केले आहे . उलट प्रा . तु . शं . कुलकर्णी प्रभृतींनी 'तुंवाडचे खोत' ला महाकाव्याच्या परिमाणात वघण्याची निकड प्रकट केली आहे . कुठल्याही लेखकाच्या वा कलाकृतीच्या संदर्भात अशी

वेगवेगळी मूल्यमापने होत राहणे हे सर्मीक्षेच्या जिवंतपणाचे लक्षण आहे. कलाकृतीच्या जिवंतपणाचेही ते गमक ठरते.

श्री. ना. पेंडसे यांनी कादंबरी हा प्रकारच मुख्यतः हाताळून मानन्यानं ४५ वर्षे लेखन चालू ठेवले, वेगवेगळे विषय व आकृतिबंध हाताळून आपली प्रयोगशीलता कसोटीला लावली. त्यांच्या या एकनिष्ठ प्रदीर्घ वाङ्मयीन कर्तृत्वाचा गौरव करण्यात महाराष्ट्र साहित्य परिषदेला धन्यता वाटते.

या पुरस्काराच्या स्वीकाराच्या निमित्ताने त्यांचे मनोगत या अंकात आम्ही समाविष्ट केले आहे. त्यांनी उपस्थित केलेले प्रश्न हे आपल्याला सर्वांनाच पडलेले प्रश्न आहेत, आणि त्यांची उत्तरे ठामपणे देण्याइतका आत्मविश्वास व निर्धार आजतरी क्वचितच आपण दाखवू शकतो. मराठी व इतर प्रादेशिक भाषांचे अस्तित्व प्रसारमाध्यमातील इंग्रजी - हिंदीच्या वाढत्या महत्त्वामुळे धोक्यात येत आहे, आणि जीवननिर्वाहाच्या स्पर्धेत जर टिकायचे असेल तर इंग्रजी अपरिहार्य अशी आजची आपली मानसिकता आहे. साहित्यक्षेत्रातही जर आपल्याला काही महत्त्वाकांक्षा असेल तर इंग्रजीचा आधार घेण्यावाचून गत्यंतर नाही. सलमान रश्दी, अमिताव घोष, उपमन्यू चॅटर्जी, शोभा डे, विक्रम सेठ, भारती मेहता वगैरे भारतीयांना मिळालेले यश, वैभव आणि मानसन्मान यांची तुलना केल्यास प्रादेशिक भाषांत लेखन करणाऱ्या चांगल्या प्रतिभावंत लेखकांचीही कशी कुचंबणा होते हे लक्षात येईल. कलाकृती निर्मितीचा आनंद हा तिला मिळणाऱ्या वाचकवर्गाच्या व रसिकांच्या क्रियाशील प्रतिसादामुळे वाढत असतो. मराठी ग्रंथव्यवहाराच्या विशिष्ट चाकोरीतील व्यवहारामुळे त्यातील भाग्याचा आलेख फारसा वरची उंची गाठत नाही हे कटू असले तरी सत्य आहे.

**टपाल तिकिटांचा तुटवडा -**

पत्रिकेचा मागील अंक हा १ फेब्रुवारी रोजी प्रसिद्ध व्हावा अशी अपेक्षा होती. प्रत्यक्षात तो काही अपरिहार्य कारणामुळे वाचकांच्या हाती पडण्यास विलंब लागला. पोस्टात पन्नास पैशाची तिकिटे नसल्यामुळे अंक तयार झाल्यावरही तीन आठवडे तो पोस्टात पडू शकला नाही. प्रत्यक्ष वितरणातही सध्या टपालखात्याची कार्यक्षमता पूर्वीसारखी उरलेली नाही. त्यामुळे वाचकांची जी गैरसोय होते त्याबद्दल आम्ही दिलगीर आहो. पुढचे अंक वेळेवर वाचकांच्या हाती पडावे यासाठी प्रयत्नशील राहू.

**आळंदीचे साहित्य संमेलन -**

आळंदी येथे ६९ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन थाटात साजरे झाले. अध्यक्षपदावरून शांता शेळके यांनी अभिजात आणि लोकसाहित्याच्या संपन्न वाग्शाची रसग्राही सौंदर्ययात्रा घडवून आणली. उद्घाटक लता मंगेशकर यांनी उत्स्फूर्त विचार मांडून मराठी साहित्य व भाषा याबद्दलची आपली तळमळ प्रकट केली. ज्ञानपीठ पुरस्काराचे मानकरी सुभाष मुखोपाध्याय, नरेश मेहता, सीताकांत महापात्र यांच्या उपस्थितीनेही मराठी रसिकांना सुखविले. ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीच्या सप्तशताब्दीनिमित्तानं मराठी व भारतीय साहित्यिकांनी ज्ञानदेवांच्या समाधीपुढे आपली कृतज्ञता प्रकट केली. मराठीतील ह्या आद्यकालीन ग्रंथाने सातशे वर्षे जनमानसावर आपला प्रभाव अविरत टिकवून धरला आहे. आणि आजही हा ग्रंथ ताज्या समकालीन कृतीप्रमाणे नवनवोन्मेषशाली अर्थ भाव प्रकट करीत

वाचकरसिकांना मुग्ध करीत आहे . काव्य व तत्त्वज्ञान यांची अनुपम एकात्मता साधलेला हा ग्रंथराज साहित्यावरील निष्ठा व विश्वास दृढ करणारा एक अलौकिक चमत्कार आहे . त्यामुळे त्याच्या अभिवादनाची ही संधी साधण्यात निश्चितच औचित्य होते .

संमेलनात भरगच्च कार्यक्रम होते . आणि उपस्थितीही अभूतपूर्व होती . संमेलनाचे आयोजक प्रा . विश्वनाथ कराड यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी अथक परिश्रम घेऊन हे संमेलन पार पाडले . अफाट गर्दीमुळे काही गैरसोय होणे , काही व्यक्तींची नाराजी राहणे हे सर्व टाळता येतेच असे नाही . महामंडळाचे अशा संमेलनावरचे नियंत्रणही किती राहते वा राहावे याबद्दलही त्यामुळे संभ्रम निर्माण होतो . वृत्तपत्रातून उलटसुलट मते त्यावर आली आहेत . तशी ती दरवेळी येतात . साहित्य संमेलनाच्या निमित्ताने मराठी रसिकांना हजारोंच्या संख्येने एकत्र यावेसे वाटते , ही गोष्ट सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे हे लक्षात घेऊन , या संमेलनांना लोकाभिमुख रूप देणे ही काळाची गरज आहे . महामंडळ , साहित्य संस्था आणि आयोजक - निमंत्रक यांनी त्या दृष्टीने कार्यक्रमांची आखणी करायला हवी . ग्रंथव्यवहाराचे विराट दर्शनही त्यात घडावे , लेखक - प्रकाशक , लेखक-रसिक यांचा सुसंवाद साधावा , रसिकांच्या रसिकेतला नवनवे पैलू फुटावे , ग्रंथसत्तेचे वैभव प्रस्थापित व्हावे अशा प्रकारे या संमेलनांना वळण देणे इष्ट व समयोचित ठरेल . संमेलनासाठी होणाऱ्या वीस पंचवीस लाख रुपये खर्चाबद्दल तक्रार करण्याचेही आपण आता थांबवले पाहिजे . एका क्रिकेट मॅचसाठी कोट्यवधी रुपये आज सहजपणे खर्च होतात . साहित्यक्षेत्रातील अशा संस्मरणीय उत्सव - समारंभासाठी काही लाखांचा खर्च म्हणजे त्यापुढे काहीच नव्हे . तामिळ , तेलगूभाषकांची जागतिक संमेलने होतात, तेव्हा तेथील राज्य सरकारांच्या खजिन्यातून कोट्यवधी रुपये त्यासाठी दिले जातात . मराठी भाषेच्या या उत्सवासाठी मग खळखळ का करावी ? रसिकांनी , साहित्यिकांनी वारकऱ्याच्या भूमिकेतून अशा संमेलनांना हजेरी लावावी , अशीही विनंती करावीशी वाटते . मोठ्या प्रमाणावर कार्यक्रमांचे आयोजन करताना अनेक त्रुटी राहून जातात . त्या राहू नयेत म्हणून महामंडळाने एक ‘ मॅन्युअल ’ तयार करण्याची गरज आहे .

पुढचे संमेलन अहमदनगर येथे होण्याचे ठरले आहे . त्याचे मुख्य सूत्रधार माजी खासदार यशवंतराव गडाख हे असून , त्यांच्या संघटन कौशल्यामुळे हे संमेलनही अभिनव ठरावे असे वाटते .

**आमदार रामदास फुटाणे -**

महाराष्ट्र विधानपरिषदेत म . सा . परिषदेचे उपाध्यक्ष व ख्यातनाम वात्रटिकाकार रामदास फुटाणे हे निवडून आले आहेत . साहित्य व कलाक्षेत्रविषयक समस्यांची त्यांना चांगली जाण आहे . आपले प्रश्न ते शासनदरबारी प्रभावीपणे मांडतील अशी खात्री वाटते . त्यांचे अभिनंदन

**खासदार नारायण आठवले -**

मुंबईतून शिवसेनेचे उमेदवार म्हणून सुप्रसिद्ध पत्रकार व साहित्यिक नारायण आठवले हे लोकसभेसाठी उभे राहिले , आणि चांगल्या मतांनी निवडून आले . परखड व सडेतोड मतप्रदर्शन करण्याबाबत आठवले यांची ख्याती आहे . खासदारकीची कारकीर्द त्यांच्या कर्तृत्वाला विशाल क्षेत्र मिळवून देईल . त्यांचे अभिनंदन .

**श्रेयस ग्रंथयोजना -**

पॉप्युलर प्रकाशनने ' श्रेयस ग्रंथ योजने ' द्वारे दुर्मिळ मराठी ग्रंथांच्या संपूर्ण आवृत्त्या काढण्याचे ठरवून , त्याप्रमाणे संपूर्ण स्मृतिचित्रे (लक्ष्मीबाई टिळक) , माझा नाटकी संसार (मामा वरेरकर) , ख्रिस्तपुराण (फादर स्टिफन्स) , लोकहितवादीकृत निबंधसंग्रह ही पुस्तके प्रसिद्ध केली आहेत . समग्र दिवाकर , समग्र केशवसुत , समग्र बालकवी , डॉ . आनंदीबाई जोशी यांचे चरित्र वगैरे पुस्तके पुढे येणार आहेत . आतापर्यंत निघालेली पुस्तके साक्षेपी संपादनाची साक्ष देणारी आहेत . पृष्ठांच्या मानाने या पुस्तकांच्या किंमतीही माफक आहेत . हा अत्यंत उपयुक्त असा प्रकल्प हाती घेतल्याबद्दल पॉप्युलर प्रकाशनचे रामदास भटकळ हे धन्यवादास पात्र आहेत . ग्रंथालये , महाविद्यालये यांनी या योजनेला प्रतिसाद देणे आवश्यक आहे .

मराठी प्रकाशन क्षेत्रात अशा घटना या नवे चैतन्य आणणाऱ्या ठरतील .

**मराठी मासिके -**

मराठीतील मासिकांची संख्या गेल्या काही वर्षात घटत चालली आहे . अनेक जुनी मासिके बंद पडली आहेत . उरलेली कशीबशी वाटचाल करीत आहेत . अशा वेळी ' किर्लोस्कर ' व ' स्त्री ' यांना नवे कालोचित रूप देण्याचे आव्हान ह . मो . मराठे यांनी स्वीकारले आहे , तर ' तिसरी चांदणी ' या गाजलेल्या कादंबरीचे लेखक भानू काळे यांनी ' अंतर्नाद ' हे मासिक सुरू करून त्यात उत्तम वाङ्मयीन लेखन देण्याचे ठरवले आहे . जाहिरातींमागे न लागता , निव्वळ कसदार लेखनावर मासिकाचा आर्थिक व्यवहार बसवण्याचा त्यांचा मनोदय आहे . त्यांना या प्रयत्नात यश येवो .

' महाराष्ट्र टाइम्स ' च्या संपादकपदावरून श्री . गोविंद तळवलकर हे निवृत्त झाले असून कुमार केतकर यांनी संपादकपदाची सूत्रे स्वीकारली आहेत . तळवलकरांच्या अग्रलेखांनी दबदबा निर्माण केला . त्यांचा व्यासंग व अभ्यास स्तिमित करणारा होता . महाराष्ट्र टाइम्सने आरंभापासूनच साहित्याला प्राधान्य व महत्त्व देऊन आपली छाप पाडली . तळवलकर यांच्या कारकीर्दीतही महाराष्ट्र टाइम्सने ही आघाडी उत्तम सांभाळली . निवृत्तीनंतरही त्यांचे लेखनवाचन जोमात होत राहावे ही इच्छा . नवे संपादक कुमार केतकर यांनाही शुभेच्छा .

**शंकर सारडा**
संपादक , महाराष्ट्र साहित्य पत्रिका

०००



अनुक्रमणिका

## म. सा. प. पुरस्कार १९९६

१. हरि नारायण आपटे पारितोषिक (कादंबरी) (रु. १०१/-)
'दशक्रिया'- बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद

२. वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) (रु. १,०००/-)
'दु:खाचे श्वापद'- रंगनाथ पठारे, शब्दालय, श्रीरामपूर

३. ह. स. गोखले पारितोषिक (कविता) (रु. ३००/-)
'लाटांच्या आसपास'- प्रियदर्शन पोतदार, मौज प्रकाशन, मुंबई

४. आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा) (रु. १,०००/)
'आगराळ'- चंद्रकुमार नलगे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे

५. नी. स. गोखले पारितोषिक (कथा) (रु. ३००/-)
'चांदणफुला' - सुमेध वडावाला (रिसबूड), मेहता, पुणे

६. गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक (संपादित) (रु. १००/-)
'मिथकवाणी'- उषा बंबावाले, सुमित्रा भावे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे

७. अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट प्रकाशन) (रु. ३००/-)
'अंगतपंगत'- प्रकाशक ल. गो. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन, मुंबई

८. ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा) (रु. ५००/-)
'भावपेशी'- अरुण गद्रे, देशमुख आणि कंपनी, पुणे

९. वासुदेव धोंडो आणि भागीरथीबाई दीक्षित (धार्मिक) (रु. १००१/-)
'सिक्ख गुरुचरित्र : शोध आणि बोध'- स्नेहल प्रकाशन, पुणे

१०. तुळशीराम वाघ पारितोषिक (संतवाङ्मय) (रु. २५०/-)
'ज्ञानेश्वरांचा अलौकिकतावाद'- श्यामला मुजुमदार,
मनोहर कथा प्रकाशन, नागपूर

११. सुशील प्रधान पारितोषिक (बालवाङ्मय) (रु. २००/-)
'पक्ष्यांची दुनिया'- रमेश महाले, साकेत प्रकाशन, औरंगाबाद

१२. विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमारवाङ्मय) (रु. १००/-)
'गावमोहर'- अरुण जाखडे, अभिनुजा प्रकाशन, पुणे

१३. म. वि. गोखले पारितोषिक (नाट्यसमीक्षा) (रु. ७५०/-)
'मराठी नाट्यपरंपरा : शोध आणि आस्वाद'- तारा भवाळकर,
मेहता, पुणे

१४. रा. ना. नातू पारितोषिक इतिहासविषयक (लेखन) (रु. ७५०/-)
'महाभारताचे वरदान'- श्री. र. भिडे, राजहंस प्रकाशन, पुणे

१५. श्री. शा. हणमंते पारितोषिक (कोश व संदर्भ वाङ्मय) (३५०/-)
'सूचींची सूची'- सु. रा. चुनेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे

### ललितेतर वैचारिक

१६. सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक (रु. १,०००/-)
'जन मन' अरुण टिकेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे

१७. लोकहितवादी देशमुख पारितोषिक (७५०/-)
'नारायण मेघाजी लोखंडे'- मनोहर कदम,
महात्मा फुले समता प्रतिष्ठान प्रकाशन, पुणे

१८. गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक (एक वर्षाआड) (रु. ५००/-)

'घाणेरीची फुले' - रामनाथ चव्हाण, उत्कर्ष प्रकाशन, पुणे

१९. गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक (एक वर्षाआड)(रु.४००/-)
'पारंपरिक मराठी तमाशा आणि आधुनिक वगनाट्य' - विश्वनाथ शिंदे, प्रतिमा प्रकाशन, पुणे.

२०. शि. म. परांजपे पारितोषिक (वैचारिक) (रु. २५०/-)
'शोधता शोधता' - य. दि. फडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे

२१. ना. गो. चापेकर पारितोषिक (वैचारिक) (रु.२५०/-)
'आंबेडकरी चळवळ : परिवर्तनाचे संदर्भ' - अविनाश डोळस, सुगावा प्रकाशन, पुणे

२२. विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक (रु. १५०/-)
'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन' - मिलिंद मालशे, लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई.

२३. वासंती काळे पारितोषिक (हस्तकला व कलाविषयक) (रु.५००/-)
हस्तकला व्यवसाय छंद (संच) - अ. दि. कोकड, सन पब्लिकेशन्स, पुणे

२४. अभिजात ग्रंथ पारितोषिक (सामाजिकशास्त्रे) (रु.५,०००/-)
'काश्मिर : एक शापित नंदनवन' - शेषराव मोरे, प्रकाशन, पुणे

२५. वि. मो. महाजनी पुरस्कार (कोश कार्यासाठी) (रु.७५१/-)
प्रा. भा. म. गोरे

**पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम पाहिले**
डॉ. शशिकांत देशपांडे, सौ. भारती पांडे, सौ. हेमा लेले, डॉ. निशिकांत श्रोत्री, श्री. अनिल किर्णाकर, डॉ. निर्मला मोने, डॉ. कल्याणी हर्डीकर, डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, डॉ. नीलिमा गुंडी., डॉ. म. वि. गोखले, डॉ. म. श्री. माटे, डॉ. कल्याण काळे, डॉ. रमेश धोंगडे, श्री. अनिल जोशी, श्री. राजा मंगळवेढेकर, श्री. शं. रा. देवळे, श्री. रविमुकुल, सौ. मेधा राजहंस, श्री. वि. स. वाळिंबे, श्री. म. वि. सोवनी, श्री. हरी नरके, डॉ. मनीषा दीक्षित, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. वीणा देव, डॉ. अश्विनी धोंगडे, श्री. राजा फडणीस, श्री. स. मा. गर्गे, डॉ. गं. ना. जोगळेकर.


## महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वृत्तपत्र नोंदणी कायद्यानुसार (नमुना ४, नियम ८) द्यावयाची माहिती

**प्रसिद्धीचे ठिकाण** - महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे- ३०
**प्रसिद्धीचा काल** - त्रैमासिक
**मुद्रक आणि प्रकाशक** - राजा फडणीस
**पत्ता** - महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०
**राष्ट्रीयत्व** - भारतीय
**संपादक** - शंकर सारडा
**पत्ता** - महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०
**राष्ट्रीयत्व** - भारतीय
**नियतकालिकाची मालकी** - महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता - पुणे - ३०

मी असे जाहीर करतो की वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे बरोबर आहे.

राजा फडणीस
प्रकाशक

१।५।९६












## महाराष्ट्र साहित्य परिषद
## ९० वर्षांतील वाटचाल : लक्षणीय टप्पे

१९०६ : पुणे येथे चौथ्या ग्रंथकार संमेलनात रविवार दि . २७ मे रोजी परिषद स्थापन झाल्याची न . चिं . केळकर यांचेकडून घोषणा . स्थळ - सदाशिव पेठेतील नागनाथ पारानजिकचा मळेकर वाडा .

१९०९: परिषदेचे पहिले महत्त्वाचे प्रकाशन- 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने- खंड दहावा (वि . का . राजवाडे) वाईकर वैद्य यांच्या संग्रहातील उत्तर पेशवाईतील ६६५ पत्रांचा संग्रह १९१२: अकोला (विदर्भ) येथे हरिभाऊ आपटे यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या आठव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात ३० ऑक्टोबर रोजी संस्थेची पहिली घटना संमत आणि पहिले कार्यकारी मंडळ अस्तित्वात, या कामी पहिले चिटणीस वा.गो. आपटे आणि स्वागताध्यक्ष वि . मो . महाजनि यांचे विशेष यत्न .

१९१३: परिषदेची कचेरी मुंबई येथे फणसवाडीत 'विविधज्ञानविस्तार' च्या कार्यालयात 'विस्ताराला जोडून महाराष्ट्र साहित्य पत्रिका हे संस्थेचे नियतकालिक मुंबई येथून प्रसिद्ध होऊ लागले . (मे १९२५ पर्यंत)

१९१७: परिषदेच्या स्थैर्यासाठी इंदूरच्या दहाव्या संमेलनात श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर यांचेकडून दहा हजार रु . ची देणगी .

१९१८: १३ डिसेंबर रोजी परिषदेचे ट्रस्टडीड (निधिपत्र) केले गेले . डॉ . सर भालचंद्र भाटवडेकर आणि रा .ब .दा .ग . पाध्ये हे दोघे विश्वस्त .

१९२७: १८६० च्या २१ व्या कायद्यानुसार १७ ऑगस्ट रोजी संस्थेची रीतसर नोंदणी (रजिस्ट्रेशन) क्र ४१९ .

१९२८: चैत्र शु . प्रतिपदेपासून (२२ मार्च) म .सा . पत्रिका हे संस्थेचे त्रैमासिक मुखपत्र मुंबईहून स्वतंत्रपणे प्रसिद्ध होऊ लागले . छपाई आर्यसंस्कृती आणि आर्यभूषण मुद्रणालय (पुणे) येथे . पहिले संपादक आणि प्रकाशक ना . गो . चापेकर .

१९२९: वेळगाव संमेलनात शुद्धलेखनाचे नवे नियम तयार करण्यासाठी ठराव आणि समिती नियुक्त . पुढल्या १९३० च्या मडगाव संमेलनात नियमांना मान्यता .

१९३३: परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यात . काही काळ कृ .पां . कुलकर्णी यांचे निवासस्थानी , नंतर आर्यसंस्कृती मुद्रणालयानजिक (टिळक रस्ता) भागवत बंगल्यात .

१९३५: परिषदेच्या इमारतीसाठी श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी (औंध) यांनी वार्षिक नाममात्र पंधरा रुपये भाड्याने ९९९ वर्षांच्या भाडेपट्टीने टिळक रस्त्यावर जागा देऊ केली . २८ ऑक्टोबर कार्तिक शुद्धप्रतिपदेला सायंकाळी दा .ग .पाध्ये (विश्वस्त) यांच्या हस्ते संस्थेच्या छोट्या इमारतीची सभारंभपूर्वक कोनशिला बसविण्यात आली .

१९३६: जागेबाबत परिषद आणि पंतप्रतिनिधी यांच्यात २४ मे रोजी करार . त्याची रीतसर नोंदणी ६ जुलैला . डिसेंबर अखेर संस्थेच्या वतीने प्रथमच मराठी व्याकरण परिषद

१९३७: ७ फेब्रुवारी रोजी परिषदेच्या दोन गोलाकार खोल्यांच्या इमारतीचे श्रीमंत बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर यांच्या हस्ते उद्घाटन . १० एप्रिलला ज्ञानकोशकार केतकर यांचे निधन . परिषदेतर्फे लकडी पुलाच्या पश्चिमेकडील ठोसरबागेत त्यांचा ख्रिस्ती पद्धतीने अंत्यविधी .

१९३८: संस्थेतर्फे मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अभ्यासाला प्रोत्साहन देण्याच्या हेतूने साहित्यप्राज्ञ आणि साहित्यविशारद या दोन परीक्षा सुरू .

१९४०: शास्त्रीय परिभाषा मंडळाची परिषदेकडून स्थापना . पाच सभासद , निमंत्रक त्र्यं .गो . ढवळे .

१९४१: कवी माधव ज्युलियन (मा . त्र्यं . पटवर्धन) यांच्या स्मरणार्थ स्थापन झालेल्या स्मारक समितीतर्फे संस्थेच्या ' माधवराव पटवर्धन सभागृहा 'चे उद्घाटन . सभागृह उभारणीत वि . द . घाटे आणि रा . सा . र . लु . जोशी यांचे विशेष यत्न .

१९४३: परिषदेचा आणि साहित्य संमेलनाचा द . वा . पोतदारकृत १९४२ पर्यंतचा इतिहास २ जूनला प्रकाशित . प्राज्ञ-विशारद परीक्षांच्या जोडीला प्रथमा आणि प्रवेश परीक्षा सुरू .

१९४६: परिषदेच्या वतीने भरलेल्या बेळगावच्या तिसाव्या संमेलनात (अध्यक्ष- ग . त्र्यं . माडखोलकर) ' संयुक्त महाराष्ट्र समिती ' (अध्यक्ष पोतदार) नेमली जाऊन चळवळीस आरंभ .

१९४९: कार्याध्यक्ष श्री . म . माटे यांच्या प्रयत्नामुळे ' वा . गो . आपटे संदर्भग्रंथालया 'ची स्थापना . त्यासाठी दहा हजार रु . ची देणगी .

१९५०: संस्थेच्या पूर्वेकडील पादचारी मार्गाला लागून असणारी ३८६ . २५ चौ . फूट क्षेत्रफळाची जागा (पट्टी) महापालिकेकडून अल्प किंमतीत प्राप्त .

१९५१: माटे यांच्या प्रयत्नाने निबंधमालाकार चिपळूणकर सभागृहाची उभारणी आणि १९ मे रोजी केंद्रीय मंत्री न . वि . गाडगीळ यांच्या हस्ते उद्घाटन . या सभागृहात नंतर आपटे संदर्भ ग्रंथालय ' नेण्यात आले .

१९५७: मुंबई राज्य शिक्षणखात्याकडून ३० जानेवारीच्या पत्रान्वये परिषदेला ' संशोधन आणि सांस्कृतिक संस्था ' म्हणून मान्यता .

१९६१: वर्षारंभी महाराष्ट्र साहित्य परिषद , विदर्भ साहित्य संघ , मराठवाडा साहित्य परिषद , आणि मुंबई मराठी साहित्य संघ या महाराष्ट्रातील चार प्रमुख साहित्यसंस्थांनी ' मराठी साहित्य महामंडळ ' नावाची केंद्रीय प्रातिनिधिक संस्था स्थापन केली . याबाबतीत १९५१ च्या कारवार संमेलनापासून परिषदेचे यत्न महामंडळाची पहिली सभा पुणे येथे परिषदेच्या वास्तूतच भरली . (१२ फेब्रुवारी १९६१)

१९६३: १० एप्रिलला सकाळी एरंडवणा येथील कमला नेहरूउद्यानात ज्ञानकोशकार केतकर यांच्या नव्या स्मारकाची उभारणी . याप्रसंगी शीलवती केतकर , महापौर बाबूराव जगताप , श्री . के . क्षीरसागर इ . उपस्थित . (१९६१ जुलैच्या पानशेत महापुरात लक्डी

पुलानजिकचे मूळ चौथरावजा स्मारक वाहून गेले होते)

१९६४: मडगाव (गोवा) येथे परिषदेतर्फे अभूतपूर्व गर्दीचे भरलेले अखेरचे ४५ वे संमेलन. अध्यक्ष वि. वा. शिरवाडकर, स्वागताध्यक्ष मुख्यमंत्री दयानंद बांदोडकर. याच वर्षात १५ ऑगस्टला ना. गो. चापेकर यांच्या हस्ते न. वि. गाडगीळ यांनी मिळवलेल्या देणग्यांमुळे संस्थेच्या चार खोल्यांच्या अतिथिभवनाची उभारणी झाली.

१९६५: मराठी वाङ्मयाच्या सप्तखंडात्मक इतिहास योजनेतील चौथ्या खंडाचे (१८०१-१८७४ संपादक रा. श्री. जोग) तर्कतीर्थ जोशी यांच्या हस्ते प्रकाशन.

१९६७: संस्थेच्या कार्यक्षेत्रात पुणे येथे पहिले विभागीय संमेलन. अध्यक्ष - डॉ. शं. गो. तुळपुळे : स्थळ स.प.महाविद्यालय

१९७०: २८ व २९ जानेवारी रोजी बालगंधर्व रंगमंदिरात संस्थेच्या हीरकमहोत्सव उद्घाटक : केंद्रीय गृहमंत्री मा. यशवंतराव चव्हाण (वास्तविक हा उत्सव १९६७ मध्ये साजरा व्हायचा. काही अडचणींमुळे तो लांबला.)

याच वर्षी नोव्हेंबर मध्ये महाबळेश्वर येथे कवी बा. भ. बोरकर यांच्या अध्यक्षतेखाली परिषदेचे दुसरे विभागीय सा. संमेलन. उद्घाटक. बॅ. नाथ पै. स्वागताध्यक्ष - लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्याध्यक्ष - शंकर सारडा.

१९७२: परिषदेतर्फे कल्याण येथे एप्रिलमध्ये तिसरे विभागीय संमेलन. अध्यक्ष रणजित देसाई. उद्घाटक : के. अहंमद अब्बास.

१९७३: संस्थेतर्फे रविकिरण मंडळाचा सुवर्णमहोत्सव. घाटे, यशवंत, रानडे इ. चा सत्कार.

१९७४: मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३,५ आणि ४ चा दुसरी आवृत्ती यांचे ६ एप्रिलला दुपारी राजभवनावर पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हस्ते प्रकाशन. तिन्ही खंडांचे संपादक रा. श्री. जोग खंडाच्या प्रकाशनासाठी रा. ज. देशमुख यांचे विशेष यत्न.

१९७६: आक्टोबर महिन्यात शारदीय व्याख्यानमालेचा नवा उपक्रम सुरू. 'जुने मौलिक ग्रंथ' या विषयावर नऊ दिवस अभ्यासकांची व्याख्याने, उत्कृष्ट तीन दिवाळी अंकांना का. र. मित्र. रा. र. गोरमकर आणि शं.वा.किर्लोस्कर यांचे नावे पुरस्कार देण्यास आरंभ. याच वर्षी मोडीलिपी वर्गाचे आयोजन.

१९७७: वर्षअखेर पंतप्रधान मोरारजी देसाई यांची परिषदेला भेट आणि निवडक उपस्थित साहित्यिकांबरोबर गप्पागोष्टी.

१९७९: २७ आणि २८ ऑक्टोबरला कार्ला हॉलिडे कॅम्पमध्ये परिषदेतर्फे पहिली ग्रंथव्यवहार परिषद. अध्यक्ष : तर्कतीर्थ जोशी, प्रमुख पाहुणे : गं. वा. सरदार. प्रकाशक, मुद्रक यांचा सहभाग.

१९८०: ठाणे येथे नोव्हेंबरमध्ये शाखेतर्फे दुसरी ग्रंथव्यवहार परिषद.

१९८१: २७ व २८ मे रोजी टिळक स्मारक मंदिरात परिषदेचा अमृत महोत्सव साजरा. हस्ते नभोवाणीमंत्री ना. वसंत साठे. प्रमुख पाहुणे तर्कतीर्थ जोशी. या उत्सवाच्या निमित्ताने सर्वश्री बाबा आमटे, माधवराव बागल, वि.अं. कानोले, सेतुमाधवराव पगडी, विश्राम बेडेकर, सोपानदेव चौधरी, कवी अज्ञातवासी (दि. गं. केळकर), शं. रा. दाते, ग ह.

खरे , महादेवशास्त्री जोशी , आणि ह .वि .मोटे या विविध क्षेत्रातील कर्तबगार व्यक्तींना संस्थेचे सन्माननीय आजीव सभासद करून घेण्यात आले .

ऑक्टोबरमध्ये वणी (यवतमाळ) येथे तिसरी ग्रंथव्यवहार परिषद उद्‌घाटक कवी अनिल , अध्यक्ष नरहर कुरुंदकर

१९८३: मार्च अखेरच्या विशेष साधारण सभेत महत्त्वाच्या घटना दुरुस्त्या एप्रिलपासून त्यांची कार्यवाही (संदर्भ पत्रिका अंक २२३) महाराष्ट्र राज्य सा . संस्कृती मंडळाकडून ' मराठी वाङ्मय कोश ' संपादन करण्याची संस्थेकडे जबाबदारी . (प्रथम स . शि . भावे आणि नंतर बहुतांश काम म . वि . गोखले यांनी पुरे केले .) परिषदेच्या खंडीत झालेल्या मराठीच्या परीक्षा डॉ . गं . ना . जोगळेकर यांच्या प्रयत्नामुळे पुन्हा सुरू . तसेच अमराठी भाषिकांसाठी मराठीचे वर्ग .

१९८४: मॉरिशसमधील मराठी बांधवांसाठी स्थानिक बांधवांच्या सहकार्याने परिषदेने परीक्षा घेतल्या .

१९८५: घटना दुरुस्ती करून परिषदेचे कार्यक्षेत्र पश्चिम महाराष्ट्रातील तेरा जिल्ह्यांपुरते मर्यादित करण्याचे ठरले . सभासद होण्यास मात्र पूर्वीप्रमाणे सर्वांना मोकळीक .

१९८६: २७ मे हा दर वर्षी वर्धापनदिन म्हणून साजरा करण्याचा निर्णय . या निमित्त एका जेष्ठ साहित्यिकास २०००रु . चा . म .सा .परिषद पुरस्कार व मानचिन्ह देऊन सत्कार करण्याची योजना . विंदा करंदीकर हे या वर्षी पहिले मानकरी ठरले . बॅ . विठ्ठलराव गाडगीळ यांचे हस्ते त्यांचा सत्कार .

वर्धापनदिनाला जोडून संस्थेतर्फे प्रा . वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली चौथे विभागीय संमेलन . दुष्काळनिधीला ५००० रु मदत .

कॉन्टिनेंटल प्रकाशनाचे अनंतराव कुलकर्णी यांचेकडून परिषदेला चिं .वि .जोशी आणि वि . वा . शिरवाडकर यांचे नावे ग्रंथपुरस्कार देण्यासाठी ५० ,००० रु . ची देणगी . संबंधित ग्रंथांच्या प्रकाशकांनाही पुरस्कार देण्याची तरतूद .

१९८७: फेब्रुवारीत ठाणे येथे विद्याधर गोखले यांचे अध्यक्षतेखाली पाचवे विभागीय संमेलन . उद्‌घाटक माधव गडकरी , स्वागताध्यक्ष सतीश प्रधान .

२७ मे रोजीच्या वर्धापनदिनी श्री . पु . भागवत यांना ३००० रु . पुरस्कार प्रदान . हस्ते विजय तेंडुलकर .

१९८८: निराधार , गरजू लेखकांना मासिक पेन्शन देण्यासाठी साहित्यिक सहाय्यनिधी एक लक्ष रुपये जमविण्याचा संकल्प पूर्ण .

व्हीनस प्रकाशनतर्फे रा . श्री . जोग ग्रंथपुरस्कार देण्यासाठी स्थापित झालेली समिती म .सा .परिषदेत विलीन .

वर्धापनदिनी गं . दे . खानोलकर यांना ३००० रु . पुरस्कार . साहित्यिक सा . निधीतून वा . भा . पाठक (रु .५०००) आणि अशोक थोरे (रु . १०००) यांना सहाय्य .

१९८९: वर्धापनदिनी मुख्यमंत्री शरद पवार यांचे हस्ते वा .रा .कान्त यांना ३००० रुपयांचा पुरस्कार . नाटककार विनायक देवरुखकर यांना दरमहा २५० रुपये पेन्शन आणि म . श्री . दीक्षित यांना डॉ . भीमराव कुलकर्णी यांचे स्मृत्यर्थ योजलेला पहिला पुरस्कार (साहित्य-

सांस्कृतिक क्षेत्रात दीर्घकाळ निरपेक्ष सेवा करणाऱ्या व्यक्तीस पुरस्कार देण्याची ही नवी योजना). २७ मे रोजी पुरस्कार-पेन्शन देण्याचे कामी राजेंद्र बनहट्टी (कार्याध्यक्ष) आणि राजा फडणीस (कोषाध्यक्ष) यांचे विशेष यत्न. जून महिन्यात पिंपरी-चिंचवड येथील शाखेच्या सहकार्याने ६ वे विभागीय सा. संमेलन. अध्यक्ष वसंत बापट

१९९०: वर्धापनदिनी श्री. रं. कुलकर्णी (हैद्रावाद) यांना पद्मश्री माधव गडकरी यांच्या हस्ते परिषद पुरस्कार, बाबा पाटील (कोल्हापूर) यांना मासिक पेन्शन, अ. ल. लिमये (नागपूर) यांना भीमराव कुलकर्णी पुरस्कार.

इतिहास संशोधन शं. ना. जोशी (वत्स) यांचे स्मृत्यर्थ कुटुंबियांकडून साठ हजार रुपयांची देणगी. पाच हजार रुपयांचा ग्रंथपुरस्कार देण्यासाठी.

१९९१: वर्धापनदिनी अरविंद गोखले यांना पं. महादेवशास्त्री जोशी यांचे हस्ते म.सा.प. पुरस्कार. अंधकवी राम गोसावी यांना मासिक पेन्शन, वि. पां. देऊळगावकर (गुलबर्गा) यांना भीमराव कुलकर्णी पुरस्कार.

९ जूनच्या विशेष साधारण सभेत परिषदेची नवी घटना संमत. ऑक्टोबरपासून ती कार्यवाहीत. (पहा पत्रिका अंक जाने-मार्च १९९१)

१९९२: वर्धापनदिनी मालतीबाई बेडेकर यांना गोपीनाथ तळवलकर यांच्या हस्ते म.सा.प. पुरस्कार, सदानंद भिडे यांना पेन्शन, वसंतराव आगाशे (मिरज) यांना भीमराव कुलकर्णी पुरस्कार. २६ जुलैच्या साधारण सभेत किरकोळ घटना दुरुस्त्या.

१९९३: डॉ. सरोजिनी वाबर यांच्या हस्ते म. वा. धोंड यांना म.सा.प. पुरस्कार, शि. मो. घैसास (मुंबई) यांना भीमराव कुलकर्णी पुरस्कार. याप्रसंगी गोविंद तळवलकर यांचे पंडित नेहरूंसंबंधी व्याख्यान. संस्थेतर्फे शुद्धलेखन आणि हस्ताक्षर स्पर्धा, डोंबिवली शाखेच्या सहकार्याने ७ वे विभागीय सा. संमेलन, अध्यक्ष : द. मा. मिरासदार.

१९९४: ना. सं. इनामदार यांचे हस्ते वसुंधरा पटवर्धन यांना म.सा.प. पुरस्कार, द. पं. जोशी हैद्रावाद यांना भीमराव कुलकर्णी पुरस्कार. प्रमुख पाहुणे व्यंकटेश माडगूळकर.

१९९५: एप्रिलपासून नवे कार्यकारी मंडळ, गं. ना. जोगळेकर (कार्याध्यक्ष), रवींद्र भट (मुख्य कार्यवाह), ना. गो. जोशी (कोषाध्यक्ष), शंकर सारडा (पत्रिका संपादक) यांची निवड. कार्यकारिणीच्या पहिल्या सभेत राजेंद्र बनहट्टी (अध्यक्ष), गो. म. कुलकर्णी, रामदास फुटाणे आणि शिवाजी सावंत (उपाध्यक्ष) यांची नियुक्ती. वर्धापनदिनी म.सा.प.चा वाढीव पुरस्कार रु. ५००० चा संजीवनी मराठे यांना, तर भीमराव पुरस्कार भगवंत देशमुख (औरंगाबाद) यांना समारंभाचे प्रमुख पाहूणे ना. स. फरांदे. आळंदी येथे परिषदेची नवी शाखा स्थापन.

१९९६: इस्लामपूर येथे शाखेच्या सहकार्याने जानेवारीत आठवे विभागीय साहित्य संमेलन. अध्यक्ष प्रा. डॉ. रावसाहेब कसबे. मे महिन्यात परिषदेचा नव्वदावा वाढदिवस विशेष प्रकारे करण्यासाठी नवती समिती कार्यान्वित.

(म. श्री. दीक्षित, तीन मूर्ती, सदाशिव पेठ, पुणे ३०)

(महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेतर्फे श्री. दीक्षित यांनी लिहिलेला म.सा. परिषदेचा इतिहास प्रसिद्ध होत आहे. त्या पुस्तकातून राज्य विकास संस्थेच्या सौजन्याने पुनर्मुद्रित.)

## परिषदेचे विश्वस्त

१. रा. ब. दामोदर गणेश पाध्ये, मुंबई, जून १९१८ ते १९४२
२. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, मुंबई, जून १९१८ ते १९२२
३. डॉ. नीलकंठ भालचंद्र भाटवडेकर, मुंबई १९२२ ते १९५९
४. प्रिं. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, पुणे. सप्टें १९४१ते एप्रिल १९५९
५. डॉ. धनंजयराव रामचंद्र गाडगीळ, पुणे, सप्टें. १९४४ ते एप्रिल १९७१
६. श्री. विठ्ठल दत्तात्रय घाटे, पुणे, ऑ. १९५९ ते १९७५
७. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई, जून १९७१ ते १९८२
८. श्री. विश्वनाथ त्र्यंबक शेटे, पुणे, जुलै १९७५ ते १९८२
९. श्री. वि. ग. तथा राजाभाऊ माटे, पुणे एप्रिल १९७९ ते १९८९
१०. श्री. सर्जेराव घोरपडे. पुणे १९८२-
११. ॲड. मधुकर रामचंद्र परांजपे, पुणे १९८२-
१२. श्री. मधुकर श्रीधर दीक्षित, पुणे, जून १९८९-
(क्र. ८ पर्यंतचे दिवंगत)

## परिषदेचे अध्यक्ष

(त्रैवार्षिक अध्यक्षीय पद्धत अस्तित्वात आल्यापासून)

१. प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी, १९६७-१९७०
२. श्री. नारायण गणेश गोरे १९७०-१९७३
३. डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे १९७३-७४ मे
४. प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग १९ ७४ -१९ ७६
५. श्री. गजानन दिगंबर माडगूळकर १९७६-७७
६. प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार १९७८-७९
७. प्रा. वसंत शंकर कानेटकर १९७९-१९८२
८. श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी १९८२-८३
९. ॲड. शंकरराव खरात १९८३-८५
१०. श्री. शंकर पाटील १९८५-१९८८
११. प्रा. गणेश प्रभाकर प्रधान १९८८-१९९१
१२. डॉ. सरोजिनी कृष्णराव बाबर १९९२-१९९५
१३. श्री. राजेंद्र श्रीनिवास बनहट्टी १९९५-
(१ ते ६, ८ आणि १० दिवंगत)

## परिषदेचे कार्याध्यक्ष

१. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, १९१७,१८,२२
२. रा. ब. दामोदर गणेश पाध्ये, १९२३ - २८
३. रावसाहेब ना. गो. तथा नानासाहेब चापेकर, १९२८ - ३७
४. प्रा. वामन मल्हार जोशी १९३७ - ४२
५. ख्रि. रावसाहेव रघुवेल लुकस जोशी, १९४२ - ४३
६. श्री. कृष्णाजी गणेश तथा काकासाहेब लिमये, १९४३ - ४५
७. प्रा. श्रीपाद महादेव तथा वापूसाहेव माटे, १९४६ - मे ४९, १९५२ - ५५
८. प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग, मे १९४९ - ५२

९. प्रा. चिंतामण विनायक जोशी, १९५५ - ५८
१०. श्री. यशवंत दिनकर पेंढरकर, १९५८ - ६१
११. प्रा. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, १९६१ - ६३ जून
१२. श्री. के. नारायण काळे, १९६४ - ६७
१३. डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे, १९६७ - ७०
१४. डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे, १९७० -७३
१५. डॉ. भीमराव बळवंत कुलकर्णी, १९७३ - ७६
१६. श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी, १९७६ - ७९
१७. डॉ. विनायक रामचंद्र करंदीकर १९८२ - ८५
१८. श्री. गणपती वासुदेव वेहेरे, १९८२ - ८५
१९. श्री. राजेंद्र श्रीनिवास वनहट्टी, १९८५ - ८८
२०. श्री. राजेंद्र श्रीनिवास वनहट्टी, १९८८ - ९२
२१. डॉ. गंगाधर नारायण जोगळेकर, १९९५ - ९८
(१ ते १६ आणि १८ दिवंगत)

## परिषदेचे कोषाध्यक्ष

१. भास्कर महादेव पंडित, १९१२, १५,१७,२२
२. विनायक कृष्ण मुळे, १९१७, १९,२२
३. सुं. वा. रायकर, १९२६, २८
४. सुंदरराव भास्करराव वैद्य, १९२६, २८, ३१ - ३३
५. धनंजय रामचंद्र गाडगीळ, १९३३ - ४४
६. रामचंद्र नारायण दांडेकर, १९४६ - ५२
७. नरहर काशिनाथ घारपुरे, १९५२, ५५, ६१ - ६७
८. चिंतामण गणेश कर्वे, १९५५ - ६१
९. सदाशिव कृष्ण पाध्ये, १९६७ - ७०
१०. अनंत अंबादास कुलकर्णी, १९७७ - ७३
११. दा. दि. तथा मधुकाका कुलकर्णी, १९७३ - ७६ नोव्हेंबर
१२. मोरेश्वर रामचंद्र वाळंबे, १९७६ - ७९
१३. पुरुषोत्तम शंकर पतके, १९७९ - ८२
१४. गोविंद दिगंबर तथा राजा फडणीस, १९८२ - ८५
१५. मधुकर श्रीधर दीक्षित, १९८५ - ८७ आक्टोबर
१६. डॉ. गंगाधर नारायण जोगळेकर, १९८७ - ८८
१७. मधुकर श्रीधर दीक्षित, १९८८ - ८९ जून
१८. महादेव विनायक गोखले, १९८९ - ९१
१९. प्रल्हाद लक्ष्मण गावडे, जुलै १९९१ ते मार्च ९२
२०. नाना गोपाळ तथा नाना जोशी, १९९२ - ९५
२१. नाना गोपाळ तथा नाना जोशी, १९९५ - ९८
(१ ते ८, १२, १३ दिवंगत)

## पत्रिका संपादक

१. ना. गो. चापेकर, मार्च १९२८ ते मार्च ३३
२. द. वा. पोतदार. जुलै १९३३ ते जानेवारी ३६
३. मा. त्र्यं. पटवर्धन. एप्रिल १९३६ ते एप्रिल ३७
४. मो. ज्ञा. शहाणे, जुलै १९३७ ते ऑक्टोबर ३९
५. के. नारायण काळे, जानेवारी १९४० ते ऑक्टोबर ४२
६. रा. श्री. जोग, जानेवारी १९४३ ते मार्च ४६
७. के. नारायण काळे, एप्रिल १९४६ ते ऑगस्ट ४६
८. श्री. म. माटे, मार्च १९४७ (८० - ८१ जोड अंक)
९. य. दि. पेंढरकर, एप्रिल १९४९ ते जून ५०
१०. रा. शं. वाळिंबे, जुलै १९५० ते मार्च ५१
११. रा. श्री. जोग, एप्रिल १९५१ ते सप्टेंबर ५२
१२. वि. भि. कोलते, एप्रिल १९५२ ते मार्च ५५
१३. वा. रा. ढवळे, एप्रिल १९५५ ते मार्च ६१
१४. दि. के. बेडेकर, एप्रिल १९६१ ते ऑक्टोबर ६३
१५. वा. रा. ढवळे, ऑक्टोबर १९६३ ते डिसेंबर ६३
१६. श्री. के. क्षीरसागर, जानेवारी १९६४ ते जुलै ६५
१७. के. नारायण काळे, जुलै १९६५ ते मार्च ७०
१८. स. गं. मालशे, एप्रिल १९७० ते मार्च ७३
१९. भालचंद्र फडके, एप्रिल १९७३ ते मार्च ७६
२०. हे. वि. इनामदार, एप्रिल १९७६ ते मार्च ७९
२१. आनंद यादव, एप्रिल १९७९ ते मार्च ८२
२२. भीमराव कुलकर्णी, एप्रिल १९८२ ते मार्च ८५
२३. वसंत स. जोशी, एप्रिल १९८५ ते मार्च ८८
२४. शंकर सारडा, जुलै १९८८ ते मार्च ९२
२५. वि. स. वाळिंबे, एप्रिल १९९२ ते मार्च ९५
२६. शंकर सारडा, एप्रिल १९९५ ते मार्च ९८

(१ ते ११, १३ ते १८ आणि २२, वे दिवंगत)

## परिषदेचे कार्यवाह

- वा. गो. आपटे, १९०६ - ८, १२ - १५
- वि. ल. भावे १९०६ - ८
- कृ. प्र. खाडिलकर, १९०६ - ८
- रा. र. मोरमकर, १९१२, १५, १७, २२
- चिं. गं. भानु, १९१७ - २०
- न. र. फाटक, १९२० - २०, २६, २८
- भा. वि. रायकर, १९२३, २६, २८
- रा. का. तटर्णीस, १९२६
- य. रा. दाते, १९२६, २८
- भा. ल. पाटणकर, १९२६
- द. गो. काळे, १९२८

- गो . व . माकोडे , १९२८
- के . ल . ओगले , १९२९ - ३१
- कृ . पां . कुलकर्णी , १९३१ - ३३
- मा . त्र्यं . पटवर्धन , १९३१ - ३३
- रा . दा . देसाई , १९३३ - ३४
- दे . द . वाडेकर , १९३३ - ३६
- भा . कृ . उजगरे , १९३५
- शं . दा . पेंडसे , १९३५ - ३६
- के . नारायण काळे , १९३५ , ४३ - ४५
- चिं . ग . कर्वे , १९३६ - ३७
- ना . के . वेहेरे , १९३७ - ३९
- र . लु . जोशी , १९३६ - ४२
- अ . ना . भालेराव , १९४० - ४२ , ४९ - ५२
- वा . दा . गोखले , १९४३ - ४९ , ५३ - ५७
- गं . भा . निरंतर , १९४६ - ४९ , ५२ - ५४
- अरविंद मंगरुळकर , १९४९ - ५३ ,
  ५५ - ५७ , ६२ - ६७
- श्री . शं . नवरे , १९५२ - ५४
- वा . रं . सुंठणकर , १९५५ - ५८
- य . दि . पेंढरकर , १९५५ - ५८
- न . का . घारपुरे , १९५८ - ५८
- मा . गो . देशमुख , १९५८ - ६१
- चंद्रकुमार डांगे , १९५७ - ६१

गोपीनाथ तळवळकर , १९६१ - ६३

म . ना . अदवंत १९६१ - ६७

- वि . त्र्यं . शेटे , १९६१ - ६७
- मो . रा . वाळंवे , १९६७ - ७०
- ग . ल . ठोकळ , १९६८ - ७३
- द . वा . डावरे , १९६७ - ७० , ७३ - ७६

वि . म कुलकर्णी , १९७० - ७३

- भीमराव कुलकर्णी , १९७० - ७३
- भालवा केळकर , १९७३

श्री . ज . जोशी , १९७५ - ७६

वासू देशपांडे , १९७३ - ७५ मे

रा . ज . देशमुख , डिसें . १९७३ - ७६

वि . ग . कानिटकर , १९७६ - ७९

राजा महाजन , १९७६ - ७९

माधव कानिटकर , १९७९

म . श्री . दीक्षित , १९७६ - ८५

न . म . जोशी , १९७९ - ८२

द . ता . भोसले , १९७९ - ८२

वसंत सं . जोशी , १९८२ - ८५

राजेंद्र वनहट्टी , १९८२ - ८५

राजा फडणीस , १९८५ - ८८

म . वि . गोखले , १९८५ - ८८

प्रभाकर अत्रे , १९८५ - ८८

गं . ना . जोगळेकर , १९८८ - ९१

ज्योत्स्ना देवधर , १९८७ - ८८

चि . शं . जोशी , १९८८ - ९१

राजा फडणीस , १९८८ - ९१

म . वि . गोखले , १९९१

ललिता कुंभोजकर , १९९१ - ९२

रवींद्र भट , १९९२ - ९५

कल्याणी दिवेकर , १९९२ - ९५ - ९८

भगवान ठाकूर , १९९२ - ९५

या काळापासून मुख्य कार्यवाह आणि तीन कार्यवाह अशी पदे निर्माण करण्यात आली .

रवींद्र भट , १९९५ फेब्रु . ९६ (प्र .कार्यवाह)

राजा फडणीस , १९९६ -

रत्नाकर कुलकर्णी - १९९५ - ९८

सु . प्र . कुलकर्णी , १९९५ - ९६

भगवान ठाकूर , १९९६ -

या खुणा केलेल्या व्यक्ती दिवंगत .

०००

प्रा. गौतमीपुत्र कांबळे

# सौंदर्यशास्त्राचे स्वरूप

*'प्रज्ञांकुर' ही एक सांस्कृतिक चळवळ सांगली परिसरात चालवली जात आहे. या संस्थेतर्फे काही दिवसांपूर्वी फुले-आंबेडकरांच्या दृष्टिकोनातून सौंदर्यशास्त्राची मांडणी करता येईल का हे पाहण्यासाठी सौंदर्यशास्त्राचे एक अभ्यासक प्रा. कमलाकर दीक्षित (कोल्हापूर) यांची दोन व्याख्याने आयोजित केली गेली होती. 'सौंदर्यशास्त्राचे स्वरूप : साहित्येतर कलांच्या संदर्भात' आणि 'सौंदर्यशास्त्राचे स्वरूपः साहित्याच्या संदर्भात' या विषयांवरील ह्या व्याख्यानांनंतर त्यावर चर्चाही झाली. या व्याख्यानांचा आणि चर्चेचा हा गोषवारा.*

**१**

## सौंदर्यशास्त्राचे स्वरूप : साहित्येतर कलांच्या संदर्भात

सौंदर्यशास्त्र हा विषय क्लिष्ट नव्हे, पण अपरिचित आहे. एक म्हणजे हा शास्त्रीय विषय असल्यामुळे तो देशकाळनिरपेक्ष रीतीने अभ्यासावा लागतो. तो काही मराठी भाषेपुरता मर्यादित नाही. मराठीतही तो आहे इतकेच. ग्रीक, लॅटिन, संस्कृत, इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, रशियन व इतरही अनेक भाषांत या विषयावर संशोधन झालेले आहे. एवढी व्यापकता या विषयाला असल्यामुळे कदाचित फारसे अभ्यासक इकडे वळत नसतील. तसेच इतर शास्त्रांप्रमाणे या विषयाचीही परिभाषा आहे. परिभाषेशी परिचय नसला तर विषय कठीण वाटतो.

या विषयाची ओळख करून देण्याची जबाबदारी माझ्यावर असल्यामुळे विषय जितका सुगम करता येईल तितका तो सुगम करायचा माझा प्रयत्न राहील. त्यासाठी मी दोन पथ्ये पाळणार आहे. एक म्हणजे परिभाषेचा वापर कमी करणार आहे. दुसरे म्हणजे मोठमोठ्या विद्वानांची नावे घेणार नाही.

विषय सोपा सुलभपणे मांडण्याच्या प्रयत्नात आशयाला धक्का पोचणार नाही. मात्र जाणकारांना काही फटी जाणवतील. पण मी आज त्यांच्यासाठी बोलत नसल्यामुळे या फटी बुजविण्याच्या प्रयत्नात आशय अनाकलनीय होऊ नये याची काळजी घेणार आहे. त्यातूनही काही भाग अनाकलनीय राहील. त्यावद्दल आधीच क्षमा मागून ठेवतो.

लहान मुलाच्या हातात वस्तू दिली किंवा त्याने ती घेतली की त्या वस्तूच्या आत काय आहे हे बघण्याची त्याची प्रवृत्ती असते त्यामुळे ती वस्तू ते मूल मोडूनही टाकते उदा. घड्याळ. तसेच एखादी पेटी बरेच दिवस बंद असेल तर मोठ्या माणसांनाही त्या





अनुक्रमणिका

पेटींत काय आहे हे बघण्याची इच्छा असते. अगदी प्रेझेंट जरी आपल्याला कोणी दिलं तरी आत काय आहे हे बघण्याची आपली प्रवृत्ती असतेच. ही प्रवृत्ती हा मनुष्य स्वभावाचा भाग आहे.

म्हणूनच अगदी आरंभापासून आपल्या चरितार्थाचे प्रश्न सुटण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न केल्यावर मानवाला या विश्वातील अनेक गोष्टींबाबत कुतूहल वाटलेलं आहे. अनेक कोडी उलगडण्याचा प्रयत्न त्यानं केला आहे.

पाऊस पडतो म्हणजे काय? पूर येतो म्हणजे काय? रोग होतात म्हणजे काय? माणसं मरतात म्हणजे कुठं जातात? ती जन्माला पुन्हा कशी येतात? हे सगळं चक्र कोण चालवितो? अशा प्रकारचे असंख्य प्रश्न आदिम काळातील माणसाला पडले असले पाहिजेत. ते प्रश्न आजही आहेतच. हे जीवनाचं कोडं (विशेषतः मृत्यूमुळं अधिक गहिरं झालेलं) सुटावं अस त्याला वाटतं. जीवनाचं अंतिम सत्य काय आहे? मृत्यूनंतर मनुष्याचे काय होते? जन्मापूर्वी तो कुठे असतो? हे सगळ चक्र चालविणारा कोण आहे? त्याचं स्वरूप काय आहे? जर असं कोणी नसतंच तर मग हे सगळं चालतं कसं? यासारख्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न सुरुवातीपासून मनुष्य करीत आहे. यालाच आपण तत्त्वज्ञान म्हणतो. यापैकी बऱ्याच प्रश्नांची उत्तरे मिळालेली आहेत. परंतु "अंतिम सत्याचं स्वरूप काय आहे?" हे अजून समजलेलं नाही. मृत्यूनंतर माणसाचं काय होतं? हे सगळं चालविणारा कोणी चालक आहे की नाही? तो आहे म्हणायला काही आधार नाही. तो नाही असं म्हणण्यालाही काही आधार नाही. अशा वेळी काय समजावे? याचा अजून निर्णय लागलेला नाही. अशा एका पातळीवर तत्त्वज्ञान येऊन पोहोचलं आहे.

त्यानंतर सद्सदविवेकबुद्धीमुळे म्हणा किंवा अन्य कारणामुळे म्हणा, काही प्रकारच्या वर्तणुकीकडे पाहून मनुष्य म्हणतो की, आपण असं वागणं बरोबर नाही, इतरांनी असं वागणं बरोबर नाही. तेव्हा चांगली वर्तणूक आणि वाईट वर्तणूक याविषयी लोकांचं एकमत असल्याचं दिसून येतं. पण वैयक्तिक हितसंबंध त्यामध्ये गुंतलेला असेल तर मनुष्य वाईट वर्तनाचंही समर्थन करतो. पण अशा प्रकारचा हितसंबंध गुंतलेला नसेल आणि कृतीची चिकित्सा करायची असेल तर बहुधा एकमत होतं. साधारणतः आपण असं समजू की. हिंसा बरोबर नाही. भ्रष्टाचार बरोबर नाही. खोटं बोलणं बरोबर नाही.

पण पुढे मग, जीवनाच्या दृष्टीनं चांगलं काय, वाईट काय असे प्रश्न निर्माण होतात. चांगलं वागल्यानं सुख मिळेल का? वाईट वागल्यानं दुःख मिळतं अशी खात्री आहे का? याविषयी चर्चा होते. पण लोकांना नेमकं उत्तर हवंय. पण नेमकं उत्तर देता येत नाही अशी परिस्थिती आहे. फार तर आपण असं म्हणू शकतो की, आपलं आपण चांगलं वागावं. बाकीचं बघणारा बघून घेईल. पण बघणारा कोणी आहे की नाही याविषयी वाद असल्यामुळे वैज्ञानिक दृष्टीनं विचार करणारा मनुष्य म्हणेल की, बघणारा कोणी आहे की नाही हे अजून सिद्ध व्हायचे आहे. अशा परिस्थितीत तुम्ही मला सांगा की, मी चांगलं का वागावं? या प्रश्नाचं उत्तर देता येत नाही. इतकंच

नव्हे तर 'चांगलं' या शब्दाची अजून व्याख्या करता आलेली नाही. जीवनामध्ये शिवकारक काय आहे? मानवाचं कल्याण कशात आहे? याविषयी चर्चा होत असली तरी नेमका आधार नाही. त्यामुळं नीतिशास्त्रामध्ये या प्रश्नाचं उत्तर अद्याप मिळालेलं नाही. म्हणजेच नीतिशास्त्रालाही अंतिम तत्त्व सापडलेलं नाही.

तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्रानंतर आपण तिसऱ्या तत्त्वाकडे जातो. निसर्गामध्ये आपण सूर्यास्त पाहतो, सूर्योदय पाहतो, चंद्रोदय पाहतो, फुलं, प्राणी पाहतो. याशिवाय आणखी काही निसर्गातील दृश्यं आपण पाहतो. या गोष्टी आपल्या मनात काही भावना निर्माण करतात. या भावनेला कोणी सुख म्हणतं. कोणी आनंद म्हणतं. त्यामुळे अशा गोष्टी पुन्हा पुन्हा बघाव्याशा वाटतात. अशी आनंददायी प्रतिक्रिया आपल्या मनात ज्या दृश्यामुळं, वस्तूंमुळं निर्माण होते त्याला 'सौंदर्य' असं नाव दिलेल आहे.

सौंदर्याविषयीही तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्रासारखीच उत्सुकता माणसाच्या मनात निर्माण झाली. त्यातूनच काही प्रश्नही निर्माण झाले.

सौंदर्य असतं म्हणजे काय असतं? सौंदर्याचे घटक कोणते? सौंदर्य आपल्या मनात निर्माण का होतं? बाहेर हे कोण निर्माण करतं? या सगळ्या प्रश्नांची उत्तरं शोधण्याचे प्रयत्न केले गेले.

एखादी गोष्ट सुंदर आहे असं एखादा मनुष्य म्हणाला आणि दुसऱ्या एखाद्यानं त्याच्याशी मतभेद दाखविला तर पहिला कोणत्या अर्थानं त्याच्याशी चर्चा करू शकेल?

एखादा म्हणाला की, सूर्यास्त मीही पाहिला, पण तू म्हणतोस तसं ते दृश्य मला काही तेवढं सुंदर वाटलं नाही. अशा वेळी त्याच्याशी कोणत्या पद्धतीनं वाद करावा? कोणत्या पद्धतीनं चर्चा करावी? या प्रश्नांचे उत्तर मिळविण्याची गरज माणसाला वाटू लागली.

सौंदर्याचे घटक कोणते आहेत?

कोणी रंगसंगती हा घटक म्हणतात. वेगवेगळे रंग आहेत. त्या रंगांची काही एक रचना असते, आकार असतो.

प्रश्न केव्हा निर्माण होतो? जेव्हा वाद निर्माण होतो तेव्हा. आता, लिओनार्दो द व्हिंचींचं 'मोनालिसा' हे चित्र आहे. पुष्कळ लोकांनी या चित्राचं रसग्रहण केलेलं आहे. प्रशंसा केलेली आहे. पण एखादा म्हणाला की, मी ते चित्र बघितलं, पण तुम्ही म्हणता तेवढं त्यात मला काही जाणवलं नाही. अशा वेळी आपण एवढेच म्हणू शकतो की, त्याच्याकडं रसिकताच कमी आहे. पण तोही उलट म्हणेल की, माझी रसिकताही काही कमी नाही. तुम्ही जिला रसिकता म्हणता ती रसिकता म्हणजे काय? तिची व्याख्या काय? म्हणून मतभेद निर्माण झाले असता तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्राप्रमाणे या शास्त्रालाही फारसे ठाम असे बोलण्यासारखी परिस्थिती नाही.

अशा परिस्थितीत या तिन्हींना सायन्स (शास्त्र) असे म्हणता येईल का? या तिन्हींना विज्ञान न म्हणता शास्त्र म्हणणे योग्य. यांचे विषयही अमूर्तच. जगाच्या अंतिम सत्याचं स्वरूपही अमूर्तच. वागणुकीचे जे शिवकारक नियम आहेत तेही अमूर्तच. आणि

सौंदर्य हे जरी भावत असले तरी सौंदर्य हा काही सौंदर्यशास्त्राचा विषय नाही. तर सौंदर्य वस्तू पाहिल्यावर आपल्या मनामध्ये जी प्रतिक्रिया निर्माण होते, ती सौंदर्यशास्त्राचा विषय असल्यामुळे आणि ती प्रतिक्रिया व्यक्तिगणिक बदलणारी असल्यामुळे हा विषयही अमूर्तच. त्यामुळे अशा अमूर्त विषयासंबंधी बोलायचं म्हणजे सगळा अंधारच.

पदार्थविज्ञान किंवा रसायनशास्त्र यामध्ये खूप संशोधन झालेलं आहे. मात्र याचा अर्थ असा नव्हे की, पदार्थविज्ञानशास्त्रालाही आपल्या विषयात शेवटचं काही तत्त्व समजलेलं आहे. म्हणजेच अशा नैसर्गिक शास्त्रामध्येही अंतिम चिकित्सेच्या वेळी हाताला निश्चित असं काही लागत नाही. तरीसुद्धा इथं 'ग्रे' एरिया कमी आहे. पण या तीन शास्त्रांमध्ये 'ग्रे' एरिया फार मोठी आहे.

पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र किंवा इतर नैसर्गिक शास्त्रामध्ये अभ्यास करणारे जे लोक आहेत ते, आणि तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र आणि सौंदर्यशास्त्र यात अभ्यास करणारे जे लोक आहेत ते, या दोघांचीही गुणवत्ता सारखीच आहे. पण त्यांना जे यश मिळाले ते यांना मिळालेलं नाही. याचं कारण असं की हा विषय पाऱ्यासारखा आहे. तो हातात सापडत नाही. त्यामुळं अंतिम विधान काही करता येत नाही.

तरीही या अभ्यासकांची जी मांडणी आहे ती तार्किक आहे, शैलीही विश्लेषक आहे. उद्‌गारवाचक पद्धतीची रचना या शास्त्रात नाही. तर इतर शास्त्राप्रमाणे शास्त्रीय दृष्टिकोन ठेवूनच मांडणी केलेली असते. समजा, एखाद्याने एखादी उपपत्ती मांडली तर ती उपपत्ती काय आहे? ती सर्व उदाहरणांना लागू पडते का? लागू पडत नसेल तर का लागू पडत नाही? या पद्धतीचा विचार यात केला जातो. तेव्हा या शास्त्राची जी मांडणी आहे ती शास्त्राचीच आहे. ती ललित लेखनाची नाही किंवा कविता/कादंबरीसारखी नाही. त्यामुळे याला विज्ञान जरी म्हणता आलं नाही तरी शास्त्र म्हणायला काही हरकत नाही. शिवाय या विषयाचा अभ्यास जगभर विविध भाषांतून केला गेलाय. ग्रीकमध्ये झालेला आहे. संस्कृतमध्ये झालेला आहे. आणि आजही अनेक भाषांतून होतो आहे. म्हणजे काही सुपीक मेंदूंना या विषयानं भुरळ घातलेली आहे.

तरी पण यश नाही. मग हा विषय शिकायचा तरी कशासाठी? या प्रश्नाचं एवढंच उत्तर देता येईल की, कॅन्सरवर अजून काही आपल्याला औषध सापडलेलं नाही, पण तरीही आपण काही असं म्हणत नाही, की आजवरची या क्षेत्रातील लोकांची कर्तबगारी लक्षात घेता या क्षेत्रातल्या संशोधकांनी येथून पुढे या संशोधनावर पैसे खर्च करणे बरोबर नाही.

मनुष्य एकदा एखाद्या गोष्टीचा शोध घ्यायला लागल्याशिवाय त्याला चैन पडत नाही. आणि आज नाही शोध लागला तर उद्या लागेल, परवा लागेल. बाकीचे शोधही असेच लागलेले आहेत. शिवाय मुख्य शोध जरी नाही लागला तरी बरेचसे इतर शोध त्या अनुषंगाने लागतात आणि त्यांचा उपयोगही काही कमी नाही.

मनुष्याची जी वैज्ञानिक मनोवृत्ती आहे ती लक्षात घेता त्याला शोध लागल्याशिवाय आपलं संशोधन थांबवावं असं वाटत नाही.



अनुक्रमणिका

शेरपा तेनसिंगवरोवर एव्हरेस्टवर पाय ठेवणाऱ्या एलमंड हिलरीला विचारलं की तुम्ही कशासाठी करताय? हे जीवावर उदार होऊन एव्हरेस्टवर चढण्याचं साहस कशासाठी करताय? Why do you want to climb the Everest? त्यानं उत्तर दिलं : Because it is there. तो तेथे आहे म्हणून त्यावर चढायचं साहस करावंसं वाटतं.

सौंदर्यामध्ये दोन प्रकार तरी आपण साधारणपणे मान्य करू शकतो. एक नैसर्गिक सौंदर्य आणि दुसरं मानवनिर्मित सौंदर्य.

माणसांनी जे काही सौंदर्य निर्माण केलेलं आहे त्याला आपण कलाकृती म्हणतो. कलेमध्येही वेगवेगळ्या कला आहेत. संगीत, चित्रकला इ.

माणसाला पाच ज्ञानेंद्रिये आहेत. ( Sense of touch, Sense of sound, Sense of sight, Sense of smell and Sense of taste ) ज्ञानेश्वरीमध्ये शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध असं त्याचं वर्णन केलेलं आहे. या पाच मार्गांनी मनुष्य अनुभव घेतो.

एका इंद्रियाला येणारा अनुभव दुसऱ्या इंद्रियाला येत नाही. म्हणजे संगीताचा आपण डोळ्यांनी घेऊ शकत नाही किंवा चित्राचा आस्वाद काही आपण कानांनी घेऊ शकत नाही. डोळा आणि कान याद्वारे जे अनुभव आहेत त्याच्यावर जास्त करून कला तयार झाल्या. चित्रकला, शिल्पकला, संगीतकला इ. परंतु ज्याला आपण गंध म्हणतो त्यावर आधारित कला निर्माण झालेली नाही.

पण रुचीवर आधारित पाककला आहे. चांगले चांगले पदार्थ तयार करणे आणि खाणे. तर ती एक कला आहे. कारण वेगवेगळे घटक केवळ एकत्रित केल्याने पदार्थ चांगला होतोच असं नाही. म्हणून या कलेलाही ललित कला का म्हणू नये, असा प्रश्न काही लोक उपस्थित करतात. त्यामध्ये मीही आहे. आता कलाकृती म्हणजे काय? असा जर प्रश्न उपस्थित केला तर एक गोष्ट खरी आहे की 'कलाकृती' या शब्दामध्ये आकृती आहे. ज्याला आपण मानवनिर्मित सौंदर्य म्हणतो ती 'आकृती' असतेच. अगदी तुम्ही साधी रांगोळी जरी घेतलीत तरी तेथे आकृती असतेच. संगीतातही आकृती असते. आपणाला ती जरी डोळ्यांनी दिसत नसली तरी जी रागदारी असते तिला 'बंदिश' म्हणतात. तर बंदिश म्हणजे आकृतीच.

म्हणजे कलेमध्ये 'आकृती' असते. ज्या ठिकाणी आकृती नसते, ती काही कला नव्हे, हे निरीक्षण मान्य करायला हरकत नाही. आता आकृती असते म्हटल्यावर ती कशाची तरी असणार आणि ती कोणत्या तरी नियमानुसार असणार. ती दिसायला वा जाणवायला पाहिजे.

आपण कुंभाराची कला घेऊ. तो चाकावर मातीची भांडी तयार करतो. माती माध्यम म्हणून वापरतो. मातीलाच तो आकार देतो. येथे मातीविना आकृती शक्य नाही. म्हणजे आकृती म्हटलं की तिला एक माध्यम आलं. कुंभार असेल तर माती. चित्रकार असेल तर रेषा, रंग पाहिजेत. संगीतात स्वर पाहिजेत. म्हणजेच कलाकृतीमध्ये माध्यमाची 'आकृती' असते.

आता समजा, एखाद्यानं एक चित्र काढलं आणि त्या चित्राबद्दल 'सुरेख' अशीच बहुतेकांनी प्रतिक्रिया व्यक्त केली तर काही प्रश्न नाही. पण अशाच दुसऱ्या एखाद्या चित्राविषयी, हे चित्र एवढं काही जमलेलं नाही, हे काहीतरी वेढव किंवा वेडौल झालेलं आहे, अशी प्रतिक्रिया उमटली. तर अशा चित्रात विघडलं काय? तर आकृती विघडली. किंवा समजा, कुठलीच आकृती काढलेली नाही, काही एक अॅब्स्ट्रॅक्ट पद्धतीची आकृती काढलेली असं म्हणू. पण अशा आकृतीकडे बघितल्यावर, एका अशा कलाकृतीकडे बघितल्यावर जी प्रतिक्रिया होते ती होत नाही. म्हणजेच आकृतीने आपल्या मनामध्ये अशा प्रकारच्या प्रतिक्रिया निर्माण करायला पाहिजेत की सर्वसाधारणपणे सुंदर वस्तू बघितल्यावर ज्या प्रतिक्रिया आपल्या मनात निर्माण होतात. थोडक्यात आपण असं म्हणू की आकृती ही सुंदरच असायला पाहिजे. तर तिला कलाकृती म्हणता येईल. म्हणजे माध्यम किंवा साधन पाहिजे. आणि त्याचं एका विशिष्ट आकृतीत रूपांतर करायला पाहिजे. येथवर काही प्रश्न नाही. प्रश्न पुढे निर्माण होतो. तो असा की कोणत्या नियमानुसार ही आकृती काढली असता ती सुंदर दिसेल. सौंदर्यशास्त्राच्या नियमांनुसार आकृती काढली तर ती सुंदर दिसते. आता आणखी पुढे प्रश्न असा की, ही तत्त्वे कोणती?

कोणत्याही गोष्टीचा अभ्यास करताना त्या वस्तूचे घटक वेगवेगळे करणे, त्यांची रचना कशी झाली आहे ते पाहणे आणि विश्लेषण झाल्यानंतर नियम समजावून घेऊन, माध्यम समजावून घेऊन त्याच नियमानुसार घटकांचं संश्लेषण करून पुन्हा तशीच वस्तू तयार झाली की, प्रयोग यशस्वी असे आपण मानतो आणि वैज्ञानिक तरी काय करतात? वस्तूंचं विश्लेषण करतात. कुठल्या नियमानुसार त्याचं संश्लेषण झालेलं आहे ते बघतात आणि त्या नियमानुसार पुढे त्या वस्तू तयार करतात. यालाच आपण तंत्रविद्या किंवा टेक्नॉलॉजी म्हणतो. तशी सौंदर्याची टेक्नॉलॉजी तयार होते की काय हे बघणं हा सुद्धा या शास्त्राचा एक भाग आहे. म्हणजे आम्ही सौंदर्यास्त्राचा अभ्यास करतो, त्याचे नियम समजावून घेतो आणि त्या नियमानुसार आमच्याजवळच्या माध्यमाच्या आधारे म्हणजे रंग, रेषा, स्वर यांच्या आधारे रचना करतो. म्हणजे सौंदर्यनिर्मिताचं यंत्र मिळेल या भावनेनंसुद्धा शास्त्राचा प्रवास असतो. कारण, समजा एखादा कवी म्हणाला की, माझ्या कवितेला तुम्ही 'बरी' आहे असं कां म्हणता? ती चांगली आहे असं का म्हणत नाही? नाहीतर मला नियम सांगा. कोणत्या पद्धतीनं लिहायला पाहिजे? म्हणजे मग माझी कविता 'चांगली' होईल. अशीच इच्छा चित्रकाराचीही असते. वेगवेगळ्या लोकांनी वेगवेगळी सौंदर्यतत्त्वे सांगितली आहेत. पण अडचण अशी की, एखाद्यानं एखाद तत्त्व सांगितलं की, अशी काही उदाहरणं दिसतात की, ते तत्त्व त्यांना लागू पडत नाही. पण शास्त्र म्हटल्यावर ते जे तत्त्वे आहे ते सर्व वस्तूंना लागू पडलं पाहिजे. एका जरी वस्तूला ते लागू पडले नाही तरी ते तत्त्व चुकीचेच. सौंदर्यकृतीमध्ये [illegible] हे एक तत्त्व असते असे समजू. तर मग एखादी जरी आजची किंवा पूर्वीची, या [illegible]तील किंवा दुसऱ्या देशातील, या भाषेतील किंवा कुठल्याही भाषेतील कलाकृती दिसली की त्यामध्ये 'प्रमाण' नाही, पण तरीही चित्र सुंदर वाटतं. तर मग त्या तत्त्वाची काही उपयुक्तता

राहात नाही . आणखी कोणी सांगितलं की , त्याच्यामध्ये रंगांचा जो वापर केलेला आहे त्याच्यामध्ये मॅचिंग आणि कॉन्ट्रास्ट पाहिजे . असा जर वापर केला तर चित्र चांगलं (सुंदर) होईल का ? पण असं कित्येक वेळेला दाखविता येत नाही . परंतु कोणतंही तत्त्व मग ते पौर्वात्य वा पाश्चात्य लोकांनी सांगितलेलं असो , अशा कित्येक कलाकृती निर्माण होतात की ते तत्त्व त्यांना लागू पडत नाही . म्हणजेच निरपवाद अशी तत्त्वे हाताला लागत नाहीत . पुष्कळशा कलाकृतींना लागू पडतील अशा काही तत्त्वं आपणाला सांगता येतील , परंतु सर्वच कलाकृतींना लागू पडतील अशा तऱ्हेनं आकृतीचं तत्त्व किंवा संघटनेचं तत्त्व हे काही अद्याप मान्य झालेलं नाही अशी वस्तुस्थिती आहे . तरीही या विषयाचा अभ्यास करायचं दुसरं एक कारण असं की काही तत्त्वे असतात , त्यावर आपली श्रद्धाही असते , आणि आपला समज असतो की काही सौंदर्यतत्त्वे आहेत . अशावेळी या शास्त्राचा अभ्यास केला की ती तत्त्वे ही सौंदर्यतत्त्वे नव्हेत , हे सिद्ध करता येते . म्हणजेच आपल्याला सौंदर्याचे पॉझिटिव्ह निकष सांगता आले नाहीत तरी निगेटिव्ह निकष सांगता येतील . समजा , एक जण म्हणाला की ही कविता जर अमक्या कारणासाठी श्रेष्ठ आहे तर आपण त्याला म्हणू शकू की नाही , दुसरी एक कविता आहे की जिच्यामध्ये ही तत्त्वे नाहीत , पण तरीही ती श्रेष्ठ आहे . म्हणजेच सौंदर्यतत्त्व म्हणून काही वेळेला नकली , काही वेळेला अप्रामाणिकपणे , काही वेळेला प्रामाणिकपणाने अशी तत्त्वे सुचविली जातात . ती तत्त्वे निरपवाद नाहीत असं आपण सिद्ध करू शकतो . याचा अर्थ असा की अंधारच आहे , पूर्णपणे अंधार आहे . या अंधारामध्ये एक मेणबत्ती लावण्याचा हा भाग आहे . ती जर मेणबत्ती काढून घेतली तर सगळा अंधारच आहे .

सौंदर्यशास्त्राचा किंवा कोणत्याही शास्त्राचा असा दावा नाही की , हा जो सगळा अंधार आहे , तेथे आम्ही एकदम सूर्य आणून ठेवतो आणि सर्वत्र एकदम लखलखाट होईल . God said let there be light and there was light अशी परिस्थिती नाही .

पण ज्याला सौंदर्यशास्त्राचा अभ्यास करायचा आहे त्याला एवढं समजेल , आपण ज्या तत्त्वाच्या आधारे एखादी कलाकृती चांगली आहे असं म्हणतो ते तत्त्व तरी सार्वत्रिक आहे का ? याचा त्याला विचार करता येईल आणि त्याच्यापेक्षा अधिक सार्वत्रिक असं तत्त्व शोधता येईल . काही वेळेला असं घडतं की , मनुष्य एका विशिष्ट प्रदेशात , विशिष्ट वातावरणात जन्माला आलेला असतो . तिथं राहिल्यामुळं त्याला असं वाटत असतं की , अमुक एक तत्त्व कलाकृतीमध्ये असल्यामुळे ही कलाकृती श्रेष्ठ झाली . तर त्याला एवढं समजू शकेल की , हे या वातावरणामधलं तत्त्व आहे . हे तत्त्व इंग्रजी भाषेतल्या कलाकृतीला लावलं तर टिकायचं नाही . कारण सौंदर्यतत्त्वे ही देशकाल निरपेक्ष अशी आहेत . म्हणजे पाच हजार वर्षापूर्वीची एखादी कलाकृती घेतली आणि अगदी आजची एखादी कलाकृती घेतली किंवा महाराष्ट्रातली घेतली आणि चीन किंवा रशियामधली घेतली तर तत्त्वे सर्वांना सारखीच त्यामुळे मराठी सौंदर्यशास्त्र वेगळं आणि इंग्रजी सौंदर्यशास्त्र वेगळं आणि रशियन सौंदर्यशास्त्र वेगळं असं म्हणण्याची आवश्यकता नाही .



अनुक्रमणिका

पण समजा , ग्रीक  इस्थेटिक्स असा शब्दप्रयोग झाला तर त्याचा अर्थ एवढाच की , ग्रीस या देशात जन्माला आलेल्या शास्त्रज्ञांनी जे काही सौंदर्यशास्त्राविषयी लेखन केले ते त्या पुस्तकामध्ये आले . पण त्यातील तत्त्वे ही ग्रीक लोकांनी तयार केलेल्या कलाकृतींनाच लागू पडतात आणि महाराष्ट्रातील लोकांनी तयार केलेल्या कलाकृतींना लागू होत नाहीत , असं नाही . आणि जर इकडे ती तत्त्वे लागू होणार नसतील तर त्या तत्त्वांनाही काही अर्थ नाही . म्हणूनच जी तत्त्वे देशकालनिरपेक्ष नाहीत ती मागं पडली आहेत . कारण शास्त्र म्हटलं की , तत्त्वं ही देशकालनिरपेक्ष पाहिजेत . आणि तशीच सौंदर्यतत्त्वे शोधून काढण्याचे प्रयत्न चालू आहेत . त्यामुळं जी काही तत्त्वं स्वीकारलेली आहेत ती सर्व देशातील सर्व कलाकृतींना लागू पडतील आणि जी स्वीकारलेली नाहीत ती कुठल्याच कलाकृतीला सर्वार्थाने लागू पडतील अशातला भाग नाही . त्यामुळं देश , भाषा , काल यांच्या पलिकडं जाणारं तत्त्व शोधण्याचा प्रयत्न हे शास्त्र करीत आलेलं आहे . म्हणूनही असेल कदाचित , त्यामध्ये फारशी प्रगती झालेली नाही .

दुसरं कारण म्हणजे मानसिक प्रतिक्रिया हा सौंदर्यशास्त्राचा विषय असल्यामुळंही फारशी प्रगती झालेली नाही . माणसाच्या मनाचेही अबोध आणि सबोध असे दोन भाग पडतात . म्हणजे जवळ-जवळ ७/८ भाग जो माणसाच्या मनाचा आहे त्याचा शास्त्राला पत्ता लागलेला नाही . आणि हा भाग देखील मानसिक प्रतिक्रियेला प्रेरक असल्याने या शास्त्राची अशी परिस्थिती आहे . म्हणजे एकूण सगळी भूमी निसरडी आहे . पाय ठेवाल तेथे घसरणार अशी स्थिती आहे . निश्चित फार काही बोलावं अशी परिस्थिती नाही .

## चर्चा

**प्रश्न - कांटने ' स्वायत्त सौंदर्य ' आणि ' परायत्त सौंदर्य ' असा भेद केलेला आहे . त्याचा काहीच उल्लेख आपण आपल्या भाषणात केला नाही . हे कसे ? (प्रा . रोहिणी तुकदेव)**

उत्तर - सौंदर्यशास्त्राचा परिचय करून देण्यासाठी मला येथे बोलावले आहे . भाषणात परिभाषा वापरली की ज्यांना परिभाषा परिचित नाही त्यांना भाषणाचे पुरेसे आकलन होत नाही . त्याच प्रमाणे भाषणात तज्ज्ञांची नावे वापरून त्यांचा हवाला दिला तर ऐकणारा बौद्धिक दबावाखाली येतो आणि मनातील शंका कदाचित प्राथमिक ठरेल म्हणून बोलून दाखवीत नाही . यामुळे मी परिभाषा आणि तज्ज्ञांची नावे मुद्दाम टाळलेली आहेत . कांटने केलेला फरक मी "निसर्ग सौंदर्य" आणि "मानवनिर्मित सौंदर्य" या शब्दांनी स्पष्ट केलेला आहे .

**प्रश्न - पिकासोची चित्रे रुढार्थाने सुंदर म्हणता येणार नाहीत . पण त्या चित्रांना कोणी कुरूपही म्हणत नाही . मग पिकासोच्या चित्रांचे रसग्रहण कोणत्या सौंदर्यशास्त्राने करता येईल ? (प्रा . साहेबराव नितनवरे)**

उत्तर  पिकासोची चित्रे ज्याला आवडतात त्याने ही चित्रे आपल्याला का आवडतात

असा प्रश्न स्वतःला विचारायला हवा. त्या आवडीची कारणे शोधायचा प्रयत्न करावा. ही कारणे पिकासोच्या चित्रांत सापडतात की काय ते पाहावे. तशी ती सापडल्यावर प्रचलित सौंदर्यशास्त्राच्या निकषांशी ती सुसंगत आहेत की काय ते पहावे. असतील तर प्रश्न मिटला. नसतील तर मात्र शोध पुढे चालू ठेवावा. पिकासोच्या चित्रांचे सौंदर्यशास्त्र या दोन्ही सौंदर्यशास्त्रांना पोटात घेऊ शकेल असे एक नवे व्यापक सौंदर्यशास्त्र यातून उदयाला येईल. ही कामगिरी करणे अत्यंत आवश्यक आहे. प्रस्थापित सौंदर्यशास्त्रांत उणीवा आहेत असे म्हणून स्वस्थ रहाणे शास्त्राच्या प्रगतीच्या दृष्टीने उचित नाही. प्राथमिक जबाबदारी मात्र पिकासोच्या चाहत्यांची आहे.

**प्रश्न - व्हिन्सेंट व्हॅन गॉवने आपल्या चित्रासाठी कुरूप मॉडेल्स्चा वापर केलेला आहे. या पाठीमागील सौंदर्यशास्त्रीय भूमिका काय असू शकेल? (प्रा. जी. के. ऐनापुरे)**

उत्तर - सौंदर्यशास्त्रातील प्रश्न सौंदर्य भावल्यानंतर सुरू होतात. मॉडेल कुरूप आहे की सुंदर याला महत्त्व नसते. सुंदर मॉडेलचे वाईट चित्र काढता येते. एखादा चित्रकारच तिसऱ्या दर्जाचा असेल तर विश्वसुंदरीचे चित्रही वाईट काढील. तसेच चित्रकार कसबी असेल तर नव्वद वर्षाच्या कुरूप स्त्रीचेही चित्र सुरेख काढू शकेल. आपण म्हणता त्या प्रमाणे व्हॅन गॉवने कुरूप मॉडेल्स्ची सुरेख चित्रे काढली. कारण तो कसबी चित्रकार होता.

**प्रश्न - सौंदर्यशास्त्राचा विषय अमूर्त आहे असे गृहीत धरल्यामुळे सौंदर्यशास्त्रात प्रगती पुरेशा प्रमाणात होत नाही असे म्हणता येईल का? (प्रा. गौतमीपुत्र कांबळे)**

उत्तर - एखादी कलाकृती आपल्याला आवडली तरच आपण तिला सुंदर म्हणतो म्हणजे सुंदरता ही आवडीवर अवलंबून असते. आवड ही मानसिक प्रतिक्रिया असते. आणि मानसिक प्रतिक्रिया ही अमूर्तच असणार. ही मानसिक प्रतिक्रिया हाच सौंदर्यशास्त्राचा विषय असतो, ही वस्तुस्थिती आहे. ती गृहीत धरलेली गोष्ट नव्हे. नैसर्गिक शास्त्रे अमूर्त विषयांचा अभ्यास करतात. त्यामुळे त्यात प्रगती तुलनेने जास्त आहे. सामाजिक शास्त्रे अमूर्ताचा अभ्यास करतात. त्यात प्रगती कमीच असणार. दुसऱ्याच्या खांद्यावर बसणे आणि स्वतःच्या खांद्यावर बसणे असा हा फरक आहे.

**प्रश्न - साहित्य आणि साहित्येतर कलांची माध्यमे वेगळी आहेत. या वेगळेपणाचा स्वीकार न केल्यामुळे साहित्याच्या सौंदर्यशास्त्रात नेमकेपणा येत नाही हे खरे आहे काय? (प्रा. गौतमीपुत्र कांबळे)**

उत्तर - साहित्य आणि साहित्येतर कला यांची माध्यमे वेगळी आहेत. साहित्याचे माध्यम शब्दार्थ हे आहे. साहित्यकृतींतील सर्व शब्दांच्या अर्थांनी तिचा आशय बनतो. हा आशय सार्वजनिक स्वरूपाचा असल्यामुळे तो प्रत्येक वाचकाच्या मनात वेगवेगळ्या प्रतिक्रिया निर्माण करणे स्वाभाविक आहे. अशा स्थितीमुळे साहित्याच्या सौंदर्यशास्त्रात नेमकेपणा आणता येणे अवघड बनते. म्हणजे आपण म्हणतो त्याप्रमाणे नेमकेपणा आणणे अवघड आहे हे खरे आहे, परंतु साहित्य व साहित्येतर कलातील माध्यमांचा

वेगळेपणाचा स्वीकार न केल्यामुळे नेमकेपणा आणणे अवघड झालेले आहे.

**प्रश्न - सौंदर्य वस्तूत असते की पहाणाऱ्याच्या मनात? (प्रा. मोग्गलान श्रावस्ती)**

उत्तर हा सौंदर्यशास्त्रातला कूट प्रश्न आहे. एखादी वस्तू पाहून आपल्याला ती सुंदर वाटली तर त्याची कारणे आपण आपल्या मनात शोधू शकतो. ही कारणे व्यक्तिगणिक वेगवेगळी असू शकतील. त्या विविध कारणांतही काही समान कारणे असू शकतील. त्यांच्या आधारे काही सौंदर्यतत्त्वे हाती लागू शकली तरी ती निरपवाद सिद्ध करणे अशक्य होते. मात्र ही सौंदर्यकारक कारणे आपण वस्तूतही शोधू शकतो. ती तुलनेने कमी अमूर्त असण्याची शक्यता असते. म्हणून वस्तूत सौंदर्य असते असे मानणे बरे, कारण त्यामुळे काही तार्किक विचार करता येतो. मनाकडे वळले तर मन आहे की नाही इथून सुरुवात होते.

**प्रश्न - एखादी कलाकृती सौंदर्यपूर्ण होण्यासाठी त्यातील आकृती सौंदर्यपूर्ण असलीच पाहिजे का? (प्रा. मोग्गलान श्रावस्ती)**

उत्तर - आपल्या प्रश्नाचा रोख सौंदर्यनिर्मितीच्या टेक्नॉलॉजीकडे आहे. काही सौंदर्यतत्त्वे निश्चित करून नंतर त्यांचा वापर करून सौंदर्यवस्तू तयार करता येणे शक्य होत नाही. प्रवास उलट करावा लागतो. म्हणजे जर एखाद्या कलाकृतीत आपल्याला सौंदर्य जाणवले तर ते सौंदर्य त्या कलाकृतीत कोणत्या घटकांमुळे निर्माण झाले याचा शोध घेण्याचा आपण प्रयत्न करतो. कलाकृतीत माध्यमाची रचना (आकृती) असते. माध्यम कलाकृतीपूर्वीही अस्तित्वात असते. त्या टप्प्यावर त्याचे सौंदर्य जर जाणवत नसेल आणि कलाकृतीत त्याचे रूपांतर झाल्यानंतर जे जाणवत असेल तर मग ते आकृतीमुळे म्हणजे रचनेमुळे निर्माण झाले असे मानण्यावाचून पर्याय नाही.

**प्रश्न - रूपभेदाः प्रमाणानि भावलावण्ययोजनम् ।**
**सादृश्यं वर्णिकाभंगम् इति चित्रषंडंगकम् ॥ सौंदर्याच्या या सहा तत्त्वांना सौंदर्यशास्त्रात किती महत्त्व आहे? (प्रा. मोग्गलान श्रावस्ती)**

उत्तर या वचनातील सहा तत्त्वांचा आढळ काही चित्रांत होतो. कदाचित बऱ्याच चित्रांतही होतो असे म्हणता येईल. पण कित्येक चित्रांत सहाच्या सहा तत्त्वांचा आढळ होतोच असे दिसत नाही. चित्र सुंदर दिसते पण तत्त्वे कमीजास्त आढळतात. त्यामुळे निश्चित काही विधान करता येत नाही. हीच सौंदर्यशास्त्राची समस्या आहे.



## सौंदर्यशास्त्राचे स्वरूप : साहित्याच्या संदर्भात

पहिल्या व्याख्यानात आपण ललितकला आणि सौंदर्यशास्त्र यांच्या परस्पर संबंधाचे स्वरूप पाहिले. आज साहित्य आणि सौंदर्यशास्त्र यांच्यातील संबंधाचे स्वरूप पाहू.

प्रथम एका गोष्टीचा खुलासा करायला पाहिजे. तो हा की वैचारिक वाङ्मयाला तर्कशास्त्राचे नियम लागू होत असल्यामुळे वैचारिक वाङ्मयाचा विचार सौंदर्यशास्त्राच्या संदर्भात करता येत नाही. साहजिकच केवळ ललित वाङ्मयाचाच विचार आज

आपल्याला करायचा आहे. इथून पुढे ललित वाङ्मयालाच 'साहित्य' असे समजून मी बोलणार आहे.

कोणतीही साहित्यकृती पाहिली तर आपल्याला तिचे दोन घटक दृग्गोचर होतात. एक म्हणजे आशय आणि दुसरा म्हणजे आकृती किंवा रचना. याचा अर्थ आशय एका आकृतीत रूपांतरित झालेला असतो. उदाहरण घ्यायचे झाले तर कुंभाराने तयार केलेल्या मातीच्या घटाचे घेता येईल. येथे माती हा आशय घटरूपी रचनेत परिवर्तित झालेला असतो. या वरून असे दिसेल की रचना ही काही आशयापासून वेगळी अशी वस्तू नसते. कापडाचा शर्ट, पिठाची भाकरी किंवा सोन्याची आंगठी ही या संदर्भातील आणखी काही उदाहरणे म्हणून घेता येतील.

आता आपण आशय व रचना या दोन घटकांचे स्वरूप कसे असते ते पाहू.

आशयाचे दुसरे नाव अनुभव असे आहे.

आता अनुभव म्हणजे काय ते पाहू. आपल्याला पाच संवेदना असतात. इंग्रजीत त्यांना सेन्स ऑफ साईट, सेन्स ऑफ साउंड, सेन्स ऑफ स्मेल, सेन्स ऑफ टेस्ट आणि सेन्स ऑफ टच अशी नावे आहेत. भारतीय परंपरेत शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध अशी नावे आहेत. ज्याला आपण अनुभव म्हणतो तो या पाच वाटांनीच आपल्या मेंदूपर्यंत जातो. म्हणजे सहावी वाट नाही. याचा अर्थ दुसऱ्याचा अनुभव हा आपला अनुभव होऊ शकत नाही. एखाद्याने स्वतः साखर खाऊन दुसऱ्याला तिच्या गोडीचे कितीही रसभरित वर्णन करून सांगितले तरी दुसऱ्याला साखरेच्या गोडीचा अनुभव असा येत नाही. पहिल्याचा अनुभव साखरेचा तर दुसऱ्याचा अनुभव वर्णनाचा. त्याला पहिल्याची सर नाही. आता या पाच जाणिवांवाटे ज्या संवेदना आपल्याला होतात त्यामुळे आपल्या मनात आनंद, दुःख, आश्यर्च आदी भावना निर्माण होतात. या भावना निर्माण झाल्यानंतर मग आपल्या मनात निष्कर्षात्मक विचार तयार होतो. थोडक्यात म्हणजे 'संवेदना ⟶ भावना ⟶ विचार = अनुभव' असे समीकरण मांडता येईल.

असा हा जो अनुभव आहे तो साहित्यकृतीत आला की त्याला 'आशय' असे म्हणतात. म्हणजे साहित्यकृतीतला आशय हा मानवी जीवनातून येतो. आता मानवी जीवन अनेकांगी असते. या अंगाचा विचार करण्यासाठी ज्यांना आपण सामाजिक शास्त्रे म्हणतो ती प्रयत्न करतात. उदाहरणार्थ, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, इ. वर्तनशास्त्रे मानवी जीवनाचा वैयक्तिक आणि सामूहिक अभ्यास करतात. साहित्यकृतीचा आशय या घटकाचा अभ्यास करू शकतात. अशा रीतीने कोणी अभ्यास केल्यास त्याला 'आशयनिष्ट समीक्षा' म्हणतात. आज रस, ध्वनी, वक्रोक्ती, नीतिनिष्ठ, समाजशील व आदिबंधात्म असे प्रमुख देशी परदेशी समीक्षासिद्धांत वाचकाला प्रधान मानून कार्यरत आहेत. लेखकाला केंद्र मानून अभ्यास करणाऱ्या मानसशास्त्रीय आणि चरित्रात्मक अशा दोन समीक्षा पद्धतीही वापरात आहेत. या सर्व आशयनिष्ठच आहेत.

आशय हा काही एका रचनेत रूपांतरित झालेला असतो. या रचनेचे स्वरूप आता

बघू.

आशयाचा विचार करताना लेखक आणि वाचक यांच्याकडे वळावे लागते तसे रचनेचा विचार करताना साहित्यकृतींवर लक्ष केंद्रित करावे लागते. साहित्यकृतीत आढळणारी रचना काही तत्त्वावर आधारलेली असते. ही तत्त्वे म्हणजे सौंदर्यतत्त्वे असे म्हणता येईल. या तत्त्वांचा शोध घेताना इतर ललित कलांशी साहित्यकृतींची तुलना केली जाते. साहित्यासह सर्व ललितकलांमध्ये रचनातत्त्वांची समानता जाणवते. म्हणजे या तत्त्वांची जाणीव होते पण ती शब्दांत पकडता येत नाहीत. क्वचित व्याख्याही करता आली तरी ती निरपवाद नाही असे लगेच जाणवते. थोडक्यात म्हणजे सौंदर्यतत्त्वांबाबत एकमत होत नाही. समजा, सौंदर्यतत्त्वांची संकल्पना सोडून दिली तर मग जातिव्यवस्थेवरील प्रबंध व जातिव्यवस्थेवरील कादंबरी यांच्यातील फरक स्पष्ट करता येणार नाही. आगरकर आणि हरी नारायण आपटे यांच्यात फरक करता येणार नाही. आंबेडकर आणि दया पवार यांच्यात भेद करता येणार नाही. पण असे फरक तर स्पष्ट जाणवत असतात. त्यामुळे रचनातत्त्वे किंवा सौंदर्यतत्त्वे यांचे अस्तित्व मानावे लागते. एखादी लेखनकृती ललित आहे की वैचारिक आहे हे सौंदर्यतत्त्वांच्या आधाराने स्पष्ट करता करता येते. या दृष्टीने सौंदर्यतत्त्वे उपयुक्त असतात.

सौंदर्याच्या आधारे ललित आणि ललितेतर अशी वर्गवारी केल्यामुळे समीक्षेचे पन्नास टक्के काम पूर्ण होते. परत आपण अनेक साहित्यकृती वाचतो. त्या सर्वच आपल्याला आवडल्या तरी सारख्याच प्रमाणात आवडतात असे नाही. त्यात सरसनिरसपणा, डावेउजवेपणा जाणवतो. तसेच एखादी साहित्यकृती लाखात एक अशीही वाटते.

या मूल्यमापनाशी इतर अनेक वाचकही सहमत असतात. म्हणजे दोन साहित्यकृतींची तुलना ही होतच असते. ती टळत नसते. आता ही तुलना कशाच्या आधारे करणार, हा प्रश्न उद्भवतो. समीक्षेचे उर्वरित ५० टक्के काम म्हणजे तौलनिक तत्त्वे निश्चित करण्याचे. साहित्यकृतींची तुलना आशयाच्या आधारे करता येते आणि रचनेच्या आधारेही करता येते.

आशयाच्या आधारे तुलना करायची झाली तर आपण अखेर जीवनसत्यापर्यंत पोचतो. सत्य हे सर्वात मोठे वर्तुळ असून इतर तत्त्वे त्याच्या पोटातील छोट्या छोट्या वर्तुळांप्रमाणे असतात. उदाहरणार्थ, स्वातंत्र्य, समता, बंधुता ही तत्त्वे सत्याच्या पोटातच येतात. वास्तवता आणि कल्पनारम्यता, भांडवलशाही आणि समाजवाद, बालपण आणि वार्धक्य, सौंदर्य आणि कुरूपता, प्रेम आणि द्वेष, युद्ध आणि शांती, सहकार आणि सौंदर्य, जीवन आणि मृत्यू ही सारी त्या व्यापक जीवनसत्याचेच पोटभाग असतात. या व्यापक जीवनसत्याचे जितके अधिक दर्शन साहित्यकृतीत होईल तितकी ती साहित्यकृती अधिक श्रेष्ठ असे म्हणता येईल.

रचनेच्या आधारे प्रतवारी लावायची झाली तर सौंदर्याचे प्रमाण बघावे लागते. हे प्रमाण रचनेच्या व्यामिश्रतेवर अवलंबून असते. व्यामिश्रता जितकी जास्त तितके

सौंदर्य जास्त असे दिसून येते.

थोडक्यात म्हणजे असे म्हणता येईल की एखादी साहित्यकृती आपल्याला श्रेष्ट वाटली तर तिच्यात आशयाची 'सत्यता' आणि रचनेची 'व्यामिश्रता' अधिक असते.

## चर्चा

**प्रश्न - एखाद्या कलाकृतीला प्रस्थापित सौंदर्यतत्त्व लागू होत नसेल तर तिला कलाकृती मानावे की नाही? (बबन चहांदे)**

उत्तर - सौंदर्यशास्त्राचे जे काही निकष असतील ते कलाकृतीवर वरून लादलेले नसतात. आपल्याला कलाकृती भावलेली असेल तर आपणच त्याची कारणे म्हणजे निकष शाधायचे असतात. हे निकष प्रस्थापित असू शकले तर प्रश्न मिटतो. समजा प्रस्थापित नसले तरी हरकत नाही. मात्र ते स्थकालनिरपेक्ष व निरपवाद असावे.

**प्रश्न - नामदेव ढसाळांच्या 'गोलपिठा' ला आपण कोणते सौंदर्यतत्त्व लागू कराल? आणि याच सौंदर्यतत्त्वाने 'औदुंबर' कडे कसे बघाल? (बबन चहांदे)**

उत्तर - या प्रश्नाचे उत्तर मी दिले तर ते कदाचित आपल्याला पटेल. कदाचित पटणार नाही. हा किंवा असे प्रश्न सोडविण्याचा खरा मार्ग म्हणजे प्रश्न स्वतःलाच विचारावा. आपल्याला दोन्ही कविता आवडल्या तर त्याची कारणे शोधायची जबाबदारी घ्यावी. ही कारणे समान किंवा एकच असावीत अशी शास्त्रीय विचारसरणीची अपेक्षा असते. समजा, ती कारणे वेगवेगळी असली तर त्या कारणांना पोटात घेणारी व्यापक कारणे शोधण्याचा प्रयत्न चालू ठेवावा. अशी दोन्ही कवितांना लागू पडणारी व्यापक तत्त्वे हाती लागल्यानंतर ती आपल्याला आवडलेल्या इतर सर्व कवितांना लागू पडतात की काय हे पाहावे. सर्व कवितांना लागू पडणारा तत्त्वसंच सापडेपर्यंत प्रयत्न सोडू नये. यातून सौंदर्यशास्त्राचा विकास होतो. थोडक्यात म्हणजे भावलेल्या सौंदर्याचे निकष शोधायची जबाबदारी ज्याला ते भावले त्याची आहे.

**प्रश्न - परंतु यातून स्वतःला बसण्यासाठी जागा स्वतःच करून घेण्यासारखा प्रकार होणार नाही काय? त्यापेक्षा सौंदर्यशास्त्रच अनावश्यक मानले तर काय होईल? (बबन चहांदे)**

उत्तर - आपल्या पहिल्या प्रश्नाचा अर्थ, यामुळे वाईट कवी चांगल्या कवींच्या पंगतीत बसण्याचा प्रयत्न करतील असा होतो. आपली कविता चांगली आहे, असे प्रत्येक कवी म्हणत असतो. परंतु वाचक आपलीच प्रतिक्रिया प्रमाण मानतो. वाचकाला तो कवी चांगला वाटला तर तो त्याला चांगल्या कवींच्या पंगतीला बसवील. या संदर्भात कवीचे मत वाचकावर बंधनकारक नसते. त्यामुळे स्वतःसाठी स्वतःच जागा करून घ्यायचा प्रश्न उद्भवत नाही.

सौंदर्यशास्त्र अनावश्यक मानल्यामुळे ते अनावश्यक ठरणार नाही. एक म्हणजे सौंदर्याचे प्रश्न रसिकाच्या मनात निर्माण होतात. या प्रश्नांना उत्तरे शोधण्याच्या कामात सौंदर्यशास्त्र रसिकाला मदत करते. सौंदर्य आणि रसिक सर्व काळात आणि

सर्व देशांत अस्तित्वात असतात. त्यामुळे सौंदर्यशास्त्राला देशकालात परिमाण आहे. थोडक्यात म्हणजे सौंदर्यशास्त्र अनावश्यक असते तर कदाचित ते निर्माणही झाले नसते. समजा, वादासाठी सौंदर्यशास्त्र अनावश्यक आहे असे तुम्ही आणि मी ठरविले तरी त्याला इतर देशातील लोकांची मान्यता कशी मिळणार? ते लोक सौंदर्यशास्त्राचा अभ्यास करीतच राहतील आणि आपण मात्र त्याकडे दुर्लक्ष केल्याने त्याबाबत मागासलेले राहू.

**प्रश्न - अनुभवाशिवाय साहित्य दर्जेदार होऊ शकत नाही असे आपण म्हणता परंतु शेक्सपिअरची कथानके मूळची दुसऱ्याकडून केलेली उसनवारी होती. त्याबद्दल तत्कालीन समीक्षकांनी 'अपस्टार्ट क्रो ब्युटिफाइड बाय अवर फीदर्स' अशी टीका कलेली आहे. तरीही शेक्सपिअर थोर कसा? (अरुण मिरजकर)**

उत्तर - शेक्सपिअरने उसनवारी सांगाड्याची केली आणि त्यात सप्तधातू भरून प्राणही प्रदान केला. याचे कारण त्याचे अनुभवविश्व संपन्न होते. मूळ लेखकाचे नाव काही विशेषज्ञ वगळता कोणाला माहित नाही. शेक्सपिअरचे नाव मात्र सर्वांना ठाऊक आहे. जे समीक्षकाचे विधान आपण उद्धृत केले त्याचे नावही फारसे परिचित नाही. तसेच जगात काही मोजकेच आदिबंध असून, तेच पुन्हा पुन्हा साहित्यात अवतरत असतात, या विधानावरच संपूर्ण आदिबंधात्म समीक्षा आधारलेली आहे.

**प्रश्न - साहित्याचा आशय पंचसंवेदनात्म अनुभवनिष्ठ असतो असे आपण म्हणता. परंतु अनुभवाला न येणारे किंवा पंचज्ञानेंद्रियांमार्फत संवेदित न होणारे असे काही आशय साहित्यात आढळतात. मग त्यांना साहित्य म्हणावे की नाही? (प्रा. भरत नाईक)**

उत्तर - आशय हा जर अनुभवावर आधारित नसेल तर ते साहित्य कमअस्सल ठरेल. मात्र ज्ञानेंद्रियावाटे आलेल्या संवेदना, त्यातून निर्माण होणाऱ्या भावना, व तज्जन्य विचार असे तीन घटक अनुभव या संकल्पनेत असल्यामुळे शेवटचे दोन घटक ज्ञानेंद्रियांशी प्रत्यक्ष संबंधित नसतात. मात्र भावना व विचार संवेदनाधिष्ठित असतील तर आपण म्हणता तशा साहित्याला अस्सलपणा प्राप्त झालेला असेल.

**प्रश्न - ज्या साहित्यात जीवनाचे कसलेही सत्य सापडत नाही त्या साहित्याला साहित्य म्हणावे का? (प्रा. भरत नाईक)**

उत्तर - अशा साहित्याला साहित्य म्हणायचेच झाले तर तिसऱ्या दर्जाचे साहित्य म्हणता येईल.

**प्रश्न - अद्भुतरम्य साहित्यकृतीत सौंदर्यतत्त्वे नसतातच काय? (प्रवीण चंदनशिवे)**

उत्तर - अद्भुतरम्य साहित्यकृतीत सौंदर्यतत्त्वे नसण्याचे काही कारण नाही. अद्भुतरम्यता आशयात असते. सौंदर्य आशयाच्या रचनेत असते. जगात जशा उत्कृष्ट वास्तववादी साहित्यकृती तशा उत्कृष्ट अद्भुतरम्य साहित्यकृतीही आहेत.

**प्रश्न - एकाच समीक्षा पद्धतीने दोन साहित्यकृतींचा अभ्यास केल्यास श्रेष्ठकनिष्ठता ठरविता येत नाही असे आपण म्हणता. मग त्यांसाठी दोन**

अनुक्रमणिका

**समीक्षा पद्धती वापराव्या लागतील काय? तसे करणे न्यायाचे होईल काय? (प्रवीण चंदनशिवे)**

उत्तर - माझा भावार्थ असा होता की एकच तत्त्व आपण साहित्यकृती आणि अ-साहित्यकृती ठरविण्यासाठी वापरले तर त्याच तत्त्वाच्या आधारे प्रतवारी लावणे कठीण जाते. समजा, वास्तवता हे जर आपण एकमेव साहित्यमूल्य मानले तर दोन वास्तववादी साहित्यकृतीत वास्तववादाच्या आधारे श्रेष्ठकनिष्ठ ठरविणे अवघड आहे. त्यामुळे व्यवच्छेदक निकषांचा एक संच व प्रतवारीसाठीच्या निकषांचा दुसरा संच असणे गरजेचे असते. त्यात अन्याय होण्याचे काही कारण नाही.

**प्रश्न - बा. सी. मर्ढेकर आणि प्रभाकर पाध्ये यांनी सौंदर्याचे सिद्धांत मांडले आणि ललित लेखनही केले. त्यांच्या त्यांच्या सिद्धांतांना धरून या दोघांचे ललित लेखन झाले आहे काय? साहित्यकृतीच्या निर्मितीमध्ये हे शक्य आहे काय? (प्रा. जी. के. ऐनापुरे)**

उत्तर - साहित्यनिर्मिती ही अबोध मनात होत असते. अबोध मन अजून विज्ञानाच्या कक्षेत आलेले नाही. शास्त्रीय किंवा वैचारिक लेखन हे सबोध मनातून उद्भवते. सबोध मन मात्र विज्ञानाच्या कक्षेत आलेले आहे. बा. सी. मर्ढेकर व प्रभाकर पाध्ये यांचे सौंदर्यशास्त्रीय लेखन अर्थातच सबोध मनातून व ललित लेखन अबोध मनातून उद्भवलेले आहे. तेव्हा त्या दोघांचे सौंदर्यसिद्धांत त्यांच्या त्यांच्या ललित लेखनाला लागू पडत असले तरी किंवा नसले तरी तो योगायोग समजावा. त्यात कार्यकारणभाव असणे शक्य नाही.

**प्रश्न - बरेचसे मराठी साहित्य अ-वास्तव आहे. तेव्हा त्याला धरून सौंदर्यशास्त्राचा ज्या भूमिका मांडलेल्या आहेत त्या चुकीच्या मानता येतील काय? (प्रा. जी. के. ऐनापुरे)**

उत्तर - बरेचसे मराठी साहित्य अ-वास्तव आहे हे आपले मत बरोबर असेल किंवा बरोबर नसेलही. मात्र वास्तवता हे साहित्याचे एक लक्षण आहे, एकमेव लक्षण नव्हे. जगातील उत्कृष्ट साहित्यातील काही वास्तव तर काही अ-वास्तव आहे. तेव्हा साहित्य हे अ-वास्तवच असते अशा भूमिकेवर आधारलेले सौंदर्यशास्त्र अपूर्ण ठरणार. त्याचप्रमाणे साहित्य हे वास्तव असते या भूमिकेवरील सौंदर्यशास्त्रही अपुरे ठरणार. थोडक्यात म्हणजे वास्तवता हे साहित्याचे एक लक्षण मानता येईल. निकष मानता येणार नाही.

**प्रश्न - श्रेष्ठ साहित्यिकाने सौंदर्यशास्त्राचे भान ठेवलेले असते का? (डॉ. भरत यादव)**

उत्तर - सौंदर्यनिर्मितीची क्षमता असणे आणि सौंदर्यशास्त्राचे भान असणे या दोन गोष्टी वेगळया आहेत. साहित्यिकाला सौंदर्यशास्त्राचे भान असल्यामुळे तो चांगले किंवा श्रेष्ठ साहित्य लिहू शकेलच असे नाही. उलट, सौंदर्यशास्त्राचे भान अजिबात नसले तरीही श्रेष्ठ किंवा चांगले साहित्य लिहिता येते. तेव्हा लेखकाला सौंदर्यशास्त्राचे भान किंवा ज्ञान आहे की नाही हा मुद्दा त्याचे लेखन बरे किंवा वाईट होण्याच्या संदर्भात

गैरलागू आहे.

**प्रश्न - श्रेष्ठ आणि लोकप्रिय असे वर्गीकरण साहित्यात असते का? त्याचे निकष वेगवेगळे असतात का? असावेत का? (डॉ. भरत यादव)**

उत्तर सर्वच वर्गीकरणे कृत्रिम असतात; मात्र अभ्यासाच्या सोयीसाठी ती करावी लागतात. हे लक्षात ठेवून श्रेष्ठ आणि लोकप्रिय असे वर्गीकरण साहित्यात रूढ आहे. श्रेष्ठ साहित्य लोकप्रिय नसते असे नाही. आजही बायबलचाच खप जगात सर्वात जास्त आहे. रामायण-महाभारत सर्वदूर लोकप्रिय आहे. मात्र लोकप्रिय साहित्य श्रेष्ठ असेलच असे नाही. थोडक्यात म्हणजे श्रेष्ठ साहित्य बहुधा लोकप्रिय असते आणि लोकप्रिय साहित्य बहुधा श्रेष्ठ नसण्याचा संभव अधिक असतो. आता इतर गोष्टी समान असतील तर केवळ लोकप्रिय साहित्यातील आशय संवेदना + भावना + विचार या त्रिविध अनुभवांनी बनलेला असतो. अश्लील साहित्यात संवेदना प्रभावी असतात, डिटेक्टिव्ह साहित्यात विचाराचे प्राधान्य दिसते, तर विनोदी साहित्यात भावनेला महत्त्व असते. म्हणजे अशा साहित्यातील आशय परिपूर्ण जीवनसत्यापर्यंत पोहोचत नाही. आता निकषांबद्दल बोलायचे झाले तर निकष वेगळे मानण्याचे कारण नाही. ते वेगळे मानणे योग्यही होणार नाही. एकाच निकषतत्त्वाच्या आधारे या दोन्ही प्रकारच्या साहित्यातील फरक स्पष्ट करता आला पाहिजे.

**प्रश्न - रसग्रहणाच्या प्रक्रियेत सौंदर्यशास्त्रीय ज्ञान हानिकारकच ठरते असे एक मत आहे. आपली प्रतिक्रिया काय? (डॉ. भरत यादव)**

उत्तर - रसग्रहणासाठी रसिकता किंवा सौंदर्यवृत्ती आवश्यक असते. ती असेल तर मग सौंदर्यशास्त्राचे ज्ञान असले तरी किंवा नसले तरी फरक पडत नाही.

**प्रश्न - बाबुराव अर्नाळकर, चंद्रकांत काकोडकर यांच्याबरोबर भालचंद्र नेमाडे, गौरी देशपांडे, श्याम मनोहर, सानिया यांचे साहित्य एकाच वाचकाला निरनिराळ्या संदर्भात आवडते. याचे स्पष्टीकरण कसे करता येईल? (डॉ. भरत यादव)**

उत्तर - माणसाचे मन गुंतागुंतीचे आहे. त्याच्या गरजा वेगवेगळ्या असतात. त्याला जेवणाची गरज असते आणि जेवणानंतर बडीशेपचीही गरज असते. जेवणानंतर लगेच जेवण नकोसे वाटते. तेव्हा बडीशेप बरी वाटते. मात्र जेवणाची जागा बडीशेप घेऊ शकत नाही. जेवण 'कंपलसरी' असते तर बडीशेप 'ऑप्शनल' असे एक स्पष्टीकरण देता येते. दुसरीही काही आहेत.

**प्रश्न - एकाच समीक्षापद्धतीने एकाच प्रकारच्या दोन कलाकृतींचा तुलनात्मक अभ्यास करून निष्कर्ष काढता येत नाही असे आपण म्हणता ते कसे? एखादे उदाहरण देऊन स्पष्ट करता येईल? (प्रा. गौतमीपुत्र कांबळे)**

उत्तर - मनोविश्लेषणात्मक समीक्षा सिग्मंड फ्राइड याने प्रचारात आणली. या समीक्षेच्या आधारे लेखकाचे आणि पात्रांचे मनोविश्लेषण करता येते. कदाचित प्रत्येक साहित्यकृतीचे असे विश्लेषण करता येईल. हे विश्लेषण वर्णनपर असते.

मूल्यमापनात्मक नसते . या पद्धतीत प्रतवारीचा उद्देशही नसतो आणि सोयही नसते . त्यामुळे बाबुराव बागुल आणि बाबुराव अर्नाळकर एकाच पातळीवर येतात . हे एक उदाहरण झाले . दुसरे उदाहरण समाजशास्त्रीय समीक्षेचे . मनुष्य आणि समाज यांचे परस्पर संबंध उलगडून दाखविणे हे या समीक्षेचे उद्दिष्ट . दोन समाजशील साहित्यकृतींची या समीक्षेनुसार तुलना करता येत नाही . अधिक समाजशील साहित्यकृती अधिक श्रेष्ठ असे म्हणायची सोय या समीक्षेत नसते . एखादा समीक्षक तसे म्हणाला तर त्याला ही समीक्षा आधार पुरवू शकत नाही . अशा इतर समीक्षा म्हणजे चरित्रात्मक , आदिबंधात्मक , रससिद्धांतात्मक , शैलीशास्त्रात्मक वगैरे . काही समीक्षक या समीक्षेनुसार साहित्यकृतीचे विश्लेषण करतात आणि मूल्यमापनात्मक विधाने करतात . ते मूल्यमापन त्यांचे स्वतःचे असते . त्या समीक्षा पद्धतीत मूल्यांकनाला आधार नसतो . मराठीतील चांगल्या चांगल्या समीक्षकांनी या समीक्षा पद्धती प्रतवारीसाठी वापरलेल्या आहेत . थर्मामीटरच्या साहाय्याने माणसामाणसांतील बरेवाईटपणा तपासण्यासारखा हा प्रकार आहे .

**प्रश्न - स्वातंत्र्य , समता , बंधुता आणि न्याय या चार मूल्यांहून आणखी वेगळे काही 'अंतिम सत्य' असते काय ? (प्रा . गौतमीपुत्र कांबळे)**

उत्तर - मानवी मन सबोध आणि अबोध भागात विभागलेले आहे . सबोध मन मानवी बोलण्याचे नियंत्रण करते . तर मानवी कृतीवर अबोध मनाचे नियंत्रण असते . म्हणून बोलण्यात आणि कृतीत फरक पडतो . हा फरक माणूस दांभिकतेने भरून काढतो . स्वातंत्र्य , समता व बंधुता ही मूल्ये किंबहुना सर्वच मूल्ये माणसाने सबोध पातळीवर- विशेषतः फ्रेंच राज्यक्रांतीनंतर - स्वीकारलेली आहेत . अबोध मनात या मूल्यांना जागा नाही . अन्यथा जगात अन्याय , हिंसा व लढाया झाल्याच नसत्या . शिवाय मनुष्यस्वभावात दोनच प्रेरणा आहेत असे फ्राइड म्हणतो . त्या म्हणजे काम आणि मोठेपणाची इच्छा . या दोन प्रेरणांशी जोपर्यंत स्वातंत्र्य , समता आणि बंधुता यांचा सुसंवाद असतो तोपर्यंत माणूस या तीन मूल्यांचा स्वीकार करतो . पण सहज प्रेरणांना ही तीन मूल्ये विरोध करू लागली की त्या मूल्यांचा तो त्याग करतो . चंगीजखान , सिकंदर , हिटलर , स्टॅलिन , इदी अमीन ही त्याची उदाहरणे . शीतयुद्धाच्या काळातील रशिया आणि अमेरिका या दोन्ही राष्ट्रांचे वर्तन स्वातंत्र्य आणि बंधुता या मूल्यांशी सुसंगत नव्हते . सारांश , ही तीन मूल्ये मनुष्यस्वभावात सहज प्रेरणांच्या स्वरूपात नाहीत . हे जीवनसत्य आहे . या व्यापक सत्याच्या पोटात ही तीन मूल्ये आहेत . म्हणजे तीन मूल्ये अधिक काहीतरी असे सत्याचे स्वरूप आहे . न्यायाचेही थोडेसे तसेच आहे .

**प्रश्न - फुले-आंबेडकर प्रणालीचे सौंदर्यशास्त्र , मार्क्सवादी सौंदर्यशास्त्र , दलित सौंदर्यशास्त्र , अब्राह्मणी सौंदर्यशास्त्र , निग्रोंचे सौंदर्यशास्त्र असे सौंदर्यशास्त्रात काही भेद आहेत काय ? असल्यास त्यांचे स्वरूप काय ? (प्रा . गौतमीपुत्र कांबळे)**

उत्तर : सौंदर्यशास्त्र हे देशकालनिरपेक्ष आहे . सौंदर्याचे व्यवच्छेदक निकष शोधून काढणे आणि सौंदर्याच्या प्रतवारीचे निकष निश्चित करणे हे सौंदर्यशास्त्राचे दोन प्रधान

प्रश्न आहेत . या प्रश्नांना उत्तरे शोधून काढण्याच्या प्रयत्नात अनेक देशांत आणि सर्व काळात प्रयत्न झालेले आहेत व होतही आहेत . त्यामुळे ग्रीक सौंदर्यशास्त्र , संस्कृत सौंदर्यशास्त्र , मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र , प्रभाकर पाध्यांचे सौंदर्यशास्त्र असे वर्णनपर प्रकार आढळतात . पण ग्रीक सौंदर्यशास्त्र हे केवळ ग्रीक सौंदर्याला लागू पडते असा याचा अर्थ नाही . जगातील एकाही सौंदर्यकृतीला ते लागू पडत नसेल तर त्याचा उपयोग नाही . अर्थशास्त्रामध्ये 'भारतीय अर्थशास्त्र' असा एक पोटप्रकार आहे . त्यात अर्थशास्त्राचा भारतीय संदर्भात अभ्यास किंवा उपयोजन केले जाते इतकेच . भारतीय अर्थशास्त्र हे जागतिक अर्थशास्त्राच्या पोटात आहे . बाहेर नाही . विरोधही नाही .

आपण उल्लेख केलेली वेगवेगळी सौंदर्यशास्त्रे जागतिक स्थलकालनिरपेक्ष सौंदर्यशास्त्राचा पोटभाग म्हणून काम करीत असतील तर पोटभागाची नावे म्हणून हे भेद मानता येतील . पण जागतिक सौंदर्यशास्त्राला समांतर म्हणून काम करीत असतील तर मग त्यांना सौंदर्यशास्त्रीय प्रश्नांची स्थलकालनिरपेक्ष अशी उत्तरे देण्याची जबाबदारी स्वीकारावी लागेल . समजा , अशी उत्तरे त्यांनी दिली आणि ती निरपवाद असली तर संपूर्ण जागतिक सौंदर्यशास्त्र त्या समांतर सौंदर्यशास्त्रात विलीन होऊन जाईल .

थोडक्यात म्हणजे सौंदर्यशास्त्राचे विशेषण कोणतेही असो त्याचा विषय जागतिक सौंदर्य हाच असला पाहिजे . उद्या एखादा अब्राह्मण सौंदर्यशास्त्रज्ञाने अब्राह्मण सौंदर्यशास्त्र निर्माण केले तर ते ब्राह्मण , मुसलमान , इंग्रज किंवा चिनी लेखकाच्या साहित्याला लागू पडले पाहिजे . मग त्याचे नाव अब्राह्मणी सौंदर्यशास्त्र हे असले किंवा नसले तरी चालेल .

**प्रश्न - सौंदर्यशास्त्र आणि समीक्षाशास्त्र ही वेगवेगळी आहेत का ? (प्रा . विजय पाटील)**

उत्तर - होय . आपण साहित्याचा विचार करतो तेव्हा समीक्षेत प्रवेश करतो आणि समीक्षेचा विचार करतो तेव्हा सौंदर्यशास्त्रात प्रवेश करतो .

**प्रश्न - प्रत्येक विचारधारेच्या भिन्नतेनुसार सौंदर्यशास्त्रातील निकष हे भिन्न असतात का ? असतील तर आंबेडकरी सौंदर्यशास्त्र हा प्रकार अलिकडे मानला जातो त्याबद्दल आपले मत काय आहे . (अरुण मिरजकर)**

उत्तर - विचारधारेनुसार सौंदर्यशास्त्रातील निकष भिन्न असत नाहीत . आता आंबेडकरी सौंदर्यशास्त्र याचा अर्थ आंबेडकरांच्या अनुयायांनी देशकालनिरपेक्ष अशा जागतिक सौंदर्यशास्त्रात घातलेली भर असा असेल तर त्याचे सहर्ष स्वागत आहे .

(प्रा . गौतमीपुत्र कांबळे , १४ शास्त्रीनगर , सांगली ४१६४१६)

०००

अनुक्रमणिका

डॉ. नीलिमा गुंडी

# चाळ : साहित्यकृतींतील प्रतिबिंब

साहित्यकृतींमधे भोवतालच्या वास्तवाचे सामाजिक संदर्भ कलाकृतीच्या गरजेनुसार शोषले गेलेले असतात . साहित्यकृतींमधे झिरपले गेलेले सामाजिक संदर्भ शोधणे आणि त्या संदर्भाचे कोणकोणते पैलू कलाकृतींच्या प्रकृतीनुसार कसकसे आविष्कृत झाले आहेत हे अभ्यासणे , शक्य आणि आवश्यक आहे .

नवसाहित्यात ' चाळ ' हा सामाजिक घटक अनेक साहित्यकृतींना जीवनद्रव्य पुरविताना दिसतो . मुंबईसारख्या महानगरात मध्यमवर्गीयांची वस्ती १९४० च्या सुमारास मुख्यतः चाळीतच होती . त्यामुळे सुरुवातीला तरी महानगरी संवेदना व्यक्त करणाऱ्या साहित्यात चाळीचे दर्शन कोठे ना कोठे तरी घडतेच .

**नवकथेतील चाळ :**

नवकथाकार म्हणून मान्यता पावलेल्या गंगाधर गाडगीळांनी ' किडलेली माणसे ' लिहिताना गिरगावच्या चाळीतील माणसांवर प्रकाशझोत टाकला . काही वेळा वेगवेगळ्या काळातील कलाकृतींमधे अनुबंध सापडतो . तसा ' किडलेली माणसे ' आणि ना . सी . फडके यांच्या ' माणूस जगतो कशासाठी ? ' या कथेमधला (प्रसिद्धी-१९३५) नायक भास्कर यांच्यात अनुबंध जोडता येतो . फडक्यांनी त्या कथेत जगण्यातील गुंतागुंत तशी काहीशी पूर्वनियोजित पद्धतीने दाखविल्यासारखी वाटते . तरीही नवकथेच्या दिशेने जाऊ शकणारी त्यातील भास्करची मानसिकता फडके चांगली चित्रित करतात . कोणतेही तात्कालिक कारण नसताना आत्महत्या करू इच्छिणारा त्यातील भास्कर हा कनिष्ट मध्यमवर्गीय अशा (मुंबईच्या) चाळीतील रहिवासी आहे . भास्करचे चित्रण करताना फडक्यांनी निव्वळ पार्श्वभूमी म्हणून नव्हे तर त्याच्या नैराश्याची मुळे शोधण्याचा प्रयत्न म्हणून त्याच्या चाळीचे थोडक्यात वर्णन केले आहे . ते असे: माटुंग्याच्या एका चाळीच्या तळमजल्यावरील लहानशा खोलीत भास्कर रहातो . तेथे पावसाचे पाणी साठलेले असते . हॉटेलातल्या तळकटांची घाण सुटलेली असते . दारिद्र्य आणि गलिच्छपणा यांचे जणू ते साम्राज्यच असते .

फडक्यांच्या या कथेतील भास्कर दामले (त्याच्या चाळीसकट) एक प्रकारे ' किडलेली माणसे ' तील पात्रांचा पूर्वज आहे . बंदिस्त चाळीत दडपली जाणारी सौंदर्यदृष्टी आणि जीवनेच्छा यांचे दर्शन त्यांच्या जगण्यातून घडले आहे .

गाडगीळांच्या कथेत केंद्रस्थानीच आली आहे एक चाळ - " पेरूवाडीतील खुटमुट्यांची चाळ म्हणजे महाराष्ट्रातील मध्यमवर्गीय संस्कृतीचा सुपीक मळा!" 'मवाली दुकान फोडताहेत ' या घटनेमुळे चाळीत निर्माण झालेले नाट्य या कथेत चलत-चित्रशैलीत साकार झाले

आहे . जातीय दंगलीच्या घटनेचा प्रकाश जेव्हा या चाळकरी कारकुनांच्या जगण्यावर पडतो तेव्हा त्यांच्या रक्तातील अंधाऱ्या पेशीसुद्धा जणू दिसू लागतात . त्यांच्या जीवनातील कोतेपणा आणि चिवटपणा , निष्क्रिय अलिप्तता आणि त्यांचे पोरकट कुतूहल , त्यांचे सूक्ष्म मनोगंड आणि त्यांचे परस्परांशी असलेले संबंध - या साऱ्यांना कथेत स्थान मिळते . येथे चाळीची ' गॅलरी 'च केंद्रबिंदू ठरते , कारण बाहेरच्या व्यापक जीवनानुभवाच्या संदर्भात चाळीकडे लक्ष वेधायचे आहे . त्यामुळेच कथेतील निवेदनाचा सूरही काहीसा कडवट उपरोधिक झाला आहे . अर्थात चाळीच्या मुशीतून आकाराला येणाऱ्या जीवनदृष्टीविषयी लेखकाला वाटणारे असमाधान त्यातून जाणवत रहाते .

**नवकविता आणि चाळ :**

चाळीसारखा गद्यविषयही काव्यात अंतर्भूत होण्याची किमया नवकवितेने घडवून आणली आहे . नवकाव्यामागील संवेदन ज्या जीवनानुभवांशी निगडीत होते , त्यांचा अटळ ठसा काव्यात उमटणे साहजिक होते . त्यामुळे मर्ढेकरांनी चाळीशी निगडीत असे पारंपरिक सौंदर्यकल्पनेशी विसंगत विश्वही नाकारले नाही . उलट त्यातील असुंदरतेसकट जीवन कसकसे रंग बदलत असते , हे त्यांनी जाणले होते . ' आला आषाढ-श्रावण ' मधे पावसाच्या स्पर्शाने वातावरणात उमटणारी कोवळी थरथर वस्तुजाताला कसे संजीवन देते , हे सांगताना त्यांना चाळ आहे त्या रूपातही ' काव्यात्म ' वाटली आणि " चाळीचाळीतून चिंब ओली चिरगुटे झाली " सारख्या ओळी ते लिहून गेले .

पाडगावकरांच्या ' विदूषक ' मधेही काही कवितांत चाळ अध्याहृत आहे . कारण पाडगावकरांनी स्वप्नाचे रंग उडालेल्या मध्यमवर्गीयांच्या गद्य जीवनाचे त्यात दर्शन घडवले आहे . त्यांची त्यातील ' अलीकडे पलीकडे ' ही कविता अशाच एका चाळीत रहाणाऱ्या सामान्य माणसाच्या जीवनातील स्वप्न आणि वास्तवता दरम्यानचे अंतर टिपते . कवितेतील ' त्याचा चष्मा ' हा जणू स्वप्न आणि वास्तव यांच्या पातळ्यांतील अंतर कायम ठेवणारा अभेद्य पडदा ! त्यामुळे , " चाळीच्या जिन्यापाशी ती वादल्या भरताना मनातल्या मनात तिचा गालगुच्चा घेतला होता . हे सगळे चष्म्याच्या अलीकडे-चष्म्याच्या पलीकडे श्रीकृपेकरून त्याचे बँडसकट लग्न झाले . "

अशा पद्धतीने चाळीच्या दोन खोल्यांत आयुष्य काढलेल्या त्या कुणा एकाचे जीवन , कारुण्य आणि उपहास यांचे उचित सूर जुळवत कवी उभे करतो . एका प्रकारे तिथल्या शंभरातल्या नव्व्याण्णवांचेच ते जीवनचित्रण असते .

**विनोद १ - नाट्यानुभव आणि चाळ :**

चाळीतील अनेक माणसांचे विविधरंगी जीवन , खासगीपणाचा फारसा वाऊ नसलेले तेथील शेजाऱ्यांचे परस्परसंबंध - हा जीवनानुभव विनोदाला जास्त पोषक ठरतो . विनोदाला व्यक्तीभोवतीचा सामाजिक नातेसंबंधाचा परीघ आधक मानवतो . पु .ल .देशपांडे यांची ' बटाट्याची चाळ ' याच पद्धतीने साकारली आहे . कधी एकमेकांशी कचाकचा भांडणारी , कधी स्वार्थापोटी तर कधी माणुसकीपोटी एकमेकांना धरून रहाणारी मंडळी म्हणजेच भावपूर्णता . नाट्य आणि विनोद यांना योग्य ते अनुभवद्रव्य ! पु .ल .देशपांडे यांनी या चित्रणात

चाळीचे जे सांस्कृतिक धन आहे , ते खुबीदारपणे वापरले . झेड् . विष्णुमूर्ती , आचार्य बाबा बर्वे अशा व्यक्ती , ' दणकवली ' ' पोबुऱ्याचा पंपू ' अशा कादंबऱ्यांतून तत्कालीन वातावरणाचे भान सूचित होते .चाळीतील माणसे ज्या स्थलकालाच्या चौकटीत वावरत होती , ती चौकट भारून टाकणारे जातिविशिष्ठ सांस्कृतिक संचित पु .ल .विडंबनातून उभे करीत गेले . " चाळीची विशिष्ट संस्कृति म्हणजे आपण सर्व ! व्यापक अर्थाने पाहावयाचे म्हणजे हा चौक , ते नळ , त्या दारांत दिसणाऱ्या तुळशीच्या कुंड्या , वनस्पतींच्या डब्यात टांगलेल्या त्या चिमुकल्या वनस्पति , ते वाळत घातलेले कपडे ! " (बटाट्याची चाळ पृ . १३ ) असे एकीकडे म्हणत लेखक प्रत्यक्षात या वरवरच्या लक्षणांपलीकडच्या सांस्कृतिक वैशिष्ट्यांना स्पर्श करतो . बटाट्याच्या चाळीतील विनोदाचा अंतःस्तर असा तत्कालिन मध्यमवर्गीयांच्या आचारविचारांवर ठसा उमटवणाऱ्या व्यक्ती आणि कलाकृती , पुस्तके , गाणी इ . यांच्या विडंबनाची निगडीत आहे आणि तेच त्याचे सामर्थ्य आहे . रंगमंचावर चाळ साक्षात करण्याचे श्रेय पु . ल . यांच्या अभिनयकौशल्यालाही आहे .

एकीकडे परंपरेचा चिवट पीळ भोवताली काहीसा आवळलेला आहे आणि त्याचमुळे सुरक्षितही वाटत आहे , ही चाळकऱ्यांची जगतानाची स्थिती चित्रित करताना क्षुद्रपणा ते कारुण्य , या रंगपटातील अनेक छटा व्यक्त होत जातात . पु . ल . यांच्याप्रमाणेच श्री . ना . पेंडसे , सई परांजपे , जयवंत दळवी इ . इतर मंडळींनीही हा अनुभव नाट्यरूप केला आहे . या नाट्यानुभवाला ' प्रहसन ' हा नाट्यप्रकार अधिक जवळचा ठरला आहे .

**विनोद २ - कथा आणि चाळ :**

विनोदी कथांमधेही चाळ ठळकपणे दिसते . रमेश मंत्री यांच्या ' मी मांजर झालो ' या कथेतील चाळीचे चित्रण येथे आठवते . फन्टसीच्या पातळीवर लिहिलेल्या या कथेतही अद्भुताची पातळी म्हणजे वास्तवाकडे पहाण्यासाठी साधलेला एक दिश कोन आहे . कथेचा नायक आहे मध्यमवर्गीय चाळकरी कारकून चाकोरीबद्ध आयुष्याला कंटाळलेल्या अशा मंडळींच्या अतृप्त इच्छा पूर्ण करण्याच्या एक मार्ग म्हणजे फॅन्टसीचे तंत्र येथे वापरले आहे . भोवतालच्या चाळकऱ्यांच्या वर्तनक्रमातील विसंगतींचा उपहास , हे त्या कथेतील एक महत्त्वाचे सूत्र आहे . सामाजिक निर्बंधांतून मुक्तता अनुभवण्यासाठी आदिम प्राणीपातळीवर जाऊन ( मांजर होऊन ) अनुभवलेले जीवन येथे रेखाटले आहे . मांजर असल्यामुळे सर्वत्र प्रवेश मिळाल्यावर चाळीच्या आणि स्वतःच्या जीवनातील काही छुपी रहस्येही उजेडात आली आहेत . अद्भुत आणि वास्तव यांची मानसशास्त्रीय दृष्ट्या सुसंगत अशी सरमिसळ करीत ही कथा , सुसंस्कृतपणाच्या ओझ्याखाली दबणाऱ्या कुणा एका बिचाऱ्या चाळकऱ्याचे संमिश्र ढंगात चित्रण करते . अर्थात , जरा ' कात टाकून ' जगू पहातानाही त्याचा मूळचा साधाभोळा चेहरा लपत नाहीच !

**कादंबरी आणि चाळ :**

' लव्हाळी ' ही श्री . ना . पेंडसे यांची कादंबरी चाळीचे आणि त्यातील व्यक्तींचे चित्रण उपहासापलीकडे जाऊन करू पहाते . चाळीतून टिचभर आकाश बघणाऱ्या या लोकांच्या मनाची क्षितिजे कशी रुंदावणार ? पण म्हणून ती केवळ उपहासविषय किंवा दयनीय ठरतात ; असेही नाही . ' लव्हाळी ' हे शीर्षक येथे जिवटपणा या वृत्तिवैशिष्ट्याचे प्रतीक होऊन येते .

डायरीवजा पद्धतीने लिहिलेली ही कोणा एका चाळकरी तरुणाची आत्मकथा आहे. एकीकडे जागतिक महायुद्ध, भारतीय स्वातंत्र्यसंग्राम आणि दुसरीकडे स्वतःच्या छोट्या वर्तुळातले प्रश्न - यांच्यातील अंतर जाणवावे, असे त्यातील लेखन आहे. बाहेरचे प्रश्न क्वचित छोट्या वर्तुळात तरंग निर्माण करतात. पण फार मोठी उलथापालथ होत नाही. वेताच्या कर्तृत्वाचा, घरापासून मनाने दुरावलेला, चाळीतल्यांसाठी धावणारा असा हा नायक, कादंबरीच्या सुरुवातीलाच स्वतःचे सहावे बोट ऑपरेशन करून काढलेल्या अवस्थेत हा नायक सामोरा येतो. त्याचे इतरांपेक्षा असलेले वेगळेपण सांगणारे हे जन्मजात वैशिष्ट्य असे नष्ट झाल्यामुळे तो आता चाळीच्या चौकटीत मावणारा झाला असावा!

'लव्हाळी'त' शेंववेकरांची चाळ' ही चांगली उभी राहिली आहे. त्यातील 'स्टडी सर्कल' 'क्रेडिट सोसायटी' इ. मुळे सामुदायिक जीवनाचे संदर्भ त्यात तपशीलवार येतात. तसेच जातिनिहाय कप्प्यांमधल्या हळव्या जागाही चित्रित होतात. शेवटी भारताला स्वातंत्र्य आणि नायकाला जागा (चाळीतलीच!) मिळते. हा सर्व प्रवास आणि त्यातील चढउतार यामागे जिवटपणाच्या ठळक रंग आहे. मनाने काहीसा साधाभोळा असा हा नायक 'पाप जादा झालं की परमेश्वर माणसाला चाळीत रहायला पाठवतो की?' असे एकीकडे म्हणतो आणि तरीही चाळीतच रहातो. चाळीविषयीची ही प्रेमद्वेषसंबंधाची गुंतागुंत त्याच्या परिस्थितिजन्य मर्यादांतून निर्माण झालेली आहे.

**समारोप :**

आज चाळकरी मध्यमवर्गीय माणूस आर्थिक सांस्कृतिकदृष्ट्या बदलला आहे. स्त्रीचे, अर्थार्जन, व्यक्तिस्वातंत्र्याच्या जाणिवेतून खासगीपणाची जाणवणारी निकड, बदलती जीवनमूल्ये आणि सौंदर्यमूल्ये यांमुळे चाळीऐवजी अपार्टमेंटस् निर्माण होत आहेत. हा एक प्रकारे एका जीवनसंवेदनेलाच निरोप आहे. आज वरील सर्व कलाकृती एकत्रपणे लक्षात घेता चाळकऱ्यांचा 'भोळाभावडा' चेहरा या विविध वाङ्मयप्रकारांना सारखाच जवळचा वाटलेला दिसतो. क्वचित हा चेहरा ओरवडण्याचाही प्रयत्न झाला. कधी प्रहसनांमधे अतिरंजिततेसाठी चेहरा वटवटीतही केला गेला. तरी सर्वसाधारणपणे एका सहानुभावातून हे लेखन केलेले दिसते. उपरोध, उपहास, विडंबन, दया, करुणा अशा विविध दृष्टिकोनांतून हे चित्रण झालेले दिसते. चाळकऱ्यांचे सामाजिक जीवन आणि त्यातील भांडणे, ही वरवर विनोदविषय असली तरी त्याचवेळी माणसामाणसांतील संबंधांचे खुलेपण आणि त्यातील प्राकृतिक रंग व्यक्त करणारी होती. त्यातून भाषेचेही विभ्रम प्रकट झाले. विशिष्ट कालिक सामाजिक चौकटीतील जीवनपटाची ही वाङ्मयात उमटलेली प्रतिबिंबे, आज साहित्य आणि सामाजिक, वास्तव यांच्या नात्याविषयीही प्रश्न निर्माण करतात. चाळ' आतून' नि 'बाहेरून' दाखवणारे हे साहित्य काही काळानंतर बदलत्या पर्यावरणात परके, दूरचे वाटणार! अशा वेळी सामाजिक वास्तवांचे फॉसिल्स म्हणून याकडे पाहावे लागेल का? सामाजिक शास्त्रांचे अभ्यासक कदाचित तसे पहातीलही! वाङ्मयाच्या अभ्यासकाला मात्र यातील (नगण्य अशा सामान्य माणसाचे जगण्यात रमताना काढलेले चित्रण, 'एका सार्वकालिक सत्याचे अंशरूप दर्शन घडवत राहील' यात शंका नाही.

**संदर्भ -**
१) कडू आणि गोड : गंगाधर गाडगीळ, प्रका. विमल चित्रे, वडोदे, १९४८
२) किर्लोस्कर कथा : भाग ४. ('तुम्ही मांजर व्हा' कथा समाविष्ट) संपा. किर्लोस्कर, कोलारकर, किर्लोस्कर प्रकाशन, पुणे १९७९
३) वटाटघार्ची चाळ : पु. ल. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई १९५८.
४) बावनकशी : ना. सी. फडके, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे १९६२
५) मर्ढेकरांची कविता : बा. सी. मर्ढेकर, मौज प्रकाशन, मुंबई आ.१. पुनर्मुद्रण, १९६९
६) ल्व्हाळी : श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन, मुंबई १९६६
७) विदूषक : मंगेश पाडगावकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९६६

( डॉ. नीलिमा गुंडी, ३ 'अन्नपूर्णा', १२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे २)

## इस्लामपूर येथे ८ वे विभागीय संमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे व राजारामबापू पाटील ज्ञानप्रबोधिनी यांच्या संयुक्त विद्यमाने शनिवार दि. १३ व रविवार दि. १४ जानेवारी १९९८ रोजी इस्लामपूर येथे आठवे विभागीय संमेलन अतिशय उत्साहात पार पडले. विशेष म्हणजे या संमेलनात केवळ साहित्य आणि साहित्यिक यांनाच महत्त्व होते. महाराष्ट्रातील थोर विचारवंत प्रा. डॉ. रावसाहेब कसबे हे या संमेलनाचे अध्यक्ष होते. आमदार जयवंतराव पाटील यांनी संमेलनाचे उद्घाटन केले. श्री. दिलीपराव पाटील यांनी सर्व उपस्थितांचे यथोचित स्वागत केले. येथील परिषदेचे अध्यक्ष प्रा. शामराव पाटील यांनी प्रास्ताविक केले. दोन दिवस चाललेल्या या संमेलनात साहित्यविषयक अनेक कार्यक्रम संपन्न झाले.

मृत्युंजयकार श्री. शिवाजी सावंत यांची उपप्राचार्य व समीक्षक मा. अविनाश सप्रे यांनी प्रकट मुलाखत घेतली. 'साहित्य आणि अभिरुची' या विषयावर प्राचार्य हरिश्चंद्र निर्मळे यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवादही झाला. या परिसंवादात श्री. हरी नरके, पुणे, प्रा. डॉ. अच्युत माने, निपाणी व प्राचार्य शिवाजीराव कुंभार यांनी भाग घेतला.

'स्त्रियांची आत्मचरित्रे, सामर्थ्य व मर्यादा' या विषयावर डॉ. अनुराधा गुरव यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. यामध्ये डॉ. कल्याणी दिवेकर, पुणे, प्रा. शैला सायनाकर व प्रा. दीपा देशपांडे, इस्लामपूर यांनी आपली मते हिरीरीने मांडली.

प्रसिद्ध कवी श्री. रामदास फुटाणे, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली निमंत्रितांचे व नवोदितांचे कविसंमेलनही बहारदार झाले. यामध्ये कवी विलास माळी, उद्धव कानडे, राजकुमार कवठेकर, प्रकाश पठारे, शंकरराव साळुंखे, राजेंद्र टिळे, प्रा. दीपक स्वामी, मोहन पाटील, तसेच डॉ. निशिकांत श्रोत्री, डॉ. शंतनु चिंधडे, चंद्रकांत देशमुख, राम गोसावी, नारायण सुमंत, प्रा. प्रदीप पाटील इत्यादी व मान्यवर कवींनी आपल्या कविता सादर केल्या. रामदास फुटाणे यांच्या मिस्किल निवेदनाने कविसंमेलनाचा कार्यक्रम अतिशय रंगला.

समारंभाच्या प्रारंभी महाराष्ट्र फौंडेशनचा कॉन्टिनेंटल प्रकाशनास एक लाख रुपयांचा पुरस्कार मिळाल्याबद्दल श्री. रत्नाकर कुलकर्णी यांचा तर मूर्तिदेवी पुरस्कार मिळाल्याबद्दल श्री. शिवाजी सावंत यांचा सत्कार करण्यात आला.

या संमेलनाच्या यशस्वितेसाठी प्रा. डॉ. मधुकर हसमनीस, प्रा. शामराव पाटील, श्री. दिलीपराव पाटील, प्रा. शरद भोसले, श्री. धोंडिराम सलगर, प्रा. प्रदीप पाटील, प्रा. दीपा देशपांडे, श्री. शहानवाझ मुल्ला, श्री. सदानंद बोंगाणे, प्रा. दशरथ पाटील, श्री. गोपाळराव सवनीस सदस्यांनी भरपूर परिश्रम घेतले.

ooo

संकलन - म. श्री. दीक्षित

# केशवराव भोळे यांची 'विमल' पत्रे

*'प्रभात'चे प्रसिद्ध संगीतदिग्दर्शक आणि संगीत समीक्षक केशवराव भोळे यांच्या २३ मे १९९६ रोजी येणाऱ्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांची सात निवडक पत्रं प्रसिद्ध करीत आहोत. केशवराव 'प्रभात' सुटल्यानंतर आकाशवाणी (मुंबई) येथे काही वर्षे अधिकारपदावर होते. त्याच काळात श्रीमती विमल चोरघडे याही आकाशवाणीमध्ये अधिकार पदावर होत्या. दोघांच्यात चांगला स्नेहसंबंध जडलेला होता. विमलबाईंच्या बदल्या होत. एकदा त्या लंडनलाही गेल्या होत्या. १९५६ ते ५८ या दोन वर्षात केशवरावांनी मायाममतेने विमलबाईंना ही पत्रं पाठवली आहेत ती त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर, स्वभावावर आणि कर्तृत्वावर चांगला प्रकाश टाकतात. त्यांची वऱ्हाडी मोकळी लेखन शैलीही त्यांमधून दिसून येते. शेवटचं १९७४ मधलं छोटं पत्र सेवानिवृत्तीनंतरचं असलं तरी बोलकं आहे. केशवरावांच्या सान्निध्यात आलेल्या व्यक्तीविषयी या पत्रांमधून जो अभिप्रायवजा मजकूर आहे तो सुद्धा अर्थपूर्ण आहे. एका श्रेष्ठ संगीतकाराचे या पत्रांमधून होणारं खुलंखुल्ला दर्शन वाचकांना उद्बोधक वाटेल.*

*ही पत्रं आम्हाला श्री. म. श्री. दीक्षित यांच्यामार्फत मिळाली. सौ. विमल चोरघडे (केळकर) यांच्या संमतीने आम्ही ती प्रसिद्ध करीत आहोत. - संपादक*

१

९-डी, मॉडेल हाऊस
प्रॉक्टर रोड, मुंबई ४
२४/११/५६

सा. आशीर्वाद

फार आनंद झाला तुझे पत्र वाचून! तुला निघण्यापूर्वी भेटायला मलाच जमले नाही. त्याबद्दल रागावली नाहीस हे बरे झाले. गोंडोला मी काही प्रत्यक्ष पाहिली थोडीच! पण तिच्याविषयी खूप वाचले. फोटोही पाहिले, अन् एकदा स्वप्नात पाहिली - ते वर्णन तुला केले होते. (मनी वसे ते स्वप्नी दिसे - या कायद्यानुसार) व्हेनिस म्हटले की इतिहासातील कितीतरी रम्य घटना त्याच्याशी निगडीत झाल्या आहेत त्या आठवतात. पण ते तू स्वतः पाहिलेस! त्याचप्रमाणे पॅरिसही! फ्रेंच लोक 'पारी' म्हणतात ना! पाहिलेस ना! ह्या शहरावर जगातील धनाढ्यांचे, चैनी रंगेल लोकांचे फार प्रेम. 'मजा मारायला तिथे जाणं' ही त्यांची चटक Stephen Leacock ने चांगलीच वर्णिली आहे. (Parisian Past times मधे) पॅरिसमधे मुले त्याला गरीबांच्या वस्तीत दिसली. बड्या स्त्रियांच्या मांडीवर 'कुत्री' दिसली. त्यांना लागणाऱ्या उपकरणांची, वस्त्रांची दुकाने तिथे फार आहेत असेही तो लिहितो काय फाजील झाली आहेस! ते Clubs पाहून! काय वाटले गं तुला! खरंच काय वाटले असेल तुला? स्त्री ची विटंबना तुला आवडली का? आमच्या राजेमहाराजांचे हे आवडते शौक होते. प्रजेला पिळून त्यांनी हे शौक केले. अजूनही करीत आहेत. Prince Ali Khan आगाखान यांचे हेच धंदे आहेत. Lido ची मात्र मौज वाटते हं. खरेच कसे अचाट करतात ते त्यांचे तेच जाणोत.

प्रत्यक्ष वर्णन करण्यापेक्षा लिहिशील तर बरे होईल . समक्ष किती म्हणून सांगशील ? तुझा हा उपद्‌व्याप मला फारच आवडेल . अर्थात वेळ साधून करीत जा !

Staff Training मधे तुझा अभ्यास चांगला चालला असेल . तूं तशी हुशार चुटचुटीत आहेस . तिथले सगळे संयोजन बारीक नजरेने पाहून ये . आम्हाला हे सगळे यायला आमचा आळस आणि बेफिकीरपणा सोडला तरच ते येईल . तेथे वर्षाचा सवाल काय ? इंग्रज गेल्यावर त्यांचे सद्‌गुणही पटकन् आम्ही विसरलो . आम्ही राज्यकर्त्यांच्या भीतीनेच ते घेतले होते म्हणा ! ते टिकायचे कसे ? मूळ वृत्ती आळसाची , चालढकलीची !! AIR मधे आपल्या (तुझ्या माझ्याही) हयातीत ते येणे कठीण दिसते ! तेथे पाहिजे जातीचे !! स्वराज्यात आमचा आळस वाढला आहे . आमच्या मूळ वृत्ती सुधारल्या पाहिजेत . त्याकरता काही काळ तरी येथे 'लाल' राज्य पाहिजे . लोकांना फटके मारून कामाला लावले पाहिजे . तुझी प्रकृती चांगली आहे ना ? छान ! पण हे पिणे काय गं ? काय पितेस गं ऽ पोरी ? जरा बेताने बेताने ! Claret, Beer वरंच भागव . जॉनी वॉकरशी लगट करू नकोस हं ! ती सवय मोठी वाईट हं ! अभ्यास खूप कर . नाव मिळवून ये . आम्हाला तुझी लंचच्या वेळी रोज आठवण येते . तुझ्या गैरहजेरीत Clara अगदी बावरलेल्या हरिणीसारखी असते . पोरकी ! बिचारी !! तो खवीस (वैद्य) तिला मधेच छळित असतो . तिची आई मधे पुन्हा आजारी होती . लग्न होऊन जाईल तर सुटेल या हालांतून . पण ते कसे होणार ? संसार चांगला करेल . जातीच्या बाहेर जायला नको तर लवकर कसे होणार ? मला तिची फार काळजी वाटते . तुझी उणीव मी भरून काढण्याचा प्रयत्न करतो , पण मला सर्व तिच्याजवळ कसा काढता येणार ! तिला पत्रे लिहून जरा खतपाणी घाल . मूर्तीसाहेब महिनाअखेर जाणार . सोमवार , मंगळवार त्यांना पार्टी आहे . आज ज्योत्स्नाबाई त्यांना भेटून आल्या . माझी बरीच तारीफ केली त्यांनी तिच्याजवळ . तू सांगितलेल्या नगरकरांच्या नालस्तीच्या गोष्टी त्यांनी तिला सांगितल्या . अर्थात नाव वगळून ! तुला ते माझ्याबद्दल खूप विचारीत . आठवते ना ? तू मात्र माझ्याबद्दल त्यांना खरे ते सांगून त्यांचा गैरसमज दूर केलास ही फार मोठी कामगिरी केलीस ! तुझे आभार मानल्यास तुला आवडणार नाही . म्हणून लिहीत नाही तसे नवे नाटक 'धाकटी आई' चांगलेच उतरले आहे . प्रेक्षक खूष आहेत . उद्या दुसरा प्रयोग ! दुर्गाचे व लहान मुलाचे काम चांगले वठते ! सजावट वगैरे उत्तम आहे . क्लॅराने अजून पाहिले नाही . पुढील महिन्यात नागपूरला मुक्काम आहे . महिना दीडमहिना तरी होईल तो मुक्काम ! माझे ठीक चालले आहे . ऑफीसमध्ये काम झाल्यावर मी घरी येतो . तेथे कोणाशी बोलणार ? सगळे हल्ली खूप कामात असतात . त्यांचा वेळही जायला नको . अन् माझाही ! वाचन करतो . 'शेषेर परिचय' वाचित आहे . चांगली आहे . Importance of Living चे पुन्हा पुन्हा पारायण करतो . वाचावे तितके जास्तच समजू लागले आहे . तू वाचले नसल्यास जरूर वाच . It is a most beloved book! दिवाळी अंक यंदा बरे निघाले आहेत . 'साधने 'चा अंक सर्वोत्कृष्ट ! बाकी मौज , सत्यकथा ठीक . बाकी also ran पैकी ! एखाददुसरा लेख बरा ! गिजुभाई व्यास येथे आले होते . जरा ' दुबले ' हो गए है . पी . एल . वगैरे ठीक . यंदा पाऊस अजून संपत नाही . दिवाळी आम्ही पावसांत घालवली . घरच्या लोकांनी माझी एकसष्ठी साजरी केली . मी त्या रात्री गायलो . अन् सर्वांना थक्क केले ! बाकी तसं विशेष नाही . पत्र यावे . प्रकृतीला जपावे . आ . केशवराव



अनुक्रमणिका

२

मुंबई ४
१३/२/५८

चि. विमलास सप्रेम आर्शीर्वाद,

तुझे पत्र येऊन बरेच दिवस झाले. तुझे पत्र मला उघडलेलेच मिळाले. ते शिपायाने चुकून उघडले म्हणे. मी अर्थात कडक ताकीद दिली आहे. पण मला असे वाटते की यापुढे मला तू घरच्या पत्त्यावरच ( ९-डी मॉडेल हाऊस - प्रॉक्टर रोड, मुं. - ४) पत्र टाकणे श्रेयस्कर ठरेल. तुझे पत्र वाचून समाधान वाटले. आम्ही तिघांनी (मी, ज्योत्स्नाबाई, क्लॅरा) तुला जिव्हाळ्याने, अगदी आपल्या माणसासारखे वागविले (तुला ते रुजू झाले) हे खरे आहे. परंतु हे परस्पर आहे. तू ही आमच्याशी अगदी जिव्हाळ्याने वागू लागलीस आणि हे होत होत गेले. मला आता गैरहजेरी जाणवू लागली आहे. नागपूर वऱ्हाडी साधी, सरळ निष्कपटी पण माणुसकीने ओथंबून भरलेली माणसे मला फार आवडतात. जिव्हाळ्याची दोनच माणसे मला आता येथे आहेत. (क्लॅरा आणि अंभईकर) मला मुलांचे ऐवजी मुलीच फार आवडतात. लहानपणी बरोबरीच्या मुलांनी मला फार दुष्टपणाने वागविले आहे. मी नाजूक होतो व मला पाच वर्षे सारखा ताप येत असे. त्यामुळे मुलांची अनिवार दांडगाई - मारामारी सहनच होत नसे. पण मुलींनी मात्र फारच मायेने व हळुवारपणे वागवले. ते संस्कार अजूनही कायम आहेत. तुला सध्या पुष्कळ वेळ आहे. तेव्हा आवडीच्या विषयावर व्यासंग कर. खूप वाच - चिंतन कर लिही. मराठी लोकांना, भाषेला मौलिक लिखाणाची फार गरज आहे सध्या. शिवाय आपल्या वाङ्मयातील दर्जेदार वाङ्मयाचे हिंदी व इंग्रजीमधे रूपांतर होण्याची आवश्यकता आहे. नुकतेच आ. रा. देशपांडे यांचे यवतमाळ येथे व्याख्यान झाले. त्यात या मुद्यावर ते विस्तृत बोलले. तू हिंदीत पुष्कळ लिहू शकशील. शिवाय संगीत मासिकांतही तुझे लिखाण यावे. तुझा तो अभ्यास झाला आहे व वेळही आहे म्हणून लिहीत आहे. रेडिओ सप्ताह चांगला झाला. कार्यक्रम - काव्यवाचन - गायन - सुगम संगीताचा कार्यक्रम चांगले झाले. शास्त्रीय संगातामध्ये मालविका रॉयने चांगले कार्य केले. तिने हमीर चांगलाच गायला. लक्ष्मीशंकरने केदार किंचाळून दळून काढला. निस्सार हुस्सेनपेक्षा हफीज चांगला गायला. सासऱ्याने पूरिया गातांना मारव्यासारखा रिषभ वारंवार लावून चमत्कार करून दाखविला. काव्याच्या( इ. स. १८८५-१९२०) कार्यक्रमामधे अध्यक्ष वा.ल. कुलकर्णी यांनी या काळातील नव कविता केशवसुतांनी कशी लिहिली व तिची छाप पुढील कितीतरी येणाऱ्या पुढील कवितांवर टिकून राहिली हे चांगले स्पष्ट केले. ज्यांच्या कविता वाचल्या वा गायल्या गेल्या त्या त्या कवींची वैशिष्ट्ये थोडक्यात पण एकही विशिष्ट गुण न सोडता आपल्या introduction मधून अधिकारपूर्ण सांगितली. त्यामुळे कार्यक्रमाला वजन आले. मी मा.जू.ची 'ऐकव तव मधु बोल' म्हटली. श्रोत्यांना फार आवडली. माझे सगळीकडून अभिनंदन झाले. S.D. सुद्धा जरा चकितच झाले! तू हवी होतीस ऐकायला. माझी एक सलग वर्षाकरता नेमणूक झाली आहे. पण तिचे स्वरूप अद्यापि समजले नाही. म्हणजे रजा वगैरे मिळणार असा अर्थ घ्यायचा. एस.डी. म्हणाले - स्पष्ट झाल्यावर कळविन. नागपूरला वासुदेवरावांशी जरा स्नेह

कर- त्यांच्यापासून एखाद्या विषयाचा पद्धतशीर अभ्यास कसा करायचा हे तुला कळेल. (माहिती नसल्यास). मी अर्थात त्यांच्याकडून पुष्कळच शिकलो. तुला पसंत असल्यास! तू जरा अभ्यासू आहेस म्हणून ही सूचना!

तुला आता घरच्या मंडळींची (बापुरावसाहेब, आई, वहिनी वगैरे) खूप आठवण येत असेल. पण रिकामपणी खूप वाच, टेनिस वगैरे खेळ. आम्हाला मधून मधून सुंदर पत्र लिहित जा. ज्योत्स्नाबाईंचा उत्सव (तेथील) म्हणे लांबतो आहे. तरी पण तिथे आली तर तुला भेटल्याशिवाय राहाणार नाही म्हणा. येथे थंडी बरी पडते. म्हणजे उकडत नाही एवढेच. माझे वाचन रेंगाळत आहे. पण निवृत्त झाल्याशिवाय वाचन नाही. चिंतन नाही. म्हणून लेखनही नाही. जुजबी लिखाण सोडा.

नागपुरी 'तुमचे' लोक कसे काय अजून राहिले आहेत? नाना जोग भेटतात काय? पत्र यावे. ज्योत्स्नाबाईंचा नमस्कार.

केशवराव

३

९-डी, मॉडेल हाऊस,
प्रॉक्टर रोड - मुं.४
१८/२/५८

सप्रेम आशीर्वाद,

माझे पत्र पोचले का? Radio Week चांगला झाला. फक्त शास्त्रीय संगीतामध्ये मालविका रॉयने बरा छाप टाकली. तिने हमीर पद्धतशीरपणे गाऊन दाखविला. लक्ष्मीशंकरचा फक्त आवाज, बाकी गायनात अगदीच नवशोकी म्हणून उघडा पडला.. यापेक्षा आमच्या कमल पी. नाईकला घेतले असते, तर जास्त बरे झाले असते. मी काव्य गायनात 'ऐकव तव मधु बोल' ही कविता म्हटली. सर्वांना फार आवडली. S.D नी तारीफ केली. नगरकरांनी दोन कविता बऱ्या म्हटल्या. तू असतीस तर तुझ्या गळ्यात एखादी कविता पडली असती. संजीवनी मराठे यांचे जमले नाही. पु.लं.नी दोन कविता म्हटल्या. भावपूर्ण म्हटल्या, पण सुरात नव्हते. वनिता मंडळाचा कार्यक्रम चांगला झाला, तर नारीजगत जमला नाही. हाफीज अहंमद बागेश्री चांगले गायले. तर त्यांचे श्वशुर निस्सार हुसेन खां पूरिया गातांना रिषभ मारव्याप्रमाणे लावत होते. प्रचलित रागात मान्यवर गवयाने असले चमत्कार केले म्हणजे तोंड कडू होते. क्लॅराने श्रम झाल्यामुळे रजा घेतली आहे. स्टेशनचा कारभार चालू आहे. कोणी रजेवर जातात-येतात-वरची ड्युटी रूम मोठी होणार असून तीत सजावट, खुर्च्या वगैरे चांगल्या होणारसे दिसते. सध्या ड्यु.ऑ.व्हरांड्यात बसल्याने त्यांना जनता (जन्ता) संपर्क चांगला साधता येतो. खुर्च्यांचे दारिद्र्य सगळीकडे फार जाणवते. खुर्च्यांवर डोळे ठेवून राहणे, नसल्या तर उभे राहून काम करणे ही सर्कस करावी लागते. शरम वाटण्यासारखी ऑफिसे आहेत एकूण! काम करणारी माणसे आहेत याची जाणीव कोणालाच नाहीशी दिसते. हे ही मिनिस्टरने किंवा D.G.नी बघायचे असते काय?

माझे तसे ठीक चालले आहे. पण मन आतां कामात रमत नाही. अगदी जास्त लक्ष घालून काम करतो मी - पण करतो. झाले! कामाचे चीज करणारे कोणीही नाही. जरा बिघडले

तर बोलायला सगळे टपलेले . वाङ्मय किंवा थोडे काही बोलायला कोणी नाही . कधी कधी दलालशी बोलतो . श्री .गोगटे व पाडगावकर यांचे मुळीच बनत नाही . ते म्हणे ' लोकांना रीत शिकवायला आले आहेत इथे ' .

माझे वाचन जोरात चालू आहे . नाट्यविषयक वाचन वाढले आहे . त्यावर विचार करणे चालू असते . अ .ना .देशपांडे यांचा म .वाङ्मयाचा इतिहास भाग २ आणला असून त्यावर मधून मधून नजर टाकतो . एकंदर फार घाईत पुस्तक ओरबाडून टाकल्यासारखे वाटते . निरनिराळ्या वाङ्मय प्रकारांवर एकट्याच माणसाने लिहायचे म्हणजे जरा अवजड अन् अवघडही . सर्व विषयांत सारखी गती नसते . कुसुमच्या मानाने या माणसाचे लेखन थोडे उथळ वाटते . दुसऱ्या लेखकांची मते फार मधून मधून छापली आहेत ते बरे नाही केले . लेखकाचा खरा व्यासंग कशात असावा हे कळणे कठीण . पुन्हा इतिहास म्हटला म्हणजे फारसे प्रदर्शन नसावे . लेखनप्रवाह , परिस्थिती व काळ यांचे त्यांच्याशी असलेले नाते म्हणजे केव्हा - का - कसे यावर लेखकाने जास्त भर द्यावा असे वाटते .

तुझा Thesis वाचायचा राहून गेला . त्यावेळी माझी प्रकृती फार नाजूक होती . अन् काहीसे तसे ऐकण्याच्या स्थितीत मी नव्हतो . तू मोठ्याने , उत्साहाने सांगितलेस खरे . पण माझे शरीर नाकारीत होते . रागावू नकोस . रागावली असशील तर आता विसरून जा . तू छापलास म्हणजे Thesis वाचेनच .

रांगणेकरांचा नाट्यसप्ताह दादर येथे चालू आहे . response चांगला आहे लोकांचा . आज दुसरे नाटक आहे . ' एक होता म्हातारा ' . काल माईंच्या अंजलीने रंभेचे काम चांगले केले . नाचाविषयी प्रश्नच नाही तिच्या ! पुढल्या सोमवारी ' सीता ' आहे . मी पाहणार आहे . तेव्हा तुझी आठवण होईल हे काय सांगायला हवे ? होणारच मुळी ! शाहू मोडक काम कसे करणार याची मला काळजी आहे . दादरचे लोक मोठे चोखंदळ आहेत . मुंबई सारखे चालवून घेणे त्यांना जमणार नाही - जमत नाही . All my blessings to him!

प्रा . फाटकांनी फार मोठी पुस्तके वाचायला दिली आहेत . केव्हा वाचणार हा प्रश्नच आहे ! सेक्सवर आहेत . Sex Life in India - Europe - Africa वगैरे ! न वाचली तर ते मला फाडून खातील . पण आहेत मात्र फार छान ती ! पण सलग वाचण्याइतकी रिकामी वेळ हवी .

मुंदडा प्रकरणावर नेहरूंनी त्या कृष्णम्माचारींच्या पत्रातील त्याच्या संपादणीचे जे उद्गार काढले आहेत ते वाचून नेहरूंच्या एकंदर मनोरचनेबद्दल मौज वाटण्याऐवजी चीड मात्र आली - पण हेही दिवस जातील – पण अखेरीस स्वतःच्याच कृतीने ते आपला अधःपात जवळ आणीत आहेत . या चौकशीत छगला जितके वर चढले तितके नेहरू खाली आले आहेत

तुला तिकडे घरी एकटेपणा जाणवत असेल . पण जेवण्या-खाण्याचे काय केले आहेस ? कां ते स्वयंपाक म्हणून चालू आहे ?

ज्योत्स्नाबाई तालमीत बुडून गेल्या आहेत , पण एक-दोन दिवसांत सारे काही संपणार आहे ते–

नाटकाचे पोशाख , देखावे वगैरे उत्तम केले आहेत . तुझ्या आधी मी पाहणार आ[illegible]रिपोर्ट देईनच– तुझे वाचन काय चालले आहे ? आणि गाण्यांची मेहनत करतेस का ? क[illegible] पुन्हा भेटशील तेव्हा तुझे गाणे ऐकेन .

आ . [illegible]वराव



मॉडेल हाउस
मुं.४
८/६/५८

चि. विमलताईस सप्रेम आशीर्वाद,

तुझे ३ चे (खरडून काढलेले का होईना) पत्र वाचून आनंद झाला. म्हणजे काय भेटल्यासारखाच प्रत्यक्ष! यंदा उन्हाळ्याने भारताला भाजून काढण्याचे ठरवलेले दिसते. जिकडे-तिकडे उष्णतेने मृत्यू असे रोज वाचावे लागते. काही करू नये, झोपून रहावे असे वाटते. मी तर सुन्न डोक्याने काम करीत असतो. एअर कं.मधे बसले म्हणजे बरे वाटते. तोच बाहेर आल्यावर आगीत टाकल्यासारखे होते. हल्ली monitoring dutyसर्वांना टाकली आहे. म्हणजे आळीपाळीने दररोज प्रत्येकाने संध्याकाळी ६ ते रात्री १० पर्यंतचे सर्व कार्यक्रम सुरळीतपणे वेळेवर सुरू होतात- संपतात का- उशीर होतो हे टिपण ठेवायचे. दुसऱ्या दिवशी मिटींगमध्ये चर्चा करायची. त्यामुळे कार्यक्रमांच्या क्वालिटीत सुधारणा किती होणार ते दिसतेच आहे म्हणा! पण कागदांचा खप वाढला आहे. लिखापढी वाढली एवढेच. शिवाय weekly duty असतेच. म्हणजे मलिकसाहेब बसल्या वसल्या काम वाढवीत आहेत. प्रोड्यूसरांनी स्टुडिओत जास्त काम करावे अशी व्यवस्था मात्र होत नाही. जोपर्यंत असे होत नाही, तोपर्यंत कार्यक्रम सुधारणे कठीण आहे. स्टुडिओत कार्पेटस् घातली आहेत. पण आम्हांला बसायला खुर्च्या मात्र नाहीत. एक खुर्ची जर रिकामी झाली तर टपलेले सगळे ती काबीज करायला धावतात. कपाटे नाहीत, त्यामुळे फायली ठेवायला जागाच नाही. मला असे वाटते की, ब्रॉडकास्टचे तास कमी करून चांगले कार्यक्रम ठेवण्याकडे वेळ जास्त खर्च करावा. म्हणजे तालमी सर्व कार्यक्रमांच्या वाढवाव्यात. कोंकणी कार्यक्रम दररोज सकाळी आणखी अर्धा तास वाढवून रात्रीची पंधरा मिनिटे कमी केली आहेत. कंट्रोलरूममध्ये पोरे-बाळे खूप आली आहेत. उंदराप्रमाणे लुडबुड करीत असतात नुसता! तेथील बडे लोक जास्त उन्मत्त होत आहेत.

क्लॅराने पुण्यातच बदली मागितली होती- ती गेली- सध्या ती दीक्षितांच्या घरी राहाणार आहे. नंतर घर शोधेल. मी तिला कॅम्पातच रहा म्हणून सांगितले आहे. मधूची बदली धारवाडला होईल असे कळते. आपल्याला पुन्हा एकत्र येता आले तर खरंच छान होईल. पण हे जमणे सध्या तरी कठीण दिसते. पण चांगले चिंतीत रहावे हे बरे. क्लॅराला बदली आवडली. कारण तिला सध्या तरी नको असलेल्या कंपनीतून सुटका झाल्याने मनाला हुरुप येऊन प्रकृती सुधारेल.

P.L. चे नाटक मीही वाचले. माझ्यावर परिणाम झाला नाही - संघर्ष तीव्र नाही. त्यामुळे पकड नाही. इथे तिथे वरे आहे. प्रयोगात नाटक विशेष चढेल असे मुळातच नाही. दोन पैशाची पिऊन आठ आण्याची अंगात आणणार! मी प्रयोग पाहिला नाही. पण तुझे आहे तजपाशीच्या प्रयोगाच्या! खाली प्रयोग होतात असे म्हणतात. सुनीताचे काम चांगले होते असे

हल्ली मी गुरुवारी लाईट - म्यु .- च्या कार्यक्रमात बदली गातो . कधी सोमवारी मराठी कार्यक्रमांत १२ ते १२.३० मध्ये (दुपारी) . पण तुला ऐकायला कसे मिळणार ? माझे कार्यक्रम चांगले होतात असं मीच सांगतो . पत्रेही येऊ लागली असून वर्तमानपत्रात स्तुती येऊ लागली आहे .

तुझा स्वयंपाक वाचून इकडे तोंडाला पाणी सुटले , बरे का ! निदान तेवढ्याकरता तरी नागपूरला मुक्काम टाकावेसे वाटते . दुर्गा मध्यंतरी अखिल मुलांसह महाबळेश्वर मुक्कामी ८ दिवस (होऊन) आली . सध्या तरी थिएटराअभावी ' भूमिकन्या 'प्रयोग बंद आहेत .त्यामुळे तिला हवी असलेली विश्रांती मिळत आहे . वंदनाला सध्या शिकवण्यास गवई ठेवला आहे . यमन - भूप - चालू आहेत . मदतीला ग्रामोफोन्सच्या रेकॉर्ड आहेतच , माझे वाचन-लेखन सध्या रोडावत चालले आहे . तरी पण बनहट्टींचा रंगभूमीचा इतिहासाचा पहिला खंड वाचीत आहे . भाट्यांचे आत्मचरित्र वाचले , जुन्या काळांत गेल्याने जरा बरे वाटले . शैली फार चांगली आहे . डॉ . जयकरांचे आत्मचरित्र (पहिला भाग) प्रसिद्ध झाले आहे . वाचनीय आहे असे धावत्या वाचनावरून वाटले . किंमत २० रु . असल्यामुळे हात आखडला आहे . नाहीतर घेतलेच असते . पण तू मिळवून वाच .

तुकोबाचे संतसांगाती (मौज प्रकाशन) हाती आले असून पुस्तक solid आहे .

तुझा नवा लेख (मराठी भुलाबाई) आत्ताच वाचला . चालू ठेव ! असेच !

श्री . साहेब नसल्याने तुला करमत नसावे , असे व[illegible] .पण येतील ते वापस .

तुझे वाचन काय चालू आहे ? मामांचे अद्वातद्वा भाषण वाचले . आज ' नवशक्ती ' ने त्यांचा चांगलाच समाचार घेतला आहे . ते आणखी भडकतील . मध्यंतरी माई फ्लू ने आजारी होत्या . दोन वेळा गेलो होतो भेटायला . आता बऱ्या आहेत . कामावर येतात . श्री . गोगट्यांच्याकडे क्षुद्र कामे दिली गेल्याने ते आता शोफर्स , गडी , हमाल ह्यांना कामे शिकवतात . मिनू मुजुमदार आणि यशवंत देव हल्ली एकत्र भोजन करतात . बाकी सर्व ठीक .

आ . केशवराव



**पोस्टकार्ड**

मुं .४-
५/८/५८

विमल ,

रागावू नकोस , तुझी सर्व पत्रे पोहोचली . क्लॅरा गेल्या आठवड्यात येऊन गेली . तुला पत्र आले असावे . प्रकृती बरी दिसली नाही . अजून स्वतंत्र जागेत रहात नाही . तुला सावकाशीने पत्र लिहिले होते . पण पत्ता न लिहिताच टाकल्याने पोचणार कसे ? म्हणून हे कार्ड ! तुमचे नवे circle (रेडिओमधील) चांगले चालले आहे ना ? जूनमध्ये येथे दादरात मन्सूरांचे गायन ऐकले तेव्हा तुझी आठवण झाली . मल्हार - विदारी हे दोन राग चांगले गायले . पुष्कळ दिवसांनी चांगले गाणे ऐकले म्हणून तृप्ती झाली . सध्या वाचन जोरात सुरू ! बनहट्टींचे मराठी रंगभूमीचा इतिहास वाचीत आहे व आंद्रे मोर्वाचे एरियल पुन्हा वाचीत आहे . फार मजा येत आहे . तू

एरियल वाचले नसल्यास वाच.

हल्ली स्वयंपाक करतेस काय? श्री. साहेबांची प्रकृती कशी आहे? तुझी आई तेथेच की बाबुरावांकडे?

रे. स्टेशनवर सांगण्यासारखे काही नाही. माई ठीक आहेत. सौ. दुर्गा काश्मिरचे प्रो. करून आली. परवा नाटकाकरता जाणार आहे!

बाकी ठीक. केशवराव



**पोस्टकार्ड**

मुं.४
२९/१०/५८

स.आशीर्वाद,

माफ करा. पुष्कळ दिवसांत तुला व तात्यांना पत्र लिहिता आले नाही. एक तर माझी प्रकृती dysentery ने बरी नव्हती. शिवाय कामामुळे जर्जर झालो होतो. मलिक साहेबांनी लिहिण्याचे काम एवढे वाढवले आहे की ते मारुतीच्या शेपटीप्रमाणे वाढतच जात आहे. AIR. चे Secretariat मधे रूपांतर झाले आहे असे सर्व म्हणतात. गंगोली, गोगटे, बरुआ, एजाझ वगैरे सर्व PEX झाले आहेत. पहिल्या तारखेपासून (पगारवाढीशिवाय) सर्व टायपिस्ट एक जागी आणून त्यांच्या डोक्यावर शहाला ठेवले आहे. आम्ही आमचे सर्व काम व पत्रव्यवहार त्यांच्यावर सोपवण्याचा असून त्यांच्यावर विसंबून रहायचे. त्यामुळे Contract वेळेवर जात नाही. acceptances वेळेवर येत नाहीत. सर्व गोंधळ उडाला आहे. तेजवानी राजकोटहून येथे आला आहे बदलून. मला वाटते Clara ही PEX झाली काय? ती एके दिवशी तशीच घाईत येऊन भेटून गेली. प्रकृती आहे तशीच! तुझे लेख वाचून राहिलो आहे. आणखी नवल विशेष काय? तात्या काय म्हणतात? नागपूरला सध्या थंडी पडू लागली असावी? येथे हा महिना थंडच आहे उकडत नाही. माई दिल्लीला गेल्या होत्या. तू ही seminar ला!

नागपूरच्या मौजा कळव. यंदा तेथे नाट्याच्या Finals आहेत. चि. वंदनाने शारदेची भूमिका पुण्याच्या राजहंस कं. मंडळाने सादर केलेल्या शारदा नाम केली. काम चांगले केले. छोकरी ऐकत नाही. पत्रे इतकी वाचनीय लिहिते विचारू नकोस. लेखिका होणार असे दिसते. सर्वांची खुशाली कळव. आ. केशवराव



**पोस्टकार्ड**

स्वरवंदना, पुणे - ४
३१/४/७४

सप्रेम आशीर्वाद

समाधी साधन । संजीवनी नाम ।

हा अभंग लिहून पाठव. मला तो फार आवडला.

तुझी व क्लॅराची आठवण वारंवार येते. केशवराव

०००









सतीश पोरे

# संशोधनाची दशा आणि दिशा

साहित्यातील तसेच शिक्षणातील संशोधनाचा दर्जा घसरत चालला आहे , अशी टीका एका बाजूने होतें ; तर या विषयातील संशोधनाचा उपयोग काय असा प्रश्नही दुसऱ्या बाजूने विचारला जातो . त्या पलिकडे या संशोधनाचा काही उपयोग नाही असे आपण म्हणतो आणि संशोधन करणाऱ्यालाच त्याच्या संशोधनाची महती पटवून देण्यास भाग पाडतो .

पदवी मिळविण्यासाठी संशोधन केले जाते . पण पदवीचा उपयोग काय ? तर नोकरी मिळवणे . पण हे उत्तरही तितकेसे खरे नाही . बऱ्याच नोकऱ्यांच्या बाबतीत एम . फिल .पीएच .डी . ही अट शिथिल केली जाते . नोकरी मिळाल्यानंतर देखील ही डिग्री अनेकजण घेतात . कशासाठी ? स्वतःचे ज्ञान वाढवण्यासाठी ? मुळीच नाही . केवळ आपली प्रतिष्ठा वाढावी , विद्यापीठाच्या पीएच . डी . मार्गदर्शकाच्या यादीवर आपले नाव यावे , किमान पक्षी आपल्या नावामागे 'डॉक्टर' असे लावायला मिळावेत , यासाठी !

महाराष्ट्रातील विद्यापीठात संपूर्णतः पीएच . डी . पदवी नाकारली आहे , असे क्वचितच घडते . कलाशाखेतील पीएच . डी . पदवी इतकी व्यक्तिनिष्ठ असते की काही विचारू नका . प्रा . ना . सी . फडके यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास करून ते कसे मानवतावादी श्रेष्ठ लेखक होते व कलेसाठी कला या त्यांच्या विचारसरणीतुन ते जीवनसागराच्या तळाशी पोचले असा निष्कर्ष काढणाऱ्या एका व्यक्तीला पुणे विद्यापीठाने पीएच . डी . पदवी दिली . गोव्यातील एका महाविद्यालयातील प्राध्यापकाने याच विषयावर संशोधन करून फडके हे काठाकाठाने पोहणारे रंजनवादी लेखक होते असा निष्कर्ष काढला . त्यालाही पुणे विद्यापीठाने पीएच . डी . पदवी दिली . (१८९०) प्रा . स . गं . मालशे यांनी म्हटले आहे की बाबा पदमनजी यांच्या पीएच . डी . मिळवणाऱ्या प्रा . कऱ्हाडकरांनी यमुनापर्यटनची मूळ आवृत्ती पाहण्याची देखील तसदी घेतली नाही . त्यामुळे त्यांचे लेखन सदोष झाले आहे .

आचार्य अत्रे यांच्या झेंडूच्या फुलावर आतापर्यंत ५ व्यक्तींनी पीएच . डी . मिळविली आहे . गडकऱ्यांच्या नाटकांतून (अभ्यासाकरिता फक्त ५ नाटके निवडली होती) स्त्रियांचे घडणारे दर्शन' या विषयावर पीएच . डी . मिळवणाऱ्या माझ्या माहितीतल्या एका व्यक्तीला पीएच . डी . शव्द कसा लिहावयाचा हेही माहीत नाही . त्या पी .एच . डी . अशी पदवी लिहितात . साहित्य क्षेत्रातील व सामाजिक विषयाकडे झुकणाऱ्या असल्या फालतू संशोधनाचा उपयोग काय असा प्रश्न केल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही . पण प्रस्तुत लेखाचा उद्देश वैयक्तिक कोणा व्यक्तीवर वा कोण विद्यापीठावर टीका करणे हा नाही . संशोधनाची उपयुक्तता वाढावी , तसेच संबंधित विषयातील ज्ञानाचा विस्तार व विकास व्हावा असेच मला वाटते . काही वर्षांपूर्वी पुण्याच्या 'रविवार सकाळ' मध्ये पीएच .डी . हवी का पीएच .डी . ? या शीर्षकाचा उपहासगर्भ



अनुक्रमणिका

व विदारक सत्य मांडणारा लेख प्रसिद्ध झाला होता . तसेच २/३ वर्षांपूर्वी जसपाल भट्टी यांची पीएच .डी . तील गंमतीजमतीवर आधारित एक मालिकाही दूरदर्शनवर दाखवण्यात आली होती . त्या मानाने हा लेख खूपच संयमित स्वरूपात लिहिला आहे .

**प्रबंधलेखनातील अराजक -**

डॉ . स . गं . मालशे यांनी मराठी भाषा व साहित्यात होणाऱ्या संशोधनाबद्दल अत्यंत कडवटपणे टीका केली आहे . ते म्हणतात ,' मराठीतील संशोधनाच्या प्रबंधातून प्रायः ग्रंथकाराचे व्यक्तिमत्त्व , ग्रंथाभ्यास , वाङ्मयप्रकार , वाङ्मयीन कालखंड , समीक्षाविषयक एखादी समस्या असे विषय चर्चिले असतात . निखळ भाषाशास्त्रीय विषयांचा अपवाद केल्यास , अशा प्रबंधांतून ऐतिहासिक दृष्टी राखण्याची नितांत आवश्यकता असते . पण हे पीएच . डी . चे प्रबंध निव्वळ कथावजा असतात . त्यांना कसलाही अनुबंध म्हणून नसतो . विविध प्रकारच्या सूचि ग्रंथांचा इंग्रजीच्या तुलनेने मराठीत अभाव आहे , हे खरे . पण जी सामग्री आहे , तिचा तरी उपयोग कितीसे पदव्युत्तर विद्यार्थी या प्रबंधातून पद्धशीरपणे करतात ? वा त्यांचे मार्गदर्शक त्यांना करायला लावतात ? हा प्रबंध हजार- बाराशे पृष्ठांचा एक लट्ठ ग्रंथ असला पाहिजे , एवढे मात्र त्यांनी ठरवलेले असते . विषयाची निवड प्रायः नुकत्याच एम .ए . झालेल्या विद्यार्थ्यांच्या आवाक्यापलिकडची असते . मग पारख न करताच अवतरणांची खोगीरभरती केवळ प्रबंध फुगवण्याच्या हेतूने केली जाते . ' मिळेल ती माहिती आणि सुचेल ती क्लृप्ती ' योजून नव्व्याण्णव वेळा सांगितलेली गोष्टच शंभराव्या वेळी प्रबंधकारांकडून पुन्हा एकदा सांगितली जाते . आधारासाठी घ्यावयाच्या साधनात प्रतवारी असते , हे त्याच्या गावीही नसते . आले ते खरे , अशी सर्वसामान्य माणसाची समजूत असते , तोच खाक्या या प्रबंधकारांचाही असतो . एका ग्रंथातून मजकूर उचलला की ते वाङ्मयचौर्य , पण अनेक ग्रंथातून उचलला की तो प्रबंध अशी स्थिती सर्रास आढळते . केवळ संदर्भसूची वरवर चाळून पाहिली तरी या प्रबंधलेखनातील अराजक उघड होईल ."

डॉ . मालशे यांनी ' समीक्षा आणि संशोधन ' या लेखात नामवंतांकडूनही कशा चुका होत असतात , त्याचप्रमाणे मुळाकडे जाऊन आधार लेखन करण्याची प्रवृत्ती कशी नाही , हे सोदाहरण पटवून दिलेले आहे .

**डॉ. करलिंगरचे मतः**

सन १९७५ मध्ये अमेरिकेत एज्युकेशन रिसर्च असोसिएशनच्या अध्यक्षपदावरून बोलताना डॉ . फ्रेड करलिंगर म्हणाले होते ,

Most people assume that educational research can solve educational problems and improve educational practice. The assumption is false. And it creates expectation that cannot be fulfilled. Educational research does not lead to improvement in educational practice. The solution of research problem is on a different level of discourse than the education of an action problem.

शैक्षणिक किंवा वाङ्मयीन संशोधनाच्या बाबतीत आधीच उन्हास , त्यात डॉ . करलिंगर यांचे उद्गार ऐकून फाल्गुन मास उजाडल्याशिवाय राहणार नाही .

डॉ . करलिंगरचे वरील मत ऐकून आपण निराश होण्याचे कारण नाही . मूलभूत

संशोधनासंबंधी ते बोलत आहेत . मूलभूत संशोधनाच्या तुलनेत उपयोजित संशोधनाचे दृश्य परिणाम अजमावणे तसेच विशिष्ट औषधयोजनेमुळे रोग्याच्या प्रकृतीत होणारा फरक यावरील प्रयोग सतत चाललेले आपण पाहतो .

वैद्यकीय संशोधनाच्या तुलनेत शैक्षणिक क्षेत्रात उपयोजित वा मूलभूत संशोधनाची उदाहरणे (व्यावहारिक फायद्याच्या दृष्टिकोनातून) कमी सापडतील, ही गोष्ट खरी. संशोधनामुळे शिक्षणक्षेत्रात झालेल्या सुधारणेबद्दल ' एज्युकेशनल रिसर्चर ' (१९७८) च्या अंकात रॉबर्ट स्लॅविन यांनी म्हटले आहे .

"The past ten years have seen a gradual but certain cumulative increase in knowledge in special education. Simple behaviour modification techniques have grown in sophistication, have been applied to formerly unreachable children, such as severely retarded and the physically disabled, have advanced into such promising new areas as cognitive behaviour modification and self instruction, and have been made easier to use and more flexible. Thess advances have been based exclusively on painstaking applied researach."

**चाचण्यांचे प्रमाणीकरण —**

पाश्चात्त्य देशात चाचण्यांच्या प्रमाणीकरणावर भर दिला जातो . त्यामुळे उपयोजित संशोधनाचा उपयोग केला जातो . अध्ययन-अध्यापनावरोबर ' मूल्यमापन ' हे शैक्षणिक प्रगतीचे अविभाज्य अंग मानले जाते. मूल्यमापनाची आवश्यकता येथपासून मूल्यमापनाच्या पद्धतीमधील सुधारणा हे कशाचे निदर्शक आहेत? निदानात्मक चाचण्यांच्या सहाय्याने विद्यार्थ्यांना अध्ययनात नेमके मार्गदर्शन करणे शक्य झाले आहे . तर निदानात्मक चाचण्या कशाच्या परिपाक आहेत ?

" शिक्षण पद्धतीवर संशोधनाचा ' प्रत्यक्ष ' परिणाम होत नाही . " या विधानाचा अर्थ ते " अप्रत्यक्ष परिणाम " मान्य करतात व तीच गोष्ट खरी आहे . अमेरिकेतील शैक्षणिक इतिहास तज्ज्ञ जेरोल्डिन क्लिफर्ड यांनीही असा निष्कर्ष काढला आहे .

However, much deliberate dissemination strategies promote future research impact, the conclusion from the past is otherwise, that discrete, observable, charitable dissemination activities were far inferior in operation to the process of cultural diffusion to that obscure, ambiguous, often involuntary transaction system whereby innovation and ideas are spread widely throughout some extended subsociety or the whole culture.

क्लिफर्डच्या या विधानावरून हे कळून येईल , की अमुक एका संशोधनाचा अमुक परिणाम दाखवा असे म्हटले , तर ते शक्य होणार नाही . शैक्षणिक संशोधन ही एक निरंतर चालणारी क्रिया आहे . त्यामुळे होणारी सुधारणा मंद गतीने होत असल्याने ती समाजाच्या चटकन निदर्शनास येत नाही .

**संशोधन शब्दाचा अर्थ -**

आज शैक्षणिक संशोधन ही अध्यापक प्रशिक्षणातील एक उपेक्षित बाब आहे . संशोधन हा शब्दही अलिकडे उपेक्षितच आहे . संशोधन म्हणजे सम्यक् शोधन ! एखाद्या गोष्टीचा सर्व अंगांनी घेतलेला शोध अशा वेळी संशोधकाला जाणवणाऱ्या समस्या सोडविण्यासाठी त्यांची अनपेक्षित उत्तरे संदर्भ ग्रंथात सहजासहजी उपलब्ध नसावीत , अन्यथा ते संशोधन होणार नाही , तर तो केवळ शोध होईल .

आणखी एक बाब स्पष्ट करायला हवी . संशोधन म्हटले की , बहुसंख्य लोकांच्या मनात "प्रायोगिक संशोधन" हा अर्थ येतो . प्रायोगिक संशोधनात पूर्वी ही गोष्ट नव्हती , पण संशोधकाने केलेल्या प्रयोगामुळे ही गोष्ट शक्य झाली असे सांगणे सोपे असते . शैक्षणिक संशोधनात सर्वेक्षण , ऐतिहासिक संशोधन , व्यक्ती अभ्यास इत्यादी संशोधन प्रकारही समाविष्ट होतात . त्यामुळे अशा प्रकारचे संशोधन हे खरे संशोधन नाही , असे काहींना वाटते . सर्वेक्षणालाही महत्त्वाचे स्थान असते . जॉन बेस्ट यांनी ' रिसर्च इन एज्युकेशन ' या पुस्तकात म्हटले आहे .

"The survey is an important type of study. It must not be confused with the more clerical routine of gathering and tabulating figures. It involves a clearly defined problem and definite objective. It requires expert and imaginative planning, careful analysis and interpretation of the data gathered and logical and skilled reporting of the findings."

परदेशातही प्रायोगिक संशोधन सोडल्यास अन्य संशोधनावावत मतभेद दिसतात . उदा . व्यक्ती अभ्यास (केस स्टडी) ही संशोधन पद्धती दुय्यम मानली जाते . वॉल्टर वोर्ग व मेरिडिथ गॉल 'एज्युकेशनल रिसर्च इन इंट्रोडक्शन' (Longman, 1983) या पुस्तकात म्हणतात .

Until recently, this approach was rejected by many educational researchers as unscientific, mainly because of its lack of research controls. However, the increased acceptance of qualitative research methods such as educational enthropology and the use of participant observers has revived the case-study approach. In fact, some researchers consider, case study, participant observation and ethnography as essential synonymous.

**संशोधन आणि सुधारणा -**

संशोधनामुळे सुधारणा घडून येते हे सहजासहजी मान्य केले जात नाही . आम्ही स्वतःच अनुभवातून शहाणे झालो असे मानण्याची पद्धती आढळते .

पाठ्यपुस्तक मंडळाच्या संशोधन प्रकल्प आर्थिक सहाय्य योजनेच्या अंतर्गत दरवर्षी काही प्रकल्प हाती घेतले जातात . प्रकल्पांच्या अहवालात पाठ्यपुस्तक सुधारण्यासंबंधी सूचना केलेल्या असतात . संबंधित विषय समिती त्या सूचनांचा विचार करते , (गरज भासल्यास) पाठ्यपुस्तकांत सुधारणाही करते , परंतु हे संशोधनाचे फलित आहे हे उघडपणे कोणी मान्य

करत नाही . हे श्रेय संशोधन क्रियेलाच द्या असा संशोधकाचाही आग्रह नसतो .

शिक्षणतज्ज्ञ डॉ . ग . श्री . खैर यांनी संशोधनाचा फायदा समर्पक शब्दात सांगितला आहे . ते म्हणतात ,'' संशोधनामुळे शिक्षणक्षेत्रातील कार्यकर्ते , शिक्षक व पालक यांच्यात जागृती निर्माण होते . त्यांना नवी दृष्टी मिळते . या संशोधनाच्या प्रक्रियेत प्रश्नावली पाठवल्या जातात . त्या भरताना लोक त्यावर विचार करतात . लोकांच्या मुलाखती घेतल्या जातात , सभा होतात व पाठ्यपुस्तके पुन्हा पुन्हा नवीन दृष्टिकोनातून वाचली जातात . एकेका संशोधनाशी शेकडो लोकांचा संबंध येतो . या निमित्ताने उत्कृष्ट पाठ्यपुस्तक कसे असावे या मुद्यावर अनेक लोक विचार करतात . नवीन दृष्टिकोनातून पुस्तकांकडे पाहतात . अशा या संशोधनात प्रकल्पांचा उपयोग व परिणाम सर्व शिक्षण क्षेत्रात होतो . ''

**पाठ्यपुस्तक मंडळात झालेले संशोधन व त्याचा उपयोग -**

सन १९७३-७४ मध्ये पाठ्यपुस्तक मंडळातर्फे राज्यव्यापी पाठ्यपुस्तक सर्वेक्षण हा प्रकल्प घेण्यात आला . त्यात इ .१ ते ७ मध्ये शिकणाऱ्या 'किती विद्यार्थ्यांजवळ नवीन पाठ्यपुस्तके असतात , किती विद्यार्थ्यांजवळ जुनी पाठ्यपुस्तके असतात व किती विद्यार्थी पुस्तकाशिवाय शाळेत येतात ' याचा अभ्यास करण्यात आला . त्या सर्वेक्षणातून मिळालेल्या माहितीचा उपयोग पाठ्यपुस्तकांचा मुद्रणादेश , पुनर्मुद्रणादेश तसेच बुक बँक योजना इत्यादी कामासाठी झालेला आहे .

सन १९७६ पूर्वी गणित विषयाचे पाठ्यपुस्तक पहिलीसाठी नव्हते . १९७८ साली पहिलीसाठी गणिताचे पाठ्यपुस्तक तयार केले . ते विहित करण्यापूर्वी वर्षभर निवडक १५० प्राथमिक शाळांतून ते शिकवून पाहिले ( १९७६-७७) . प्रकाशनपूर्व चाचणीमुळे ते निर्दोष होण्यास मदत झाली आहे .

सन १९७६ हे आंतरराष्ट्रीय महिला वर्ष म्हणून साजरे केले गेले . त्या निमित्ताने पाठ्यपुस्तकात स्त्रियांचे स्थान हा प्रकल्प घेण्यात आला . संशोधन प्रकल्प आर्थिक सहाय्य योजनेतही पुढे तो अभ्यास चालू ठेवला गेला .

सन १९७६ पूर्वीच्या पाठ्यपुस्तकांत स्त्रियांचे प्रमाण कमी होते . नव्याने तयार करण्यात येणाऱ्या पाठ्यपुस्तकाच्या संपादनाच्या वेळी स्त्री व पुरुष दोघांनाही समान प्राधान्य मिळावे असा कटाक्ष बाळगला जातो .

सन १९७५-७६ मध्ये संशोधन विभागाने 'पाठ्यपुस्तक शब्दगणना प्रकल्प ' हाती घेतला . इयत्ता १ ते ७ च्या ३२ मराठी पाठ्यपुस्तकांतील शब्दांची गणना करून शब्दांच्या विविध प्रकारच्या याद्या केल्या . त्याचा एक स्वतंत्र अहवाल प्रसिद्ध केला . हे एक प्रकारचे मूलभूत संशोधन म्हणावे लागेल . त्या शब्दसंग्रहाचा उपयोग करून पुढे काही अभ्यासकांनी डॉक्टरेट पदवी मिळवली .

**संशोधन मार्गातील अडथळे -**

शैक्षणिक संशोधनाचा शिक्षणपद्धतीवर नेमका परिणाम काय होतो हे न जाणवण्याची ७ कारणे वॉटर बोर्ग व मेरिडिथ गॉल यांनी सांगितली आहेत .

१) आर्थिक सहाय्याचा अभाव:- इतर क्षेत्रांच्या तुलनेत ' शैक्षणिक ' क्षेत्रात होणाऱ्या संशोधन प्रकल्पांची संख्या कमी असते . सन १९६८ मध्ये अमेरिकेत शिक्षण क्षेत्रात २०००

संशोधक काम करत होते , तर कृषी क्षेत्रात १५ ,००० व 'आरोग्य' क्षेत्रात ६० ,००० संशोधक काम करत होते . शिक्षण क्षेत्रात संशोधन करणाऱ्यांना पुरेसे आर्थिक सहाय्य उपलब्ध होत नाही . भौतिकशास्त्र , जीवशास्त्र , रसायनशास्त्र इत्यादी विषयांत संशोधन करण्यासाठी संशोधन अधिछात्र कृतीच्या जाहिराती ( Research fellowship) वृत्तपत्रांत दिसतात . पण शैक्षणिक वा साहित्यातील संशोधनाकरिता छात्रवृत्ती देणार असल्याच्या जाहिराती दिसत नाहीत . शिवाय स्वतःचा पैसा खर्च करून शैक्षणिक संशोधन करावे अशी कोणाची इच्छाही नाही व ते शक्यही नाही .

२) अलिप्तपणे चालणारे संशोधनः- जेराल्डिन क्लिफर्ड यांनी नमूद केले आहे , की शैक्षणिक संशोधनात तुकड्या तुकड्याने केलेल्या संशोधनाचा परिणाम जाणवत नाही . संशोधनासाठी प्रत्येकवेळी नवीन विषय निवडले जातात . नवीन संशोधकाने डिग्रीसाठी वा अन्य कामासाठी विषय निश्चित करताना सलगता , उपयुक्तता या गोष्टींचा विचार करणे जरूर आहे . उदा . आठ वर्षे पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची शब्दसंपत्ती शोधून काढली तर पुढील संशोधकाने सात वर्षे पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची किंवा नऊ दहा वर्षे पूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची शब्दसंपत्ती शोधून काढणे अधिक फलदायी होईल .

३) विकसनशीलतेचा अभावः- बऱ्याचशा संस्थांमध्ये संशोधन आणि विकास विभाग नसतो . असलाच तर नावाला असतो , काही संस्था तर आपल्या नावातच 'संशोधन आणि विकास' या शब्दांचा समावेश करतात कारण या नावाला अलिकडे 'ग्लॅमर' प्राप्त झाले आहे . पण अशा संस्थेत संशोधन तोंडी लावण्यापुरते होत असते . बऱ्याच संशोधकांना आपल्या संशोधनाचा त्वरित उपयोग व्हावा असे वाटत असले तरी जोपर्यंत नवीन पद्धती वापरली जाते . पॉकेट कॅलक्युलेटर जेव्हा भारतात आला , तेव्हा लोक त्या मशीनवर घेतलेल्या बेरजा-वजाबाक्या पुन्हा एकदा तोंडी करून पाहत असत . विल्यम जेम्स यांच्या मते शास्त्र केवळ नियम सांगते , या नियमांच्या चौकटीत कसे बसायचे ते 'कला' सांगते . कला मानवाशी संबंधित असते , मानव म्हटला की व्यक्तिभिन्नता आली . व्यक्तिभिन्नता आली की पद्धती दृष्टिकोनात बदल आढळणारच .

४) शिक्षकांचे अज्ञानः– काही वर्षांपूर्वी अमेरिकेत पदव्युत्तर प्रशिक्षण घेणाऱ्या १०० शिक्षकांकडून माहिती घेतली . तेव्हा त्यांना शैक्षाणक संशोधनासंबंधी अत्यल्प माहिती असल्याचे आढळले . आपल्याकडे तर डी .एड .चा अभ्यासक्रम तर सोडाच ,बी .एड .च्यां अभ्यासक्रमातही शैक्षणिक संशोधन पद्धतींचा उल्लेख नाही . एम .एड . ,एम .फिल . पदवीसाठी शैक्षणिक संशोधन हा विषय आहे . पण त्याचा विशेष परिणाम जाणवत नाही .

५) विकासाच्या बाबतीतील सुसूत्रपणाचा अभावः– शैक्षणिक संशोधनाच्या बाबतीत इतर शास्त्रीय क्षेत्रातील संशोधकांसारखे निकाल मिळत नाहीत . अनेकजण पारंपरिक पद्धतीला चिकटून राहतात . ॲस्पिरीन या गोळीमुळे काही दुखणी वरी होतात , पण नेहमीच नव्हे ! शिवाय काही वेळेला ॲस्पिरीन प्राणघातक सुद्धा ठरू शकते . याचाच अर्थ असा , की नवीन नवीन औषध वापरताना दक्षता घेणे आवश्यक असते.

६) अन्य अनिष्ट परिणामः– एखाद्या औषधाने रोग बरा होतो , पण त्याचे शरीरावर काही अनिष्ट परिणामही होतात . परिणामकारक प्रगती होण्यासाठी शोधून काढलेल्या एखाद्या

पद्धतीमुळे विद्यार्थ्यांचे स्वयं अध्ययन गटातील चर्चा इ . वर अनिष्ट परिणाम होत असल्याचे आढळून आले आहे .

(Research demonstrating such effect is reviewed in Richard. E. Snow and Penelope L. Peterson "Recognising Differences in Student Aptitude" in New Directions for Teaching and Learning, Learning Cognition and College Teaching-1980.)

स्वाध्यायात वस्तुनिष्ठ प्रश्नांचा अतिरेक झाल्याने विद्यार्थ्यांची वर्णनात्मक स्वाध्याय सोडविण्याची क्षमता कमी झाल्याचे आपल्या अनुभवाला येत आहेच .

७) वस्तुस्थिती व सूचना यातील अंतरः– बऱ्याच वेळा संशोधक व शिक्षणतज्ज्ञ संशोधनाद्वारे मिळालेल्या निष्कर्षांवर आधारित सूचना करतात . तेथेच चूक होते . संशोधनातील ७५% निष्कर्षांची भाषा वेगळी असते व सूचनांची भाषा वेगळी असते . समजा , एका संशोधनात विद्यार्थी त्यांना दिलेले काम मन लावून करत होते असे आढळले , दुसऱ्याही एका प्रयोगात ७५% विद्यार्थी मन लावून काम करताना आढळले . ही झाली दोन्ही संशोधनातील वस्तुस्थिती . पण याचा अर्थ जास्तीत जास्त विद्यार्थ्यांनी मन लावून काम करायला पाहिजे असे आपण म्हणू शकत नाही . नैसर्गिक वातावरणात काही विद्यार्थ्यांचे लक्ष असेल , काही विद्यार्थी इकडे-तिकडे हालचाल करत असतील , काही विद्यार्थ्यांचे शिकवण्याकडे लक्ष असेल . त्यामुळे वरील संशोधनात ' लक्ष दिल्यामुळे विद्यार्थ्यांच्या प्राविण्यात किंवा वर्तनात इच्छित बदल घडून येतो ' हा निष्कर्ष खरा असला तरी त्याची अंमलबजावणी करताना वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही .

याशिवाय आणखीही कारणे देता येतील .

८) सर्वसामान्यांची मनोवृत्तीः– संशोधनाच्या बाबतीत सर्वसामान्यांची मनोवृत्ती दुटप्पीपणाची असते . एका बाजूला संशोधकाने काढलेल्या निष्कर्षांकडे , शिफारशींकडे अलिप्तपणाने जणू काही आम्ही त्यातले नाहीच अशा तऱ्हेने पहाणे . अशा वेळी संशोधनाचे निष्कर्ष तसेच अहवालात राहतात . दुसऱ्या बाजूला एखादी वस्तू संशोधनाअंती तयार केलेली आहे असे सांगताच त्यावर उड्या टाकावयाच्या . संशोधनावर खर्च झाला आहे असे सांगताच सूट मिळते म्हणून काही संस्था आपल्या नावातच संशोधन शब्द घालतात . संशोधनाकडे संशयी वृत्तीने पाहण्याची सवय जात नाही तोपर्यंत संशोधनाचे भवितव्य धोक्यातच राहणार .

९) मार्गदर्शक तज्ज्ञ व्यक्तींचा अभावः– गुरूवाचून मोक्षप्राप्ती होत नाही , ज्ञानाचा ठेवा गवसत नाही असे म्हणतात . त्याप्रमाणे संशोधकाला जोपर्यंत योग्य मार्गदर्शक मिळत नाही , तोपर्यंत त्याचे श्रम कारणी लागणार नाहीत . भारतात शैक्षणिक संशोधन करणाऱ्या संस्था संख्येने अल्प आहेत , त्याहून कमी संख्या वाङ्मयीन संशोधन करणाऱ्या संस्थांची आहे . या संस्थांत तज्ज्ञ मार्गदर्शकांचा जवळजवळ अभाव आहे . संशोधनाचे काम करण्यासाठी तज्ज्ञ अनुभवी व्यक्ती नाहीत .

१०) कर्मचारी वर्गः– ज्या साहित्यिक संशोधन करणाऱ्या संस्था आहेत त्यात पुरेसा कर्मचारी वर्ग नाही . केवळ माणसाला माणूस या नात्याने रिकाम्या जागा भरत गेल्यास त्याच्या हातून संशोधनापेक्षा प्रशासकीय कामच होणार ! आज आपल्या राज्यात अशा किती तरी प्राथमिक व माध्यमिक शाळा आहेत ज्यातील ग्रंथालयातील पुस्तके विद्यार्थ्यांना दिली जात

नाहीत . ती हरवतील म्हणून ! प्रयोगशाळेच्या कपाटातील सामान काढले जात नाही . फुटेल वा गहाळ होईल म्हणून ! अन् मग ऑडिटरांच्या वा वरिष्ठांच्या प्रश्नांना उत्तरे कुणी द्यायची ?

थोडक्यात , सध्याच्या इन्स्टंटच्या जमान्यात शैक्षणिक वा साहित्यिक संशोधनाचे परिणाम चटकन दिसत नसले , तरी संशोधनाची गरजच नाही असे म्हणून चालणार नाही . 'वरून संशोधन आतून प्रशासन ' असेही करून चालणार नाही . नवीन पद्धतीची उपयुक्तता पडताळून पाहणे , एखाद्या कार्यक्रमाची यशस्वी अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या अडचणी दूर करणे , मूलभूत संशोधनासाठी विषय निर्माण करणे , सर्वसामान्यात जिज्ञासा वृत्ती वाढवणे इ . अनेक बाबींसाठी संशोधन अत्यावश्यक आहे . केवळ डिग्रीपुरते नाही .

संदर्भः–


1) Borg, R. Walter and Gall D. Meredilh Educational Research (Fourth Edition) Longman Inc, 1983

2) Best, John W and Kahn James V. Research in Education (FIfth Edition) Prentice - Hall of India Pvt. Ltd., New Delhi, 1986

3) David Hustler, Tony Cassidy and Ted Cuff (Editors) Action Research in Classrooms and Schools, Allen and Unwin (Publisher) Ltd., London UK, 1986

4) Ivan Raid, Change in Education, Change in Research Education 'Research in Education' No. 47, May 1992, P. 1 - 9

५) डॉ . सदा कऱ्हाडे , साहित्य संशोधन आणि संशोधनपद्धती , महाराष्ट्र साहित्य पत्रिका , दिवाळी १९९२ , पृ . ३९ ते ४५ .

६) डॉ . ग . श्री . खैर , पाठ्यपुस्तकांचे संशोधनात्मक समीक्षण ( भाग १ ) पाठ्यपुस्तक मंडळ , पुणे ४ . १९७२ .

7) Philips D. C., What do the Researcher and the Private Practitioner have to offer to each other? Educational Researcher, Vol. 9, No. 11, 1980

8) Philip W. Jackson, The Functions of Educational Research, Educational Research Vol. 19 No. 7, October 1990.

८) डॉ . मालशे स . गं . शोधनिबंधाची लेखन पद्धती , महाराष्ट्र साहित्य परिषद , पुणे ३० , १९६७

९) जोशी व . स . (संपा .) भाषा व साहित्य संशोधन , महाराष्ट्र साहित्य परिषद , पुणे ३० , १९८१

१०) डॉ . संत , दु . का . , संशोधन पद्धती , प्रक्रिया व अंतरंग , पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन ३० , १९८८

११) डॉ . उपासनी ना . के . (संपादक) शैक्षणिक कृतिसंशोधन , पाठ्यपुस्तक मंडळ , पुणे ४ , १९७२


(सतीश पोरे , सहाय्यक संशोधन अधिकारी , पाठ्यपुस्तक मंडळ , पुणे ४)

०००

द. श्री. बापट

# भट्ट मोक्षमूलर (फ्रेडरिक मॅक्सम्यूलर)

अठराव्या शतकाच्या अखेरीस आणि एकोणिसाव्या शतकाचे सुरवातीस ईस्ट इंडिया कंपनीचे राज्य हिंदुस्थानात सुस्थिर होत असताना अनेक विद्याव्यासंगी इंग्रज अधिकाऱ्यांनी संस्कृत , अरबी फारसी हस्तलिखिते गोळा करून मायदेशी पाठविली . टिपू सुलतानाचा पाडाव झाल्यावर श्रीरंगपट्टणातील त्याचा ग्रंथसंग्रह इंग्रज अधिकाऱ्यांनी लंडनला पाठविला , पुढे तो इंडिया हाऊस लायब्ररीमध्ये जतन करून ठेवण्यात आला . ज्येष्ठ संस्कृत अभ्यासक चार्लस् विल्किन्सने इंग्लंडला परत जाताना अनेक हस्तलिखिते बरोबर नेली . सर विल्यम जोन्स यांनी वेदांची संहिता मिळविण्याचा प्रयत्न केला . कर्नल पोलियरने इ . स . १८०० चे सुमारास जयपूरमधून संपूर्ण वेदसंहितेच्या पोथ्या मिळविल्या . ब्रिटिश म्युझियममध्ये या पोथ्या ठेवण्यात आल्या . कलकत्ता वरिष्ठ न्यायालयाचे न्यायमूर्ती सर रॉबर्ट चेंबर्स यांना वाराणशीत वेदसंहिता आणि सायणभाष्याचा काही भाग मिळविण्यात यश आले . ऋग्वेदाचे पहिले अभ्यासक हेन्री कोलब्रुक यांनाही वाराणशीत वेदाची संहिता आणि सायणभाष्य उपलब्ध झाले . प्रा . एच . एच . विल्सन आणि रे . डॉ . मिल यांनी कलकत्त्यातील वास्तव्यात असाच प्रयत्न केला . इंडिया हाऊस लायब्ररीमध्ये मि . टेलर यांनी मुंबईस इ . स . १८१६-१७ साली कोणा रामभट शेंबेकर यांचेकडून नकलून घेतलेली ऋग्वेद संहितेची प्रत होती . ह्या ऋग्वेदाचा रचनाकाल खिस्तपूर्व १५०० चे सुमाराचा असावा . त्याच्या संहितेची लिखित पोथी मात्र जुन्यात जुनी रेव्ह . डॉ . मिल यांच्या संग्रहीची प्रत इ . स . १६१५ मधील होती .

फ्रान्समधील अभ्यासकांनी ऋग्वेदसंहिता लंडनहून नकलून नेल्या होत्या , तर सर रॉबर्ट चेंबर्स यांच्या वारसदारांनी त्यांच्या हस्तलिखितांचा संग्रह १८४० मध्ये लिलावाने विकला , तो प्रशियाच्या राजाने विकत घेतल्याने ऋग्वेद संहितेच्या पोथ्या बर्लिन विद्यापीठाच्या ग्रंथसंग्रहालयात दाखल झाल्या होत्या .

अशा रीतीने ऋग्वेद संहिता , पदपाठ आणि सायणभाष्य यांची हस्तलिखिते इंडिया हाऊस लायब्ररी , ब्रिटिश म्युझियम , ऑक्सफर्ड विद्यापीठातील बोदलीन ग्रंथसंग्रहालय , पॅरिसमधील कॉलेज द फ्रान्सचे संग्रहालय आणि बर्लिन विद्यापीठाचे ग्रंथालय अशा विविध ठिकाणी अभ्यासकांना एकोणिसाव्या शतकात उपलब्ध होती . ऑक्सफर्ड विद्यापीठातील प्रा . एच . एच . विल्सन ऋग्वेदाच्या इंग्रजी भाषांतराच्या प्रयत्नात होते . जर्मन अभ्यासक फ्रेडरिक रोझेन याने ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाचे लॅटिन भाषांतर करण्यासाठी इंडिया हाऊस लायब्ररीमध्ये परिश्रम केले होते . दुर्दैवाने हे भाषांतर पुरे होण्यापूर्वी तो वारला .

ऋग्वेद संहिता , पदपाठ आणि सायणभाष्य यांच्या संशोधित प्रतीचे मुद्रित स्वरूपात संपादन केले ते इंग्लंडमध्ये स्थायिक झालेला संस्कृतज्ञ भाषापंडित डॉ . फ्रेडरिक मॅक्सम्यूलर

अनुक्रमणिका

या जर्मन अभ्यासकाने . इ .स . १८४९ ते १८७४ या कालखंडात जर्मनीच्या पूर्वभागात असलेल्या देसाई या शहरात १८२३ साली फ्रेडरिकचा जन्म झाला . आताचा जर्मनी तेव्हा लहानमोठ्या पस्तीस स्वायत्त संस्थानांत विभागलेला होता . आनहाल्ट देसाइ हे त्यातले एक लहान संस्थान या संस्थानचे अधिपती ड्यूक लिझोपोल्ड फ्रेडरिक मोठे मातव्बर असामी होते . त्यांची सत्ता अनिर्बंध होती . पण जुलमी नव्हती . प्रजाजनांची त्यांच्यावर भक्ती होती आणि प्रजेच्या सुखदु:खाची काळजी राजघराण्याला असे .

म्यूलरचे वडील पेशाने शिक्षक होते . संस्थानच्या राजवाड्यातील ग्रंथालयाची व्यवस्था ते पहात , तर आईचे वडील फॉन बेसडाड हे संस्थानचे कारभारी होते . म्यूलरच्या वडिलांना संगीताची चांगली जाण होती . ते कविताही लिहीत . युरोपियन संस्कृती अंशतः ग्रीक संस्कृतीतून उद्‌भवली पण ग्रीस देश मात्र या काळात तुर्की साम्राज्याच्या जोखडाखाली होता . विल्हेम म्यूरल यांनी ग्रीसच्या स्वातंत्र्याचा पाठपुरावा करण्यासाठी ग्रीसची स्तुतिस्तोत्रे (Griechen lieder) आपल्या काव्यात गायली . विल्हेम म्यूलर तरुण वयात वारले आणि फ्रेडरिक वयाच्या चवथ्या वर्षी पोरका झाला . राजघराण्याने त्याच्या आईला वार्षिक दीडशे थ्रेडची (पौंडाचा चतुर्थांश भाग किंमतीचे जर्मन नाणे) पेन्शन मंजूर केली . ही पेन्शन फ्रेडरिक वयात येईपर्यंत मिळणार होती .त्या काळी जर्मनीत तशी स्वस्ताई होती . या तोकड्या पेन्शनच्या वळावर व नातलगांच्या मदतीने फ्रेडरिकचे आणि त्याच्या बहिणीचे शालेय शिक्षण त्याच्या आईने मोठ्या हिंमतीने पुरे केले . लहान वयापासून वडिलांचा संगीताचा वारसा फ्रेडरिकने उचलला होता . तो पियानो उत्तम वाजवे आणि साऱ्यांना त्याचे मोठे कौतुक वाटे .

महाविद्यालयीन शिक्षणासाठी म्यूलर लीपझिग विद्यापीठात दाखल झाला . भाषाशास्त्र (Philology) हा त्याच्या अभ्यासाचा विषय होता . तुलनात्मक भाषाशास्त्र आणि तत्त्वज्ञान या विषयांच्या विशेष अभ्यासामुळे जर्मन विद्यापीठांत संस्कृत अभ्यासाची परंपरा रुजू लागली होती . फ्रेडरिक श्लेगेल हा पहिला जर्मन संस्कृततज्ज्ञ . तुलनात्मक भाषाशास्त्राचा पाया फ्रान्झ वोम यांनी घातला तो ग्रीक , लॅटिन आणि संस्कृत या भाषांच्या तुलनात्मक व्याकरणामुळे . उपनिषदांच्या अभ्यासामुळे कान्ट , शोपेनहॉअर यासारखे ज्येष्ठ अभ्यासक भारतीय तत्त्वज्ञानाकडे आकर्षित झाले होते . सर विल्यम जोन्स यांनी मांडलेला ' ग्रीक , लॅटिन आणि संस्कृत या भाषा एका मूळ आर्यभाषेतून निघाल्या ' हा सिद्धांत तुलनात्मक भाषाशास्त्राच्या अभ्यासकांमध्ये संस्कृत भाषेवद्दल एक रोमांचकारी आकर्षण निर्माण करण्यास कारणीभूत झाला होता . त्यांच्या दृष्टीने संस्कृत भाषेचा अभ्यास हे एक नवीन , प्रभावी शस्त्र होते . भाषा , धर्म , मिथ्यकथा , तत्त्वज्ञान यांची आर्यभाषेतून उद्‌भवलेल्या भाषांत झालेली उत्क्रांती हा युरोपमधील विद्वानांना मोठा आव्हानाचा विषय वाटला . जर्मनीमधील विविध संस्थाने विलीन करून एक जर्मन राष्ट्र निर्माण करावे हा विचार जसा जोर धरू लागला तसा त्या राष्ट्रवादाला काही भावनिक आधार आणि अस्मिता यांची जरूर वाटू लागली . संस्कृत भाषा , भारतीय धर्म , तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासातून ही गरज भागेल असा हा काहीसा भाबडा विचार होता .

लीपझिंग विद्यापीठात म्यूलरने दोन वर्षे तुलनात्मक भाषाशास्त्र आणि तत्त्वज्ञान या विषयांचा अभ्यास केला . संस्कृतचा अभ्यास या संदर्भात करावा लागला . प्रा . ब्रोकहाउस यांच्या मार्गदर्शनाखाली त्याने हा अभ्यास केला . हितोपदेशाचे जर्मन भाषांतर त्याने पदवीसाठी

सादर केले . नलोपाख्यान आणि शाकुंतल यांचे वाचन त्याने केले होते . अभ्यासाच्या शेवटच्या सत्रात त्याला ऋग्वेदाचा प्रथम परिचय घडला . वयाच्या विसाव्या वर्षी डॉक्टरेटची उपाधी त्याला प्राप्त झाली . विद्यापीठात वादविवाद , तंटेवखेडे यांचे पर्यवसान काही वेळा द्वंद्वयुद्धात होई . लीपझिग विद्यापीठातील तीन वर्षांच्या वास्तव्यात अशी तीन द्वंद्वयुद्धे म्यूलरला लढावी लागली . पुढे ऑक्सफर्ड विद्यापीठात द्वंद्वयुद्धाचा हा प्रकार अजिवात घडत नसल्याचे पाहून त्याला मोठे आश्चर्य वाटले .

बर्लिन विद्यापीठात फ्रान्झ बोम हे तुलनात्मक भाषाशास्त्राचे मोठे अधिकारी प्राध्यापक होते . १८४३ साली त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ घेण्यासाठी म्यूलर बर्लिन विद्यापीठात दाखल झाला . प्रा . शेलिंग हे त्या विद्यापीठात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते . सांख्य तत्त्वज्ञान हा त्यांच्या अभ्यासाचा विषय होता . आत्मसाक्षात्कारावर आधारलेल्या तत्त्वज्ञानात त्यांना रुची होती . प्रा . शेलिंग यांच्या व्याख्यानांचा लाभ म्यूलरला एका सत्रापुरता घेता आला . कठोपनिषदाचे जर्मनमध्ये भाषांतर करण्याचे काम त्याने हाती घेतले होते . फावल्या वेळात मेघदूताचे भाषांतर करण्याचेही योजले होते .

बर्लिनचे राहणीमान खर्चिक होते . म्यूलरला परवडणारे नव्हते . त्याची शिष्यवृत्ती संपत आली होती . आईला मिळणारे पेन्शन निम्म्यावर येणार होते . बर्लिनला रामराम ठोकून म्यूलरने पॅरिसला जाण्याचे ठरविले ते बॅरन फॉन हागेडॉर्न या सुखवस्तू हितचिंतकाचे सल्ल्यावरून . स्वतः हागेडॉर्न पॅरिसला वास्तव्य करून होते . काही दिवस त्यांच्याकडे राहता येईल या आशेने म्यूलर पॅरिसला आला खरा . पण हागेडॉर्न बेभरवशाचे कुळ निघाले . त्यांनी दिलेला शब्द पाळला नाही . पॅरिस विद्यापीठात प्रा .यूजीन बर्न्यू या संस्कृतच्या अभ्यासकाकडून प्रथम ऋग्वेदाची आणि सायणाचार्यांच्या त्यावरील भाष्याची महती बावीस वर्षांच्या तरुण म्यूलरच्या मनावर ठसली . ऋग्वेदाचे पहिले अष्टक हा प्रा .बर्न्यू यांच्या व्याख्यानांचा विषय होता . ऋग्वेदाची हस्तलिखित संहिता आणि सायणभाष्य प्रा .बर्न्यू यांच्या संग्रही होते .

बर्लिनमधील वास्तव्यात अभिजात संस्कृत महाकाव्यांपैकी काहींचा आणि उपनिषदांचा परिचय म्यूलरला घडला होता . उपनिषदांतील उदात्त विचारांनी आणि भाषिक सौंदर्याने तो अगदी भारावून गेला होता . पण उपनिषदांहून जुन्या ऋग्वेदाच्या तुलनेत उपनिषदे गौण ठरतात , या प्रा .बर्न्यू यांच्या या विधानाने म्यूलरचे कुतूहल जागे झाले . प्रा .बर्न्यू यांनी या तरुण विद्यार्थ्यास उत्तेजन दिले आणि स्वतःच्या संग्रहीच्या ऋग्वेद संहितेची आणि सायणभाष्याची नक्कल करून घेण्याची परवानगी दिली . सायणभाष्य समजणे तसे सोपे नव्हते . प्रा .बर्न्यू यांनी काही वेळा सायणभाष्याचा अर्थ आपल्यालाही समजत नसल्याचे प्रांजळपणे कबूल केले . पण म्यूलर जिद्दीचा विद्यार्थी होता .

प्रा .बर्न्यू यांचा अनेक विषयांचा व्यासंग होता . वास्तविक व्यवसायाने ते वकील होते . फ्रान्समधील मोठ्या राजकारण्यांत त्यांची ऊठबस होती . वकिली पेशात अगर राजकारणात ते चमकून गेले असते . पण वडिलांच्या पावलावर पाऊल ठेवून ते पौर्वात्य विद्यांच्या व्यासंगाकडे वळले .(बर्न्यू यांच्या वडिलांनी ग्रीक भाषेचे व्याकरण लिहिले होते) . बौद्ध धर्माचे ते जाणकार होते . ऋग्वेदाकडे पहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन वेगळा होता . प्राग्ऐतिहासिक आर्य गणांतील माणसांची जडणघडण त्यांना या सर्वात जुन्या ग्रंथात दिसत होती . प्रा . बर्न्यू तसे अकाली वारले .

पण त्यांच्या विद्यार्थ्यांवर त्यांचे मोठे ऋण होते . प्रा .मॅक्सम्यूलर त्यांचा नेहमी कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत असत .

ऋग्वेदाची संहिता , पदपाठ आणि सायणभाष्य संपादित करून मानवी इतिहासातील हा आद्यग्रंथ मुद्रित स्वरूपात प्रकाशित करणे हे आपले कार्यक्षेत्र म्हणून म्यूलरने निवडले . ऋग्वेद संहिता आणि सायणभाष्य अनेक हस्तलिखिने पडताळून पाहून प्रकाशित करण्याचे काम दीर्घकाल चालणारे आणि खर्चिक होते . अगदी मुद्रणासाठी देवनागरी खिळे ओतण्यापासून सुरुवात करावी लागणार होती . बर्लिन अगर पॅरिसमधील सत्ताधीशांना या कामाचे महत्त्व पटवून देणे जिकिरीचे होते . आर्थिक तरतूद होईलच अशी खात्री नव्हती . जर्मनीतील क्यानिसबर्गमधील एका प्रकाशकाने वर्गणीदारांच्या मदतीने हे काम हाती घेण्याचे मान्य केले . त्यासाठी एक पत्रकही कढण्यात आले . रशियातील सेंट पीटर्सवर्ग येथील रॉयल ॲकॅडमीचे प्रा .बोटलिंग हे सल्लागार होते . या ॲकॅडमीने काही अटींवर हे काम हाती घेण्याची तयारी दाखविली . पण प्रा .बोटलिंग यांची संयुक्त संपादक म्हणून काम करण्याची अट म्यूलरला मान्य नव्हती . आर्थिक सहाय्याचेही निश्चित आश्वासन मिळाले नाही .

लंडनला ब्रिटिश म्युझियममध्ये आणि इंडिया हाऊसच्या ग्रंथालयात ऋग्वेद संहितेच्या पोथ्या उपलब्ध होत्या . प्रा .बर्न्यू यांच्या सल्ल्याने या पोथ्यांचा अभ्यास करण्यासाठी म्हणून डॉ .म्यूलर प्रथम इंग्लंडमध्ये आला . जवळ द्रव्यबळ बेताचेच होते , पण उत्साह अमाप आणि पडतील त्या कष्टांची तयारी होती . लंडनमधील प्रशियाचे राजदूत असलेले बॅरन जॉर्ज (फॉन) बुन्सेन हे मोठे विद्याव्यासंगी होते . पौर्वात्य विद्यांची त्याना गोडी होती . फ्रान्सहून येताना म्यूलरने फॉन बुन्सेन यांच्यासाठी एक ओळखपत्र आणले होते . म्यूलरची या प्रवासात योगायोगाने टाइम्सचे प्रमुख वार्ताहर विल्यम रसेल (पुढे सर विल्यम) यांच्याशी गाठ पडली . प्रवासाचे अखेरीस म्यूलरचे सामान बोट कंपनीच्या चुकीमुळे गळबटले आणि त्या परक्या मुलुखात त्यांची मोठी पंचाईत झाली . पण श्री .रसेल यांनी त्याला धीर देऊन त्या दिवशी त्याची स्वतःच्या घरी रहाण्याची सोय केली . दोघांचा स्नेह पुढे आयुष्यभर टिकला .

ऋग्वेदाची संहिता मुद्रित स्वरूपात प्रकाशित करण्याची ही कल्पना बॅरन बुन्सेन आणि इंडिया हाऊस ग्रंथालयाचे प्रमुख व्यवस्थापक – ऑक्सफर्डचे प्रा .एच .एच .विल्सन यांना पसंत पडली . ईस्ट इंडिया कंपनीची अधिसत्ता हिंदुस्थानमध्ये प्रस्थापित झालेली होती . कंपनीच्या संचालक मंडळाकडे प्रा .विल्सन आणि बॅरन बुन्सेन यांनी चिकाटीचे प्रयत्न केले . वास्तविक या व्यापारी कंपनीला ऋग्वेदाशी काहीच देणेघेणे नव्हते . जगातील सर्वात प्राचीन ग्रंथ अशा स्वरूपात उपलब्ध आहे याची जाणीव संचालक मंडळास असणे शक्य नव्हते . पण ऋग्वेद संहितेच्या मुद्रणातील सहभाग कंपनीला अनेक दृष्टींनी फायद्याचा ठरणारा होता . हिंदुस्थानातील देशी संस्थानिक आणि हिंदू प्रजाजन यांचे मनात कंपनी सरकारबद्दल आत्मीयता निर्माण होण्यास त्यामुळे मोठी मदत होणार होती . धोरणी संचालक मंडळास हे उमगले .

"The court considers that the publication of so important and interesting a work as that to which your proposals refer to in a peculiar manner deserving of patronage of the East India Company connected as it is with the early English history and language of the great

body of their Indian subjects.' अशा शब्दांत संचालकमंडळाने आपला होकार कळविला. मॅक्सम्यूलरशी (म्यूलर-इंग्रजी मिलर हे अतिप्रचारित म्हणून टाळण्यासाठी त्याचे मॅक्सम्यूलर असे नामान्तर करण्यात आले) करार झाला तो अगदी व्यापारी पद्धतीने. प्रतिवर्षी ५० फॉर्म म्हणजे क्राउन आकारातील ८०० पृष्ठे मुद्रित होतील इतका मजकूर मॅक्सम्यूलरने तयार करून द्यावयाचा होता. त्याकरिता कंपनी प्रतिफॉर्म ४ पौंड देणार होती. म्हणजे मॅक्सम्यूलरला फार तर प्रतिवर्षी २०० पौंड मिळणार होते. मुद्रणाचा बाकी व्यवहार ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या छापखान्यात होणार होता. त्याची सारी व्यवस्था कंपनी सरकारचे वतीने प्रा. एच. एच. विल्सन जातीने पाहणार होते.

ऋग्वेदाची संहिता, पदपाठ आणि सायणाचार्यांचे भाष्य आशा रीतीने ऋग्वेदाची दहाही मंडले एकंदर सहा खंडांत प्रसिद्ध करण्यात आली. प्रत्येक खंड क्राउन आकाराच्या सुमारे ८०० पृष्ठांचा होता. पहिला खंड १८४९ सालचे अखेरीस तर सहावा खंड १८७४ साली प्रसिद्ध झाला. (ऑक्सफर्ड विद्यापीठात १८५१ साली प्राध्यापक म्हणून दाखल झाल्यामुळे आणि इतर व्यवधानांमुळे पूर्ण वेळ या कामाकडे लक्ष देणे मॅक्सम्यूलरला शक्य झाले नाही).

ऋग्वेद संहितेत पाठभेद जवळजवळ नव्हते. मौखिक परंपरेनुसार वैदिकांच्या पिढ्यान् पिढ्यांच्या विशिष्ट पठनपद्धतीमुळे स्मरणशक्तीचा हा चमत्कार शक्य झाला होता. सायणाचार्यांच्या भाष्यात मात्र अनेक पाठभेद होते. काही वेळा मूळच्या पोथीत नसलेली लेखनिकाने केलेली टिपणी पुढील पोथीत घुसडली गेली होती. विजयनगर राज्यातील इ.स.१४००चे सुमारास होऊन गेलेल्या, हरिहर आणि बुक्क या प्रख्यात राजांच्या कारकीर्दीतील प्रधान माधवाचार्य यांचे माधवीय भाष्य (सायण हे त्यांचे कुलनाम असावे) वेदार्थ प्रकाश नावाच्या या टीकेच्या हस्तलिखित प्रती हिंदुस्थानातील वाराणसी, जयपूर, कलकत्ता, मुंबई इत्यादी ठिकाणांहून प्रयत्नपूर्वक मिळवलेल्या होत्या. मुद्रणाचा शोध लागलेला नव्हता तेव्हा पोथी नकलणे हे मोठे कष्टाचे काम होते. बहुशः हे काम अर्थ न समजणाऱ्या लेखकांना करावे लागे. ऋग्वेदाच्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत मॅक्सम्यूलरने या पोथीलेखकांच्या परिश्रमांचे आणि व्यथांचे दर्शन घडविणारे श्लोक उद्धृत केले आहेत.

> भग्नपृष्ठकटिग्रीवं स्तब्धदृष्टिरधोमुखं
> कष्टेन लिखित ग्रंथं यत्नेन प्रतिपालयेत् ॥

खाली मान घालून एकाग्र दृष्टीने पोथी लिहिताना पाठ दुखू लागली, कंबर मोडली. मोठ्या कष्टाने हा ग्रंथ लिहिला आहे, याचा प्रयत्नपूर्वक सांभाळ करा.

> अदृश्यभावान्मतिविभ्रमाद्वा पदार्थहीन लिखितं मयात्र
> तत्सर्वमार्यैः परिशोधनीयं कोपं न कुर्युः खलु लेखकेषु

अर्थ न लागल्याने किंवा चुकीचा समजल्याने मी जर काही वावगे लिहिले असेल, तर वाचकांनी ते सुधारून घ्यावे, बापड्या लेखकावर रागावू नये.

सायणभाष्य समजावून घेणे तसे कठीण होते. व्याकरण, तर्क, न्याय, मीमांसा इत्यादींचा अभ्यास सायणाचार्यांनी गृहीत धरला होता. भाष्यामध्ये त्यांचे संदर्भ येत. ते सारे मुळातून समजावून घ्यावे लागत. कित्येकदा संदर्भ ग्रंथ हस्तलिखित स्वरूपात होते. ते तपासून मजकूर समजावून घ्यावा लागे.

वेदसंहिता, पदपाठ आणि सायणभाष्य संपादित करताना पोथ्या ताडून पाहून ओळन् ओळ आणि शब्दन् शब्द स्वराघातचिन्हांसह तपासून घ्यावा लागे. युरोपमधील विद्यापीठात रूढ असलेल्या पद्धतीनुसार हे काम शास्त्रशुद्ध करताना फार परिश्रम घ्यावे लागले. मॅक्सम्यूलरने या कामात डॉ. आउफरेक्ट, डॉ. एगलिंग, डॉ. थिबा यांची मदत घेतली. डॉ.आउफरेक्ट बर्लिन विद्यापीठात शिकलेला संस्कृतज्ञ होता. (पुढे रोमन लिपीत पदपाठाशिवाय ऋग्वेदसंहिता जर्मन ओरिएंटल सोसायटी आणि बर्लिनमधील रॉयल ॲकॅडमी यांच्या सहकार्याने या आउफरेक्टने प्रसिद्ध केली) मुद्रणाची व्यवस्था ईस्ट इंडिया कंपनीच्या वतीने प्रा.एच.एच.विल्सन पाहत.

ऋग्वेदाची पहिली दोन पृष्ठे मॅक्सम्यूलरने प्रा.वर्न्यू यांना वानगीदाखल भेट म्हणून पाठविली. त्या जाणकार संशोधकाने या मुद्रणाचे महान आणि अप्रतिम (great and excellent) म्हणून कौतुक केले.

ऋग्वेदाचा पहिला खंड १८४९ मध्ये प्रसिद्ध करताना ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या मुद्रणालयाने या करता मोठे सुबक देवनागरी खिळे वापरले आहेत. ग्रंथारंभी गणपतीला वंदन आहे. ग्रंथाच्या दुसऱ्या पृष्ठावर स्वतःचे मोठे डौलदार संस्कृत नामकरण मॅक्सम्यूलरने केले आहे. ते पृष्ठ असे आहे-

"सायणाचार्यविरचितमाधवीय वेदार्थप्रकाशभाष्यसंहिता
शार्मण्यदेशोत्पन्नेनेग्लंडदेशनिवासिना भट्ट मोक्षमूलरेण संशोधिता
श्रीमत भारतवर्षाधिपतीनाम् अनुमत्या च उत्क्षतफरणाभिधाननगरे
विद्यामंदिरसंस्थानमुद्रासंचालये मुद्रिता संवत १९०६ वर्षे
॥ प्रथमाष्टकः ॥

मोक्षमूलर भट्ट हे नाव हिंदुस्थानात फार मार्थ वाटले आणि अतिशय लोकप्रिय झाले. शार्मण्य हे जर्मनीचे तर उत्क्षतफरण हे ऑक्सफर्डचे संस्कृतीकरण. मॅक्सम्यूलरला ही हौस आहे. प्रख्यात अमेरिकन विचारवंत इमर्सन यांना सत्याहत्तराव्या वाढदिवसानिमित्त १८८७ साली लिहिलेल्या पत्रात 'माझे अमेरिकन गुरू अमरसुनु' असे नामाभिधान केलेले आहे.

पहिल्या खंडाची सुबक बांधणीतील प्रत कंपनी सरकारच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सनी ब्रिटिश म्युझियमला भेट म्हणून पाठविली. सोबत पाठविलेल्या पत्रात संपादक म्हणून बर्लिनचे डॉ. मॅक्सम्यूलर आणि व्यवस्थापक म्हणून इंडिया हाऊस ग्रंथालयाचे प्रमुख ग्रंथपाल प्रा. एच. एच. विल्सन यांचा उल्लेख आहे. यथावकाश उरलेले खंड अशाच रीतीने भेट म्हणून पाठविण्याचे अभिवचनही या पत्रात दिलेले आहे.

मुद्रणाचे काम ऑक्सफर्ड विद्यापीठाचे छापखान्यात होत असल्याने १८४८ साली मॅक्सम्यूलर ऑक्सफर्डमध्ये येऊन राहिला. या विद्यानगरीत त्याचे पन्नास वर्षाहून अधिक काळ वास्तव्य घडणार होते.

दुसरा खंड १८५३ साली प्रसिद्ध झाला तेव्हा प्रा. वर्न्यू कालवश झालेले होते. ज्यांच्या प्रोत्साहनपर शब्दांनी आपल्याला धन्य धन्य वाटले असते. अशा या फ्रेंच पंडिताच्या निधनाबद्दल प्रस्तावनेत हळहळ व्यक्त करण्यात आली आहे. ऋग्वेदाचा शेवटचा (सहावा) खंड १८७४ साली प्रकाशित झाला तेव्हा इतक्या वर्षांच्या व्यासंगात आपला परम मित्र ऋग्वेद आता

आपल्याला अंतरणार याची रुखरुख व्यक्त करण्यात आली आहे . प्रकाशनाचा मूळचा करार ईस्ट इंडिया कंपनीशी झाला होता . १८५७ च्या बंडानंतर ईस्ट इंडिया कंपनीची हिंदुस्थानमधील अधिसत्ता संपली आणि विहक्टोरिया राणीच्या वतीने सत्तेची सारी सूत्रे इंडिया कौन्सिलकडे सुपूर्त करण्यात आली . कौन्सिलने वेदाच्या प्रकाशनाचे कार्य पुढे चालू ठेवले . १८७४ साली प्रकाशित झालेला शेवटचा खंड व्हिक्टोरिया राणीसाहेबांना समारंभपूर्वक देण्यात आला आणि या प्रकाशनाची सांगता झाली . मूळच्या करारातील रक्कम फार तोकडी होती . परंतु पुढे इंडिया कौन्सिलने मॅक्सम्यूलरला २,००० पौंड मानधन देऊन ही उणीव भरून काढली .

वेदाच्या या प्रकाशनामुळे संस्कृत अभ्यासक म्हणून मॅक्सम्यूलरची साऱ्या युरोपभर ख्याती झाली . अनेक विद्यापीठांनी सन्माननीय डॉक्टरेटची पदवी देऊन त्याचा गौरव केला . प्राच्यविद्या , तुलनात्मक भाषाशास्त्र , मानववंशशास्त्र , तत्त्वज्ञान इत्यादी विविध विषयांत रुची बाळगणाऱ्या अनेकविध अॅकॅडम्यांचे आणि सोसायट्यांचे सन्माननीय सदस्यत्व त्याला बहाल करण्यात आले . सर विल्यम जोन्स यांनी स्थापन केलेल्या एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल आणि जर्मन ओरिएन्टल सोसायटी यांचा मुद्दाम उल्लेख केला पाहिजे . नव्याने स्थापन झालेल्या एकसंध जर्मनीच्या सर्वोच्च राष्ट्रीय सन्मानासाठी (Cross of the Order of Merit) १८७३ साली फॉन मोल्टेक या ज्येष्ठ मुत्सद्याबरोबर मॅक्सम्यूलरची निवड करण्यात आली . बर्लिन मध्ये प्रशियाच्या (पुढील काळात जर्मनीच्या) राजेसाहेबांकडून त्याला भोजनाचे आमंत्रण देण्यात आले . तीस पस्तीस प्रतिष्ठित दरबारी असामींमध्ये मॅक्सम्यूलर एकटाच साध्यासुध्या वेषात होता . दरबारी रिवाजाप्रमाणे अभिवादन करण्यासाठी प्रत्येकाला राजेसाहेबांकडे आदरपूर्वक जावे लागे . मॅक्सम्यूलरच्या मनात धाकधूक होती . "ब्रम्हदेवा , तू मला तार" असे मनाशी म्हटल्याची नोंद मॅक्सम्यूलरने गमतीने केली आहे . या साध्या सरळ विद्वानाला दरबारी रीतिरिवाज थोडेच माहित असणार ! भोजनप्रसंगी यामुळे कशी तारांबळ उडाली याचे वर्णन मॅक्सम्यूलरने आपल्या आईला लिहिलेल्या पत्रात केले आहे .

१८४९ साली प्रसिद्ध झालेल्या ऋग्वेदाच्या पहिल्या खंडाच्या प्रती ईस्ट इंडिया कंपनीने एतद्देशीय संस्थानिकांना आणि कांही व्यासंगी विद्वानांना भेट म्हणून पाठविल्या . वाराणशीतील विद्वानांना आणि वैदिकांना या मुद्रणाचे अतोनात कौतुक वाटले . एका म्लेंच्छ भट्टाने भारतातील सर्वात जुन्या अपौरुषेय मानल्या गेलेल्या धार्मिक ग्रंथाची मुद्रित प्रत सायणभाष्यासह प्रसिद्ध करण्याचा संकल्प सोडावा ही कल्पनाच विद्वानांना मोठी सुखावून गेली . बंगालमधील प्रकांड पंडित राजा राधाकांत देव यांनी 'शब्दकल्पद्रुम' या आपल्या कोशाचे सहा खंड मोक्षमूलरभट्टाला प्रतिभेट म्हणून पाठविले आणि सोबतच्या पत्रात ऋग्वेदाच्या प्रकाशनाचे मनःपूर्वक स्वागत केले . पुण्यातील सरकारी संस्कृत पाठशाळेचे प्रमुख डॉ .मार्टिन हाइग यांनी १८६२ साली मॅक्सम्यूलरला पत्र लिहून पुण्यातील वैदिकांच्या सभेचा वृत्तांत कळविला आहे . ऋग्वेदाचे पहिले तीन खंड तेव्हा प्रसिद्ध झाले होते . वैदिकांनी या सभेत आपापल्या पोथ्या या मुद्रित प्रतीशी ताडून पाहून प्रकाशनाचे काम करणारा हा म्लेंच्छ भट्ट वेदशास्त्रसंपन्न असल्याचा निर्वाळा दिला आहे . मुंबईहून शंकर पांडुरंग पंडित यांनी १८८२ साली लिहिलेल्या पत्रात सोबत पाठविलेल्या छायाचित्रातील कोणा केशवभट्ट नानाच्या दशग्रंथी वैदिकाचा अभिमानाने उल्लेख केला आहे . " वयाच्या सहाव्या वर्षी देवीच्या साथीत नेत्रहीन बनलेला हा वैदिक केवळ

मौखिक संथेने सारी ऋग्वेद संहिता, पदपाठ, क्रमपाठ अचूक शिकला आहे. तुमच्या मुद्रित संहितेवरून मी त्याची अनेकदा परीक्षा घेतलेली आहे. एकाही अक्षराची, स्वराची, आघाताची चूक याच्या पठणात घडत नाही. हा केवळ स्वतः वैदिक आहे. इतकेच नसून इतरांना शिकवतोही." विजयनगरच्या महाराजांनी ऋग्वेद संहितेची दुसरी आवृत्ती काढण्यासाठी येणारा ४,००० पौंडांचा सारा खर्च तर देऊ केलाच, पण या कामासाठी चार वर्षेपर्यंत एका सहाय्यकाचा पगार देण्याची तयारी दर्शविली. वास्तविक स्वतः महाराज पशुपती आनंद, गजपती राजा काही वेदविद्येचे जाणकार होते असे नाही. इतर देशी संस्थानिकांप्रमाणे ते ख्याली खुशालीत मग्न असत. सायणाचार्य विजयानगरच्या आश्रयाला होते. म्हणूनही राजेसाहेबांना आत्मीयता वाटली असावी. हे मोठे पुण्यकर्म आहे असा महाराजांचा विश्वास होता. मॅक्सम्यूलरला लिहिलेल्या पत्रात, हे कार्य मोक्षदायी आहे ('It is good for my soul') असा उल्लेख आहे. ऋग्वेदाची ही दुसरी आवृत्ती प्रख्यात अभ्यासक विंटरनिट्झ यांच्या मदतीने १८८८ ते १८९२ या कालखंडात प्रसिद्ध करण्यात आली.

ऑक्सफर्ड विद्यापीठातील प्राध्यापकांची पदे विद्यापीठाला मिळालेल्या देणग्यांतून निर्माण झालेली होती. टेलर इन्स्टिटयूटमधील युरोपीय भाषांच्या प्राध्यापक पदावर काम करणारे प्रा. ट्रिथेन हे मनोरुग्ण झाल्याने १८५१ साली त्यांचेजागी प्रथम अर्धपगारावर आणि पुढे ट्रिथेन यांच्या मृत्यूनंतर १८५४ साली पूर्णवेळ पगारावर युरोपियन भाषांच्या प्राध्यापकपदाची नोकरी मॅक्सम्यूलरला मिळाली. ऋग्वेद प्रकाशनाच्या उत्पन्नाला वार्षिक ४०० पौंडाची जोड मिळाल्याने मॅक्सम्यूलरला स्वास्थ्य लाभले. आय.सी.एस. परीक्षांमध्ये संस्कृतचा परीक्षक म्हणूनही तो काम पहात असे, त्यातूनही थोडी अधिक प्राप्ती होई.

मधून मधून जर्मनीस परत जाण्याची आणि इंग्लंडला रामराम ठोकण्याची उर्मी मॅक्सम्यूलरचे मनात येई. तो कमालीचा मातृभक्त होता. जर्मनीत आपल्या वृद्ध आईसमवेत रहावे असे त्याला वाटे, पण प्रा. एच. एच. विल्सन यांचा मॅक्सम्यूलरने अंगिकारलेले ऋग्वेद प्रकाशनाचे मूळ काम अपुरे सोडण्याला ठाम विरोध होता. तशात जर्मनीत बरीच उलथापालथ चालू होती. सारी जर्मन संस्थाने विलीन करून प्रशियाच्या अधिपत्याखाली एकसंध जर्मन राष्ट्र बनवावे यासाठी बिस्मार्कसारखा मुत्सद्दी प्रयत्नशील होता. फ्रान्स आणि जर्मनी यांचे राजकीय संबंध बिघडत चालले होते. मॅक्सम्यूलरची मनःस्थिती द्विधा असे. इंग्लंडमध्ये स्थायिक होणे खरे, पण आपले 'जर्मनपण' तो विसरू शकत नव्हता. त्याचा तो मोठा अभिमानाचा विषय होता.

ऑक्सफर्ड विद्यापीठाने मॅक्सम्यूलरला सामावून घेतले खरे, पण तेथील जाणकार विद्वानांना त्याच्या कार्याची महती पटली होती. पण ऑक्सफर्डने ही मान्यता थोडे हातचे राखून दिलेली होती याचे प्रत्यंतर १८६० साली प्रा. एच. एच. विल्सन यांच्या मृत्यूनंतर आले. प्रा. विल्सन संस्कृत भाषेच्या बोडेन प्राध्यापकपदी होते. बोडेन संस्कृत अध्यासन हे मोठे मानाचे समजले जाई: ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यातील निवृत्त अधिकारी कर्नल बोडेन यांनी आपल्या मृत्युपत्राद्वारे आपली सुमारे २५,००० पौंडांची मालमत्ता ऑक्सफर्ड विद्यापीठाचे स्वाधीन केली होती. या देणगीतून संस्कृत भाषेचे हे प्राध्यापकपद निर्माण करण्यात आले होते. देणगीदारांचा उद्देश 'संस्कृत भाषेच्या सविस्तर आणि सखोल अभ्यासामुळे हिंदुस्थानातील नागरिकांना ख्रिस्ती

धर्माची महती बायबलद्वारे पटवून देऊन त्यांना त्या धर्माची दीक्षा देण्यास मदत होईल' असा होता . या पदाचे वार्षिक वेतन ( १ ,००० पौंड) त्या काळातील राहणीमानानुसार भारी होते . हे पद आपल्याला सहज प्राप्त होईल असे मॅक्सम्यूलरला वाटले . पण या पदासाठी प्रख्यात संस्कृत कोशकार मोनिथर विल्यम्स हे दुसरे उमेदवार होते . निवडणूक कॉन्व्होकेशनच्या सुमारे ३ ,६०० सभासदांच्या मतांवर ठरणार होती . दोन्ही विद्वानांच्या वतीने पत्रके काढण्यात आली . वृत्तपत्रांत पत्रे प्रसिद्ध करण्यात आली . एका बाजूने युरोपमधील सर्वश्रेष्ठ संस्कृत जाणकार म्हणून मॅक्सम्यूलरची प्रशस्ती केली . तर वेदांचा अभ्यास हा कालबाह्य , निरुपयोगी संस्कृतचा , तर आपला अभिजात संस्कृतचा अभ्यास अधिक व्यवहारपयोगी असा विल्यम्सचा दावा होता . मोनियर विल्यम्सला देवनागरी हस्तलिखित संहिताही नीट उलगडत नाही असे मॅक्सम्युलरचे पाठीराखे म्हणत . तर मॅक्सम्यूलरचे इंग्रजी भाषेचे ज्ञान तोकडे आहे असे प्रतिपक्ष सांगत होता . मोनियर विल्यम्सचा मुख्य भर कर्नल बोडेन यांच्या इच्छेप्रमाणे ख्रिस्ती धर्मप्रसाराला वेदकालीन जुनाट संस्कृतचा काय उपयोग यावर होता . मॅक्सम्यूलरच्या मते वेद म्हणजे हिंदू धर्माचा प्रमाणग्रंथ . त्याचे ज्ञान म्हणजे धर्मप्रसारकांना शत्रूच्या अगदी आतल्या गोटातील बातमी कळण्यासारखे आहे , मात्र त्याने या निवडणुकीचे वेळी मांडलेले नाही — ऑक्सफर्डचे ख्रिस्ती धर्मशास्त्राचे गाढे विद्वान डॉ .पूसी आणि कलकत्त्याचे बिशप यांनी वेदांच्या अभ्यासामुळे ख्रिस्ती धर्मप्रसाराला कशी मदत झाली आहे , ते आवर्जून सांगितले . थोडक्यात म्हणजे लोकशाही पद्धतीप्रमाणे दोन्ही पक्षांनी मतदात्यांना वळविण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली . मोनियर विल्यम्सला ८३३ तर मॅक्सम्यूलरला ६१० मते पडली . मॅक्सम्यूलरच्या चहात्यांची निराशा झाली . इंग्रज परकीयाला काही मर्यादेपर्यंतच स्वीकारतो हेच खरे .

फावल्या वेळात थोडेफार द्रव्यार्जन करावे म्हणून विद्यापीठाच्या बोदलीन ग्रंथालयात सहायक ग्रंथपालपदी नेमणूक व्हावी यासाठी प्रयत्न केला . हे काम त्याला सहज मिळाले . त्याच्याइतका जाणकार संस्कृतज्ञ ग्रंथालयाला मिळणे तसे दुरापास्त होते . सुमारे दीड वर्षे हे काम त्याने सांभाळले . आय् .सी .एस .परीक्षांमध्ये संस्कृत भाषेचा परीक्षक म्हणूनही तो काही वर्षे काम पहात असे . अखेर चाहत्यांच्या प्रयत्नांमुळे विद्यापीठाने मॅक्सम्यूलरसाठी तुलनात्मक भाषाशास्त्राचे खास प्राध्यापकपद निर्माण केले . मात्र बोडेन प्राध्यापकपद न लाभल्याची रुखरुख मॅक्सम्यूलरच्या मनात कायम राहिली .

तुलनात्मक भाषाशास्त्राच्या माध्यमातून मॅक्सम्यूलर ऋग्वेदाकडे वळला . प्राच्यविद्येकडे पहाण्याचे दोन टोकांचे दृष्टिकोन तेव्हा रुढ होते . ही विद्या निष्प्रभ , निरुपयोगी , टाकाऊ आहे , हिचा पाठपुरावा करण्याचे प्रयत्न हाणून पाडले पाहिजेत , असे मानण्यात हिस्टरी ऑफ ब्रिटिश इंडिया या ग्रंथाचे लेखक जेम्स मिल , आणि भारतीय शिक्षणविषयक नीती ज्यांच्या टिपणाच्या आधारे तयार झाली तो लॉर्ड मेकॉले यांचा समावेश केला पाहिजे . जेम्स मिलच्या १८१७ साली प्रसिद्ध झालेल्या इतिहासात , हिंदुस्थानात प्रगत संस्कृती कधीही अस्तित्वात नव्हती , असे म्हटले आहे सत्याची चाड नसलेले , दुराचारी , सतत कज्जेदलाली करणारे भ्याड असे तो सर्वसाधारण हिंदूंचे वर्णन करतो . मेकॉलेने आपल्या शिक्षणविषयक टिपणात , "यूरोपमधील चांगल्या ग्रंथसंग्रहालयात एका शेल्फवर मावणारा ग्रंथसंभार हिंदुस्थान आणि अरबस्थान यांच्यातील साध्या ग्रंथसंपदेला भारी ठरेल" आणि "इंग्लंडमधील एखाद्या शाळेच्या

अनुक्रमणिका

अभ्यासक्रमात वापरल्या जाणाऱ्या त्रोटक, संक्षिप्त पुस्तकातही संस्कृत भाषेतील साऱ्या साहित्याहून अधिक उपयुक्त माहिती सामावलेली आहे'' असे उद्गार काढले आहेत. याउलट अभिजात संस्कृत साहित्याचा पहिला अभ्यासक सर विल्यम जोन्स, जर्मन तत्त्वज्ञ हेगेल, कान्ट, शॉपेनहॉअर, श्लेगेल इत्यादींनी प्राच्यविद्येचे अतिशयोक्त पण चांगले मूल्यमापन केले. संस्कृत ही त्यांच्या दृष्टीने सर्व प्रगत भाषांची जननी शोभणारी, आधुनिक जगाला भेडसावणाऱ्या साऱ्या प्रश्नांची उकल प्राच्यविद्या आणि तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासाने होईल, असा त्यांना विश्वास वाटे.

मॅक्सम्यूलर यात मध्यममार्गी होता. ऋग्वेदाच्या मुद्रणाचे वेळी 'ऋग्वेद हा हिंदूंचा सर्वश्रेष्ठ धर्मग्रंथ. बायबलच्या प्रथम मुद्रणामुळे यूरोपमध्ये ख्रिस्ती धर्मानुयायांना जो लाभ झाला तसा काही प्रकार हिंदूंचे बाबत होईल' असे त्याला वाटत होते. पण ऋग्वेद काही बायबल अगर कुराणासारखा एकमेव धार्मिक प्रमाणग्रंथ म्हणून हिंदूंच्या धर्मकृत्यात मान्य नाही. बहुसंख्य हिंदूंचे धर्माचरण श्रुती, स्मृती, पुराण आणि रुढी यांवर आधारलेले असते. अनेक अवैदिक देवता, व्रतवैकल्ये यांवर आपण भर देतो, म्हणून ऋग्वेद संहिता प्रमाणग्रंथ म्हणून फार थोड्या प्रमाणात वापरली जाते.

तीन हजार वर्षापूर्वीच्या भारतीय आर्यशाखेचा सामाजिक, धार्मिक, तत्त्वज्ञानविषयक इतिहास मॅक्सम्यूलरला वेदामध्ये स्पष्ट जाणवतो. तुलनात्मक भाषाशास्त्रानुसार संस्कृत, लॅटिन आणि ग्रीक या भाषा एका मूळ भाषेतून उद्भवल्या. या मूळ भाषा बोलणाऱ्या समूहाला तो आर्य हे नाव देतो. मॅक्सम्यूलर आर्य शब्दाची व्युत्पत्ती ''अर'' या धातूपासून आहे असे मानतो. अर म्हणजे नांगरणे. नांगरतो तो आर्य. ही आर्य वस्ती मध्य आशियात पामीरच्या पठाराच्या भागात असावी. या जमातीच्या स्थलांतरात एक शाखा दक्षिणेकडे वळली, ती संस्कृत भाषा आर्यांची. वेदांची रचना म्हणजे या शाखेच्या धर्मकल्पनेचा काव्यमय आविष्कार. आर्य शाखांपैकी एक इराणमध्ये स्थायिक झालेली, संस्कृतशी साम्य असणारी झेंद भाषा बोलणारी, वेदातील देवदेवता काही अंशी मानणारी, अवेस्ता या धर्मग्रंथाला अनुसरणारी अग्निपूजक शाखा, या उलट थेट उत्तरेला निघालेली आर्यशाखा म्हणजे ग्रीक, लॅटिन भाषा बोलणारे, ग्रीक, रोमन, केल्टिक, जर्मन, स्लाव्ह इत्यादी सतत प्रतिकूल निसर्गाशी झगडावे लागल्याने अत्यंत उद्यमशील झालेल्या लढवय्या जातींची. आजच्या युरोपियन संस्कृतीला वारसा आहे तो बव्हंशी या आर्यशाखेचा.

ऋग्वेदाकडे मॅक्सम्यूलर दक्षिणेकडे वळलेल्या, पंजाब आणि गंगा यमुना यांच्या सुपीक परिसरात स्थिरावलेल्या आर्यशाखेच्या भाषिक, धार्मिक आणि तत्त्वज्ञानविषयक उत्क्रांतीतील एक महत्त्वाचा टप्पा म्हणून पहातो. वेदातील देवदेवता निसर्गशक्तींबद्दल वाटणारी भीती, आदर, कृतज्ञता या सहजप्रवृत्तींतून कशा निर्माण झाल्या आणि उत्तरोत्तर त्यांचे उदात्तीकरण कसे झाले याचा ऊहापोह मॅक्सम्यूलर करतो. ऋग्वेदाच्या रचनेचा काळ तो ख्रिस्तपूर्व १,५०० ते १,००० हा मानतो. वैदिक देवता पूर्व आणि पश्चिम उजळून टाकणारे संधिकाल, सूर्योदय, आकाश आणि पृथ्वी यांचे क्षितिजाशी होणारे मीलन, मेघ दाटून येणे, विजांचा कडकडाट, सोसाट्याचा वारा, आगीचे लोळ, पर्जन्यवृष्टी, वेगाने वहाणाऱ्या आणि बोलताबोलता प्रचंड रूप धारण करणाऱ्या नद्या यांची प्रतीके आहेत. या समाजाची सुखदुःखे, आशा आकांक्षा

गुणावगुण छंदोबद्ध ऋचांमध्ये ग्रंथित होऊन धर्मग्रंथाच्या स्वरूपात उपलब्ध असावेत हा मॅक्सम्यूलरच्या मते मोठा कौतुकाचा आणि अभिमानाचा विषय आहे . वेदांना अपौरुषेय मानणे त्याला मान्य नाही . त्या काळाच्या मानाने वेदकालीन समाज सुसंस्कृत आणि सुसंघटित आहे . त्याची राज्यसंस्था आहे . समाज कृषिव्यवसाय जाणणारा , सप्तसिंधूच्या काठावर वसलेला आहे . त्याची भाषा व्याकरणबद्ध आहे . लिपीची जाण या समाजाला नाही . त्यामुळे मौखिक परपरेत जपता येईल अशा स्वरूपात या समाजातील कवींची अभिव्यक्ती आहे .उदात्त तात्त्विक विचारांबरोबर वेदमंत्रात पोरकट , थिल्लर कमालीचा ऐहिक विचारही आहे . तरीही मॅक्सम्यूलर वेदांमध्ये तीन प्रकारचे उदात्त विचार आहेत असे मानतो . नैसर्गिक शक्तींचे उदात्तीकरण करून त्यांना देवतारूप देणे , पितरांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करणे आणि इंद्रियांतीत आत्मतत्त्वाची जाण बाळगणे हे ते तीन अतीत विचार होत (Three beyonds) .

ऋग्वेद प्रकाशनाचे पडसाद हिंदुस्थानात विविध स्वरूपात उमटले . आर्यभाषासमूहाची कल्पना भारतीय अस्मितेला मोठी सुखावून गेली . विजयीषु युरोपियन संस्कृतीच्या तुलनेने हिंदू संस्कृती अगदीच नगण्य नाही . साऱ्या जगाने आत्मसात करावा असा काही विचार वेद आणि उपनिषदे यांमध्ये आहे . ग्रीक आणि लॅटीन भाषातील साहित्याच्या तोलाचे साहित्य संस्कृत भाषेत आहे हा विचार नवीन इंग्रजी पद्धतीने शिक्षण घेणाऱ्या सुशिक्षितांनी अंतर्मुख होऊन , हिंदूसमाजात सामाजिक आणि धार्मिक सुधारणा करून , एकेश्वरी मूर्तिपूजा न करणारा एक प्रमाणग्रंथ मानणारा , जातिभेदविरहित नवा समाज निर्माण करण्याचा प्रयत्न केला . बंगालमध्ये राजा राममोहन रॉय , केशवचंद्र सेन आणि प्रतापचंद्र मुजुमदार यांनी स्थापन केलेला ब्राह्मो समाज हा असाच एक प्रयत्न . यापैकी केशवचंद्र सेन यांचा मॅक्सम्यूलशी घनिष्ठ परिचय होता . इंग्लंडमधील वास्तव्यात केशवचंद्रांनी अनेक वेळा अनेक विषयांवर चर्चा केली होती . केशवचंद्र आपल्या ब्राह्मोसमाजासाठी बायबल प्रमाणग्रंथ म्हणून मानतील अशी मॅक्सम्यूलरची समजूत झाली होती . प्रारंभी ब्राह्मोसमाजाच्या संस्थापकांना ऋग्वेद असा प्रमाणग्रंथ होऊ शकेल असे वाटत होते . प्रत्यक्षात ब्राह्मोसमाजाचे प्रार्थनापुस्तक उपनिषदावर आधारलेले बनविण्यात आले . केशवचंद्रांचे स्नेही महर्षी देवेंद्रनाथ ठाकूर यांचा मोठा हातभार होता . देवेंद्रनाथ यांचे पुत्र आणि पहिले भारतीय आय .सी .एस् अधिकारी सत्येंद्रनाथ टागोर यांनी अहमदाबादहून १८६३ साली मॅक्सम्यूलरला लिहिलेल्या पत्रात ब्राह्मोसमाजाची एकेश्वरी तत्त्वप्रणाली विशद करून सांगण्यात आली आहे . " ईश्वर सर्वव्यापी , सर्वसाहसी , निराकार , परम दयाळू आहे . ईश्वरी साक्षात्कार पुन:पुन्हा काही अवतारी पुरुषांना होत असतो . असे सर्व महात्मे ब्राह्मोसमाज वंदनीय मानतो . खिस्त आणि महंमद हे असेच अवतारी पुरुष होत . ब्राह्मोसमाज मूर्तिपूजा , जातिभेद मानीत नाही . आमचा एकमात्र असा प्रमाणग्रंथही नाही . आत्म्याच्या अमरत्वावर आमचा विश्वास आहे . ईश्वराची प्रार्थना आणि नित्य उपासना या योगे आत्म्याचे उन्नयन होते . परलोकी चिरंतन सुखसमाधान प्राप्त होते अशी आमची धारणा आहे .

स्खलनशील मानवजातीची सर्व पातके एकट्या खिस्ताच्या आत्मबलाने धुतली जातील . याच्याशी ब्राह्मोसमाज सहमत होऊ शकत नाही . एखाद्या निष्पाप निरपराध्याला पातक्यांचा उद्धार करण्यासाठी सुळी चढवणे आणि सर्वच्या सर्व पातकांचे ओझे त्याच्या माथी देणे हे न पटण्यासारखे आहे . यापेक्षा ईश्वराच्या दयाळूपणावर भरवसा ठेवून मरणोत्तर प्रत्येक

आत्म्याला सत्कर्मांचे उचित फळ आणि पातकाबद्दल शिक्षा होऊन त्याचा उत्तरोत्तर सुखसमाधानाच्या मार्गावर त्याची प्रगती होईल असे आम्ही मानतो .

ब्राह्मोसमाज तत्त्वतः बालविवाहाच्या विरुद्ध असला तरी केशवचंद्रांनी आपल्या वयास न आलेल्या मुलीचा विवाह कुचबिहारच्या अल्पवयीन राजपुत्राशी ठरविला . ब्राह्मसमयी वराचे वय १५ वर्षांचे तर मुलीचे १३ वर्षांचे होते . या राजाश्रयामुळे ब्राह्मोसमाज वाढेल असा दैवी संकेत आहे असा केशवचंद्रांचा दावा होता . पण या तत्त्वच्युतीमुळे ब्राह्मोसमाजात फाटाफूट होऊन ब्राह्मोसमाज , आदिब्राह्मोसमाज आणि सुधारक ब्राह्मोसमाज असे तीन पंथ निर्माण झाले . या घटनेमुळे मॅक्सम्यूलरला फार खेद वाटला . केशवचंद्रांबद्दल त्याला फार ममत्व वाटे .

केशवचंद्रांच्या मृत्यूनंतर ( १८८३ ) मॅक्सम्यूलरने लंडन टाइम्समध्ये पत्राद्वारे शोक व्यक्त केला . केशवचंद्रांचा उचित शब्दांत गौरव करून त्यांचा उल्लेख २५ कोटी भारतीयांतील सर्वश्रेष्ठ विचारवंत असा या पत्रात केला आहे .

ब्राह्मोसमाज शेवटी ख्रिस्ताचा स्वीकार करेल असे त्याला मनोमन वाटत होते . प्रतापचंद्र मुजुमदार यांना १९०० साली लिहिलेल्या आपल्या अखेरच्या पत्रात " आपण ब्राह्मोसमाजाच्या अनुयायांनी ख्रिस्ती बनावे म्हणून प्रयत्न करत आहोत असे कृपा करून मानू नका . ख्रिस्ती विचारांशी ब्राह्मोसमाज सहमत नसेल तर तसे स्पष्ट बोला . मूर्तिपूजा , जातिभेद , हे हिंदू धर्माचे स्वरूप तुम्हाला मान्य नाही हे तर उघड आहे . या धर्मातील जे त्याज्य आहे ते निर्भयपणे टाकले पाहिजे या धर्माला स्वीकारण्याजोगा भाग कोणता ? धर्म शेवटी सर्वसामान्याला स्वीकारण्याजोगा असला पाहिजे . एकीकडे तुम्हीच ख्रिस्ताशिवाय हिंदुस्थानचा निभाव लागणार नाही असे म्हणता . ब्राह्मोसमाजाच्या धर्माची रूपरेषा एकदा निश्चित करा , म्हणजे आपण एकमेकांना नीट समजावून घेऊ शकू " असे तळमळीने लिहिले आहे .

महर्षी दयानंद सरस्वती यांनी स्थापन केलेल्या ( १८६२ ) आर्यसमाजाचा उद्देश ऋग्वेदाला अपौरुषेय प्रमाणग्रंथ मानून मूर्तिपूजाविरहित , जातिविरहित वैदिक धर्माची परंपरा पुन्हा निर्माण करण्याचा होता . मॅक्सम्यूलरच्या ऋग्वेदाचा त्यांच्यावर प्रभाव पडला होता असे म्हणण्यास काही आधार नाही . दयानंदांची भूमिका मॅक्सम्यूलरला एकांगी , अतिरंजित व अवास्तव वाटे .

मॅक्सम्यूलरला हिंदुस्थानला भेट देण्याची इच्छा होती . दोनदा तशी शक्यताही निर्माण झाली होती , पण तो योग जुळला नाही . १८७५ साली प्रिन्स ऑफ वेल्स यांच्याबरोबरच्या मंडळीत त्याचेही नाव होते . पण ते गाळले गेले . श्री . मलबारी वगैरे भारतीय मित्रांनी नंतर बोलावले , पण प्रकृती ठीक नसल्याने त्याला येता आले नाही . " संस्कृत तज्ज्ञांमध्ये कशा प्रकारचे हेवेदावे असतात याची तुम्हाला कल्पना नाही . मी हिंदुस्थानच्या बाजूने बोलतो म्हणून आमच्या आय .सी .एस . मित्रांना काही कमी पोटदुखी नाही . तरीही या मंडळींकडे मी नेहमी दुर्लक्ष करीत आलो आहे . " असे त्याने कळविले .

ऑक्सफर्ड विद्यापीठातील आपले काम सोडण्याची इच्छा त्याने पत्राद्वारे विद्यापीठास कळविली . त्याच्या मनात यावेळी " पौर्वात्य देशांतील धर्मग्रंथ " (Sacred Books of the East) ही मालिका प्रसिद्ध करण्याची इच्छा घोळत होती . ऑस्ट्रियन सरकारने व्हिएन्नाहून

ही मालिका प्रसिद्ध करण्याची इच्छा व्यक्त केली . व्हिएन्ना विद्यापीठात संस्कृत या विषयाकरिता प्राध्यापकपद नव्याने निर्माण करून ते मॅक्सम्यूलरला देण्याची तयारी दर्शविली . तेव्हा ऑक्सफर्ड विद्यापीठातील म्यूलरच्या चहात्यांनी खास सभेत ठराव करून विद्यापीठ मुद्रणालयामार्फत मॅक्सम्यूलरची नियोजित ग्रंथमाला पुरी करण्याचे मान्य केले . इंडिया कौन्सिलने यासाठी अर्थसहाय्य देऊ केले . मॅक्सम्यूलरच्या प्राध्यापकपदाचा भार हलका व्हावा . म्हणून एका सहाय्यक प्राध्यापकाची नेमणूकही करण्यात आली . ऑक्सफर्ड विद्यापीठातील ख्राइस्ट चर्च कॉलेजचे डीन लिडेल यांनी या सभेत मॅक्सम्यूलरच्या कामगिरीचा गौरव केला .

धर्मग्रंथांच्या या मालिकेत शेवटच्या अनुक्रमणिका खंडासह एकंदर ५० खंडात २३ प्रमाणग्रंथांचे भाषांतर प्रसिद्ध करण्यात आले . हे महत्कार्य मॅक्सम्यूलरला त्याच्या अखेरपर्यंत (१९००) पुरले . युरोपमधील अनेक अभ्यासकांचा या भाषांतर प्रक्रियेत सहभाग होता . त्यांच्याशी पत्रव्यवहार करणे , त्यांनी पाठविलेल्या भाषांतरात वेळप्रसंगी बदल करणे , मुद्रित तपासणे , प्रकाशनाचे वेळापत्रक सांभाळणे , लहरी अभ्यासकांना सांभाळून घेणे , त्यांच्यामागे तगादा लावणे असे प्रमुख संपादक म्हणून मॅक्सम्यूलरच्या कामाचे स्वरूप होते . वैदिक (हिंदू धर्म , झरथुष्ट्राचा धर्म , बौद्ध आणि जैन धर्म , कुंग फू त्से आणि लाओ त्से यांचे धर्म आणि इस्लाम या पौर्वात्य धर्मांचे हे प्रमाणग्रंथ होते . मुळात यहुदी आणि ख्रिस्ती धर्मांचाही या यादीत समावेश होता . पण या धर्मांचे व्यासंगी याबाबत अवास्तव हळवे होते . यहुदी आणि ख्रिस्ती धर्मांना या मालिकेत बसवणे त्यांना अपमानकारक वाटले . पवित्र ग्रंथांची मालिका प्रसिद्ध करून ख्रिस्ती धर्मावरील श्रद्धा डळमळीत होईल अशी त्यांना धास्ती वाटली .

हितोपदेश आणि मेघदूत यांचे जर्मन भाषांतर या मॅक्सम्यूलरच्या तरुण वयातील कृती . बंगाली भाषेचा व्याकरणाच्या दृष्टीने अभ्यास त्याने १८४७ मध्ये प्रसिद्ध केला . इंग्लंडमध्ये स्थायिक झाल्यावर त्याने बहुतांशी लिखाण इंग्रजी भाषेत केले . १८४९ ते १८७३ या कालखंडात ऋग्वेद संहिता , पदपाठ आणि सायणभाष्य यांचे मुद्रित प्रकाशन हे त्याचे प्रमुख कार्य असले तरी इतर अनेक विषयांत त्याला रुची होती . संस्कृत भाषेचे व्याकरण त्याने १८६६ साली लिहिले . तुलनात्मक भाषाशास्त्र , आर्यभाषासमूहांत धर्मकल्पना , पुराणकथा आणि मिथ्यकथा यांची उत्क्रांती कशी झाली , भाषांच्या जडणघडणीचा शास्त्रशुद्ध विचार , भारतीय ज्योतिर्विज्ञान , वेदान्तविचार , रामकृष्ण परमहंसांचे विचार इत्यादि अनेक विषयांवर त्याने लेखन केले . व्याख्यानमाला गुंफल्या . या व्याख्यानमाला ग्रंथरूपाने छापून प्रसिद्ध झाल्या . सायणभाष्याला अनुसरून ऋग्वेदाच्या भाषांतराचा त्याचा पहिला खंड १८६९ मध्ये प्रसिद्ध झाला . सविस्तर टीपांच्या हव्यासामुळे हे काम लांबले आणि पुरे होऊ शकले नाही . (प्रा . होरेस विल्सन यांचे ऋग्वेदाचे अपुरे राहिलेले भाषांतर मात्र प्रा . वॅलन्टाइन यांनी पूर्ण केले . मॅक्सम्यूलरच्या मते हे भाषांतर गोळाबेरीज पद्धतीचे आहे .)

मॅक्सम्यूलर हा त्या काळातील (१८६०-१९००) फार लोकप्रिय वक्ता होता . वास्तविक पहाता तुलनात्मक भाषाशास्त्र , धर्मकल्पनेची उत्क्रांती , भाषांची जडणघडण इत्यादि मॅक्सम्यूलरच्या अभ्यासाचे विषय काही सर्वसामान्य श्रोत्यांसाठी नव्हते . पण मॅक्सम्यूलरच्या विद्वत्तेचे तत्कालीन इंग्लंडने मोठे कौतुक केले . व्हिक्टोरिया राणीच्या ऑसबोर्न या निवासस्थानी त्याचे खास व्याख्यान योजण्यात आले . राणीने ते विणकाम न करता एकाग्रतेने ऐकले . स्वतः

अनुक्रमणिका

व्हिक्टोरिया राणी आणि राजघराण्यातील अनेक व्यक्तींचे त्याच्याशी मोठे स्नेहाचे संबंध होते. स्वतः व्हिक्टोरिया राणी जर्मन उत्तम बोलत असे. मॅक्सम्यूलरबद्दल त्यामुळे तिला आपुलकी वाटे.

मॅक्सम्यूलरचा पत्रव्यवहार दांडगा होता. स्वतःची आई, मुले, पत्नी यांच्याशी आणि अनेक मित्र, राजघराण्यातील व्यक्ती, ग्लॅडस्टनसारखे पंतप्रधानपद भूषविलेले ज्येष्ठ राजकारणी, लॉर्ड रिपनसारखा हिन्दुस्थानचा व्हॉईसरॉय यांना लिहिलेली पत्रे चरित्रग्रंथात छापलेली आहेत. ग्लॅडस्टन हे उदारमतवादी पंतप्रधान ऑक्सफर्डचे लोकप्रतिनिधी होते. त्यांची काही राजकीय मते मॅक्सम्यूलरला न पटणारी होती. पण या मुत्सद्याचा लॅटिन आणि ग्रीक भाषांचा अभ्यास सखोल होता. मॅक्सम्यूलरशी त्यांच्या या भाषांचे संदर्भात पत्रव्यवहार चाले. लॉर्ड रिपन व्हॉईसरॉय असताना लीगल मेंबर श्री. इलबर्ट यांनी युरोपियनांविरुद्धचे खटले जिल्हा स्तरावरील भारतीय न्यायाधीशांसमोर चालविण्यासाठी काही मर्यादेपर्यंतचा अधिकार न्यायखात्याला देण्यासंबंधीचे बिल मांडले. कलकत्ता चेंबर ऑफ कॉमर्स, सनदी नोकर, अँग्लोइन्डियन आणि इंग्लंडमधील टोरी राजकारण्यांनी या बिलाला कडाडून विरोध केला. मॅक्सम्यूलरने लंडन टाइम्समध्ये पत्र लिहून या बिलाला पाठिंबा दिला (१८८३). लॉर्ड रिपन यांनी याबद्दल आभार मानणारे पत्र लिहिले आहे.

या पत्रव्यवहारात एक पत्र मॅक्सम्यूलरने आपल्या नवजात नातवाला (मुलीच्या मुलाला) लिहिलेले आहे, "गड्या, तुझी मजा आहे. एक तर झोप काढायची किंवा रडून गोंधळ घालायचा. वास्तविक आम्हा मोठ्या माणसांना रडावेसे वाटावे असे अनेक प्रसंग येतात. पण करता काय? आम्हाला रडायची चोरी आहे". असे हे गमतीचे पत्र आहे.

भारतीय अभ्यासकांत डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्याशी मॅक्सम्यूलरचा पत्रव्यवहार होता. १८८६ साली व्हिएन्नाला झालेल्या जागतिक प्राच्यविद्यापरिषदेला डॉ. भांडारकर प्रतिनिधी म्हणून गेले होते. त्यावेळी ऑक्सफर्डमध्ये त्यांनी मॅक्सम्यूलरची गाठ घेतली होती. लोकमान्य टिळकांच्या राजकीय मतप्रणालीशी मॅक्सम्यूलर सहमत नव्हता. आर्यांच्या उगमस्थानावावतचे त्यांचे संशोधन आणि त्यांचा सखोल व्यासंग याचा प्रभाव मात्र त्याच्यावर पडला होता. तत्त्वतः टिळकांनी मांडलेला सिद्धान्त त्याला अमान्य होता. ऋग्वेदाच्या दुसऱ्या आवृत्तीची एक प्रत त्याने टिळकांना भेट म्हणून पाठविली होती. १८९८ साली टिळकांना राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली तेव्हा कारागृहात संदर्भग्रंथ पहाण्याची सवलत त्यांना मिळावी म्हणून त्यांच्या चाहत्यांनी केलेल्या अर्जावर मॅक्सम्यूलरची सही आहे.

स्वीडनमध्ये स्टॉकहोमला १८८९ साली जागतिक प्राच्य विद्या परिषद भरली असता समारोपाचे प्रसंगी भोजनातील मेनूकार्डवरील विविध खाद्य पदार्थांचे वर्णन विविध खाद्यापदार्थांचे वर्णन विविध पौर्वात्य भाषांतील तज्ज्ञांनी आपापल्या अभ्यासाच्या भाषांत लिहावे अशङ चूष संयोजकांनी काढली त्यात मॅक्सम्यूलरचे सामन (Samen Lax) या मत्स्यप्रकाराचे वर्णन वेदातील ऋचेसारखी भाषा वापरून लक्षमत्स्यसूक्त लिहून केले. हे सूक्त भाषेच्या दृष्टीने इतके मुळावरहुकूम जुळले होते की आर्य समाजाच्या 'आर्य गॅझेटने' मॅक्सम्यूलरवर वेदात नसलेले पदरचे सूक्त घुसडल्याचा आरोप केला.

जोधपूरमधील एका पंडिताने मॅक्सम्यूलरचे संस्कृतमध्ये श्लोकवद्ध चरित्र प्रसिद्ध केले.

त्याची प्रत त्याने मॅक्सम्यूलरला पाठविली . (१८९४) त्याला उत्तर पाठविताना मॅक्सम्यूलरने लिहिले , "हिन्दुस्थानमधील पंडितांनी माझे फार कोडकौतुक केले आहे . हिन्दुस्थानमधील एखादा कवी माझे चरित्र संस्कृतमध्ये लिहिल असे मला कधी स्वप्नातही वाटले नव्हते . कालिदासाने ज्या भाषेत रचना केली त्या भाषेत कोणी माझी काव्य लिहून स्तुती करावी हा मी माझा मोठा बहुमान समजतो ."

मॅक्सम्यूलरची अखेरची काही वर्षे कृतार्थ वानप्रस्थाश्रमात गेली असे म्हणावे लागेल . इंग्लंडमध्ये आणि जर्मनीत त्याच्याबद्दल पितृतुल्य आदरभावना होती , तर हिन्दुस्थानात त्याला ऋषितुल्य मान होता . १८९३ मध्ये लीपझिग विद्यापीठाने खास पदवीदान समारंभात पहिल्या डॉक्टरेटनंतर पन्नास वर्षांनी त्याला पुन्हा डॉक्टरेटची पदवी देऊन त्याचा सन्मान केला . इंग्लंडमध्ये नव्याने येऊ पहाणाऱ्या टेलिफोनचे प्रात्यक्षिक मॅक्सम्यूलरला दाखविण्यात आले . ग्रामोफोनच्या इंग्लंडमधील तबकडीसाठी मॅक्सम्यूलरच्या आवाजात ऋग्वेदातील पहिली ऋचा "अग्निमीळे पुरोहित" कौतुकाने निवडण्यात आली .

त्याच्या अखेरच्या आजारपणात त्याच्या प्रकृतीची स्वतः महाराणी व्हिक्टोरियाने आस्थेवाईकपणे चौकशी केली . हिन्दुस्थानात राष्ट्रसभेच्या अधिवेशनात त्याच्या प्रकृतीला आराम पडावा , म्हणून सदिच्छादर्शक ठराव करण्यात आला . मद्रासमधील काही चाहत्यांनी या ऋषितुल्य अभ्यासकासाठी पार्थसारथी मंदिरामध्ये खास पूजा अर्चा करविली . मॅक्सम्यूलरच्या मृत्यूच्या थोडेच दिवस आधी हिन्दुस्थानातून आलेला कोणी अगम्य योगीन्द्र नावाचा महात्मा आपल्या एका शिष्यासह त्याची भेट घेण्यासाठी ऑक्सफर्डला येऊन पोहोचला . ही भेट मोठी नाट्यमय होती . व्याधींनी जर्जर झालेला मोक्षमूलर भट आणि त्याच्याकडे एकटक पहाणारा धिप्पाड बांध्याचा हा योगाभ्यासक आपले दोन्ही हात मॅक्सम्यूलरच्या खांद्यावर टेकवून योग्याने निरोप घेतला . " मित्रा , आता मृत्यूला सामोरे जाण्याची घडी येऊन ठेपली आहे ."

२८ ऑक्टोबर १९०० या दिवशी मॅक्सम्यूलरचे निधन झाले . सर विल्यम जोन्स , हेन्री कोलब्रुक यांच्या परंपरेतला हा प्राच्यविद्यांचा शेवटचा अभ्यासक . त्याच्या निधनाने हिन्दुस्थानातील आणि युरोपमधील त्याच्या चाहत्यांना फार दुःख झाले . "हिन्दुस्थानशी जन्मजन्माचे नाते असणारा महान अभ्यासक" अशा शब्दांत लोकमान्य टिळकांनी मराठामधील लेखात मॅक्सम्यूलरचे वर्णन केले आहे .

मॅक्सम्यूलरच्या इच्छेनुसार त्याच्या समाधीवर "जशी ईश्वराची इच्छा" (Will Gott will) असा स्मृतिलेख बसविण्यात आला .

(द.श्री. बापट , १० सुनीता सोसायटी , १९/२ एरंडवणे , पुणे ४)

०००



अनुक्रमणिका






प्रा. रा. ग. जाधव

# अरुण कोलटकरांची कविताः स्वरूप व संदर्भ

अरुण कोलटकरांच्या कवितेत काही एक सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ आहे आणि त्या संदर्भांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न काही अभ्यासकांनी याआधीही केलेला आहे . अर्थात हे पूर्वकालीन प्रयत्न कोलटकरांच्या कवितेचे केवळ सामाजिक- सांस्कृतिक संदर्भ शोधण्यापुरतेच मर्यादित होते , असे मात्र नाही . मुख्यतः त्यांची कविता कविता म्हणून समजून घेण्यादेण्याच्या भूमिकेतून हे अभ्यास झालेले आहेत . त्यांतून कोलटकरांचे लौकिक जीवन , व्यवसाय , त्यांच्या संवेदनशीलतेचे स्वरूप , त्यांच्या निर्मितीचे भाषिक व वैचारिक गुणविशेष , पूर्वकालीन व त्यांच्या समकालीन काव्यपरंपरेशी संभवणारे नातेगोते यांसारख्या विषयसूत्रांचा परामर्श घेण्यात आलेला आहे . या विषयसूत्रांतूनच कोलटकरी काव्याचा सामाजिक सांस्कृतिक संदर्भ कधी प्रकटपणे तर कधी सूचकपणे व्यक्त झाल्याचे दिसते . कोलटकरांची कविता जास्तीत जास्त अंगांनी व यथार्थपणे समजून घेण्यासाठी , विशेषतः ती सामाजिक -सांस्कृतिक दृष्टीनेही समजून घेण्यासाठी ही समीक्षा निश्चितच उपयुक्त ठरते .

माझ्या वाचनात आलेल्या अशा काही समीक्षालेखनाचा निर्देश येथे करतो .

१) 'ऋचा '- अरुण कोलटकर विशेषांक , दि . २० .१२ .१९७७.

२) 'मराठी कविताः नवी वळणे '- प्रकाश देशपांडे  १९९४

३) समकालीन : नामदेव ढसाळ , अरुण कोलटकर
दिलीप चित्रे- रुची , एप्रिल १९८८

४) पुन्हा एकदा कविता- चंद्रकांत पाटील , १९८२

५) ॲन अँथॉलॉजी ऑफ मराठी पोएट्री ( १९४५-६५)
संपादक - दिलीप चित्रे , १९६७

६) टीकास्वयंवर - भालचंद्र नेमाडे , १९९०
( यातील 'अरुण कोलटकर - द्विभाषिक कविता हा लेख)

७) अरुण कोलटकरांची कविताः इंग्रजी आणि मराठी
संवाद जाने - मार्च १९८७

कोलटकरांच्या कवितेचे सामाजिक - सांस्कृतिक संदर्भ जाणून घेताना काही ढोबळ बाबी लक्षात घ्याव्या लागतातः एक म्हणजे मर्ढेकरप्रणीत व सामान्यपणे 'सत्यकथा ' पुरस्कृत अशी जी नवकाव्याची धारा स्थिरावत चालली होती , तिच्यापेक्षा वेगळे काहीतरी करण्याची वा साधण्याची प्रकट जाणीव कोलटकरांच्या कवितेमागे आहे . एकोणिसशे पन्नाशीच्या उत्तरार्धात व नंतर साठोत्तरी दशकात विशेष प्रयोगशील ठरलेल्या लघुनियतकालिकीय काव्यधारेचे कोलटकर एक प्रवर्तक होते . दुसरी बाब म्हणजे कोलटकरांचे सलग तपशीलवार चरित्र

उपलब्ध नाही , त्यामुळे त्यांच्या लौकिक व कलात्मक व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी होत गेली , हे कळण्यास व त्याचा संदर्भ त्यांच्या प्रत्यक्ष काव्यनिर्मितीशी कसा संभवतो हे शोधण्यास वाव नाही . तिसरी बाब म्हणजे आजवर त्यांच्या सुमारे सत्तरच्या आसपास कविता संग्रहरूपाने उपलब्ध आहेत . आणि त्या बहुतेक जवळजवळ दोन तपांच्या कालावधीत ( १९५०-७८) लिहिलेल्या कविता आहेत . त्यामुळे साधारणपणे हा काव्यलेखनकालच त्यांच्या सामाजिक-सांस्कृतिक संदर्भासाठी गृहीत धरावा लागतो . चौथी गोष्ट म्हणजे कोलटकरांनी स्वतःच्या कवितेबद्दल व इतरांच्या कवितेबद्दल फारसे काही लेखन केलेले नाही . यास ‘ऋचा’ विशेषांकातील (डिसेंबर १९७७) मुलाखत हा एकमेव अपवाद होय . चित्रे-नेमाडे यांच्या तुलनेने ही बाब ठळकपणे लक्षात येते . त्यामुळे त्यांचा कालखंड , त्यांचा व्यवसाय व महानगरीय वास्तव्य एवढ्याच मुख्य साधनांनी कोलटकरी काव्यांच्या सामाजिक- सांस्कृतिक संदर्भाचा मागोवा घ्यावा लागतो .

सत्तर-ऐंशी कविता व त्यांचा सुमारे पंचवीस वर्षांचा लेखनकाळ यांच्या बळावर , खरे तर , कोणत्याही कवीच्या निर्मितीचे सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ निर्णायकपणे सांगणे कठीणच आहे . विशेषतः वेळोवेळी लिहिल्या जाणाऱ्या स्फुट काव्यातून अशी अंतःसूत्रे निर्विवादपणे ओळखता येतील , अशी हमी देता येत नाही . तथापि कवितेला सामाजिक- सांस्कृतिक संदर्भ जन्मतःच लाभलेला असतो . अशा जन्मजात स्वरूपाच्या सामाजिक-सांस्कृतिक संदर्भांचा उपयोग दोन प्रकारे तरी केल्याचे दिसून येते . एक म्हणजे सहजपणे भावणारी , समजणारी कविता ही अधिक अर्थपूर्णतेने समजून घेण्यासाठी अशा संदर्भाचा उपयोग होतो . मर्ढेकरांची ‘ पिपात मेले ओल्या उंदीर ’ यांसारखी कविता आताही समजून घेताना या प्रकारच्या संदर्भवादी दृष्टिकोन आपण स्वीकारतो . तथापि काही कविता सहजपणे भावल्या , तरी तितक्या सहजपणे समजत नाहीत , काव्यास्वादाच्या रूढ सवयी या संदर्भात फारशा कामी येत नाहीत . त्यांतून वेगळ्याच प्रकारची व अनोळखी संवेदनशीलता व्यक्त झाल्याचे दिसून येते . अशा प्रसंगी सामाजिक-सांस्कृतिक अंतःसूत्रांची दिवटी घेऊन अशा कठीण कवितेकडे जाणारी वाट शोधण्याची गरज निर्माण होते . आणि तरी देखील त्या कठीण कवितेच्या गावी आपण निश्चितपणे पोहोचू व सुस्थितीतही पोहोचू याची हमी देता येत नाही . अरुण कोलटकरांच्या बहुसंख्य कविता या प्रकारच्या आहेत . ही वेगळी व वेगळ्या संवेदनशीलतेची निदर्शक कविता आहे . मुळात तिचे कवितारूप समजून घेण्यासाठीच सामाजिक- सांस्कृतिक संदर्भाची आवश्यक तेवढी मदत घेण्याची गरज निर्माण करणारी ही पहिलीच कविता आहे . नव्या प्रकारच्या कवितेचा आस्वाद यथार्थ कारणांसाठी घेण्यासही सामाजिक-सांस्कृतिक संदर्भाची पूर्व अट असते , असाच याचा अर्थ होतो .

कोलटकरांच्या कवितेतील सामाजिक पर्यावरण महानगरीय , मध्यमवर्गीय , बुद्धिजीवी कक्षेतील आहे , असे सामान्यपणे दिसून येते . ‘ बेहद्द नाममात्र घोडा ’ ही त्यांची प्रसिद्ध कविता पहाटेच्या शांत वातावरणात पण शहरातच ऐकू आलेल्या घोड्यांच्या टापांमुळे सुचली असे त्यांचे स्वतःचेच म्हणणे आहे . शहरातील कडक ॲस्फाल्टच्या रस्त्यांवर पहाटसमयी घोड्यांच्या टापा कशी खडाखड वाजत असतील , याची कल्पना शहरांबाहेरच घोडे पाळणाऱ्या माणसांना व खुद्द घोड्यांनाही येणार नाही आणि महालक्ष्मीच्या रेसकोर्सवर तर घोड्यांच्या टापा ऐकूच

येत नाहीत , दुसराच गोंगाट ऐकू येतो . महानगरांतील सर्वसामान्य माणसांच्या खोल्या , त्यातील फर्निचर , इराण्यांची हॉटेले . क्वचित बंगले , फुलझाडे व कुंड्या , विजेचे दिवे , सिगारेटी व तंबाखू , बिछाने , घरातील तसविरी , नारळाची झाडे , पावसाळ्यातील बेडूक , कुत्रा-मांजर यांसारखे पाळीव प्राणी , चहा , वृद्ध माणसे , चित्रे व शिल्पे , मेणवत्त्या , परप्रांतीय लोक व त्यांची भाषा , इमारती व गच्च्या , चवथरा , शहरांतील दाहक उष्मा , हॉस्पिटले , घरात रचून ठेवलेली वृत्तपत्रांची रद्दी , गणपती , पाव , निऑनच्या साइन्स , रुमाल यांसारख्या दृश्य विषयांना कोलटकरी कवितेत मुख्य स्थान लाभले आहे . हे परिचित , मूर्त , गोचर घटक कोलटकरांची कविता इतक्या अपूर्व व अनपेक्षित प्रतिमारूपांनी साकार करते , की हे परिचित जग एकदम अनोळखी झाल्यासारखे वाटते . या ओळखीच्या महानगरीय सामाजिक-सांस्कृतिक पर्यावरणाचे एक अपरिचित रूपांतर त्यांची कविता घडवून आणते . हे का व कसे घडते , असा प्रश्न वाचकाला पडतो . या प्रश्नाच्या उत्तराचा मागोवा घेण्यासाठी पुन्हा सामाजिक-सांस्कृतिक अंतःसूत्रांचाच वेगवेगळ्या रीतींनी आधार घेणे भाग पडते . महानगरीय पर्यावरणातील विशिष्ट कक्षेतील परिचित गोचर रूपे कोलटकरांनी अपूर्व वाटणाऱ्या भावनानिष्ठ समतानतांशी जुळवून टाकतात . ह्या नवीन समतानता किंवा समीकरणे भाषिक आणि भावनात्मक अशा दोन्ही प्रकारची असतात .

शब्द व अर्थ यांचे रूढ समीकरण कोलटकर अनेकदा बदलून टाकतात . शब्द जुळवून अर्थ व्यक्त करण्याचे रूढ व्याकरणही ते बदलतात . (चिखल ठरलो भिक्षापात्र '- पृष्ठ ७३-७५ - ही कविता या दृष्टीने उल्लेखनीय आहे ) . त्यांच्या काही कविता एकाच वेळी विसंगती , विडंबन , विकृती यांचे दर्शन घडवून हसवतात , पण पुरतेपणी हसूही देत नाहीत व मनाला डंख करून जातात . शोकात्मिका आणि सुखात्मिका यांच्या वळणांना एखाद्या ' महानिर्वाण ' सारख्या नाटकात एक संमिश्र रूप प्राप्त होते व या रूपात शोकदायकता सतत आवरती घेतली जाते व सुखदायकताही आवरून घेतली जाते . या दोहोंच्या मध्ये कुठेतरी एका रिक्त शून्य अवस्थेत आपणास सतत ढकलले जात आहे , असा अनुभव येत राहतो . या प्रकारच्या कृष्ण सुखात्मिकेचा (डार्क कॉमेडी) प्रत्यय कोलटकरांच्या काही कविता देतात . वेदना व विनोदन , शब्द आणि अर्थ यांचे रूढ संवेदन वदलून टाकणाऱ्या नव्या भावनानिष्ठ समतानता कोलटकरांच्या काही कवितांतून जाणवतात . पण त्यांचाही वेध घेण्यासाठी सामाजिक-सांस्कृतिक अंतःसूत्रांची मदत घेणे आवश्यक ठरते .

वेगवेगळ्या समीक्षकांनी कोलटकरांच्या कवितेचा सामाजिक सांस्कृतिक संदर्भ ज्या वेगवेगळ्या दिशांनी शोधण्याचा प्रयत्न केला , त्याची ही स्थूल मीमांसा झाली .

खुद्द कोलटकरांना व त्यांच्या कवितेला तो संदर्भ कशा प्रकारे अभिप्रेत आहे व तो अभिप्राय या दोहोंनी कशी रीतीने सूचित केला आहे , त्याचा मागोवा घेणे योग्य ठरेल .

कोलटकरांची तीन विधाने या संदर्भात उद्धृत करण्यासारखी आहेत . ती अशी :

१) " चित्रकला मी पोटापुरती राबवतो . माझं खरं काम कवितेबरोबर आहे असं मी समजतो ."

२) "प्रत्येक कविता लिहिताना एक नवी व्याख्या करण्याचा (मी) प्रयत्न करतो "

३) "मध्या माझी कविता चाललेली आहे ती वाट सर्वसामान्य वाचकाच्या घरावरून

जाते पण ती तिथं थांबणार नाही . पुढं जाणारा व कविताबिविता वाचायच्या भानगडीत सहसा न पडणाऱ्या रसिकाच्या शोधात . '' (ऋचा , पृष्ठ ९५)

वरील विधानांचे स्पष्टीकरण माझ्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करता येईल: एक सर्जनशील व्यक्ती म्हणून किंवा केवळ एक जगणारा माणूस म्हणूनही कोल्हटकरांचे कवितेशी असलेले नाते कामाच्या पातळीवरील आहे . विशिष्ट कार्याचे उद्दिष्ट ठेवून ते उपलब्ध शक्तींनिशी व साधनांनी गाठण्याची प्रक्रिया म्हणजे काम . कामाचे उद्दिष्ट कामच , त्याला कामाच्या अलीकडे पलीकडे कसलेच साध्य नसते . उद्दिष्ट , प्रक्रिया व निर्मिती ही सर्व एकाच कामाची रूपे कोलटकर कवितेतील एक काम म्हणून किंवा कामाचे उद्दिष्ट , प्रक्रिया साधन वा उत्पादन म्हणून पाहतात . याचा अर्थ ते कामाच्या किंवा कवितेच्या बाहेरील कोणत्याच संदर्भांना निर्मितीच्या पातळीवर सहभागी होऊ देत नाहीत किंवा त्याचा जाणीवपूर्वक पुरस्कार करीत नाहीत . त्यांची कविता त्यांच्या दृष्टीने कविताबाह्य संदर्भाच्या बाबतीत निस्संदर्भ असते . कविता व काम , कवी व माणूस यांत फरक नाही . काम स्वयंपूर्ण व स्वयंसापेक्ष असते . म्हणून कविताही स्वयंपूर्ण व स्वयंसापेक्ष असते .

दुसरे म्हणजे , आपली प्रत्येक कविता म्हणजे कवितेची नवी व्याख्या करण्याचा प्रयत्न असतो , असे कोलटकरांचे म्हणणे आहे . याचा अर्थ त्यांच्या एका कवितेचा दुसऱ्या कवितेशी असणारा संबंध शून्यवत असतो . म्हणजे व्याख्येच्या रूपात काव्यरूपाचे जे अंतर्बाह्य स्वरूप गर्भित असते , ते प्रत्येक कवितेच्या बाबतीत वेगवेगळे असल्याने त्यांच्या कवितांतून कोणतेच परस्परसापेक्ष नाते अस्तित्वात नसते . त्यांची प्रत्येक कविता स्वयंसापेक्ष असते , अनन्यसापेक्ष ठरते . कोणत्याही विशिष्ट प्रकारच्या सामान्य व विशेषांची मर्यादा अखून दिलेली असते . म्हणून कोलटकरांची प्रत्येक कविता स्वत:पुरतेच अर्थपूर्ण ठरणारे सामान्य व विशेष गुणधर्म धारण करते . याचा अर्थ असाही असतो , की त्यांच्या एकूण काव्यनिर्मितीचे बाबतीत एखाद्या समान अंत:सूत्राचा संदर्भ त्यांच्या दृष्टीने तरी संभवत नाही . ग्राफिक्स स्टुडिओमध्ये निरनिराळे जॉब निरनिराळ्या वेळी पूर्ण करून तयार ठेवले जातात , तरी त्यांच्या संग्रहातील कविता ही वेगवेगळ्या वेळची पूर्ण केलेली कामे असतात .

आपल्या कवितांची वाट सर्वसामान्य वाचकाच्या घरावरून जाते , पण ती वाट आणि कविताही त्या घराजवळ थांबणार नाही , असे कोलटकरांचे सांगणे आहे . कवी आणि रसिक वा वाचक या प्रकारचा वर्गभेद निदान जगण्याच्या वाटेवर तरी कोलटकर करीत नाहीत . माणूस व कलावंत यांच्यातील भ्रामक भेदाचा , कलावंत म्हणून दावा करण्यात येणाऱ्या विशेषाधिकारांचा कोलटकर धिक्कार करतात , हे यातून सूचित होते . सामान्य माणसाच्या वस्तीमधील व वहिवाटीची वाट हीच आपल्या कवितेचीही वाट आहे , ती त्या वस्तीला टाळणारी वा कवटाळणारीही नाही . कवी , माणूस , वाचक , रसिक , कविता व रसिकता या वर्णव्यवस्थेला जगण्याच्या वाटेवर काहीच समर्थन नाही . सर्व जण अस्तित्वाच्या पातळीवर एकाच वस्तीचे व वाटेचे वाटेकरी ठरतात . पण अस्तित्वाची ही वाटचाल कोणत्या दिशेने चालू आहे , याचे स्वच्छ भान कोलटकरांना आहे . त्यांच्या कवितेचे मंझिल वाचक-वाचन निरपेक्ष रसिकता हे आहे . जी रसिकता वाचणारी नाही , जिला वाचनाची तमा नाही आणि जिला वाचन निषिद्ध आहे अशी ती अवाङ्मयीन रसिकता आहे . शब्दार्थांच्या वाङ्मयीनतेच्या

सर्वसामान्यांच्या वाटेने प्रस्थान ठेवलेली कोलटकरांची कविता ही अखेर वाच्य-वाचक-वाचन या त्रिविध तापांच्या मायाजालांतून बाहेर पडून अगोचर काव्यप्रचीती घेऊ शकणाऱ्या रसिकतेसाठी एका शब्दात बंधात परिणत होणार आहे .

हा सगळा विचार गूढधूसर आहे , हे उघडच आहे . पण त्यातून कोलटकरांच्या कविवृत्तीचे प्रधान वळण सूचित होते , हेही लक्षात घेण्यासारखे आहे . कवित्वानेच कवितेविरुद्ध केलेल हे बंड ठरते . दिलीप चित्रे म्हणतात त्याप्रमाणे हे बंड अकादमिक काव्यकल्पनांविरुद्धचे बंड आहेच , पण ते तेवढ्याच अर्थाचे नसावे . कोलटकरांना अगदी सामान्य वाटेवर कवी व कविता आणावयाची आहेत , असे वाटते . एकदा हे घडले की मग कवितेला कवीसकट वेगळे असामान्यपण उरणारच नाही . ही दोघे त्या सामान्य जिण्यात मिळूनमिसळून जातील . मग कविता , कवितालेखन , रसिक यांनाही स्वतंत्र अस्तित्व उरणार नाही . जीवनातील सर्वसामान्य घटक म्हणूनच त्या चालू राहतील . कवितेचे वेगळे कलात्मक व सांस्कृतिक मूल्य जपणारी एकूणच पूर्वपरंपरा कोलटकर त्याज्य ठरवतात . एका दृष्टीने कवी , कविता यांना हस्तिदंती मनोऱ्यात , मंगल मंदिरात , ऋषींच्या यज्ञवेदीत किंवा असामान्य अभिजन वर्तुळात विशेषाधिकारपूर्वक प्रतिष्ठित करणाऱ्या एकूणच पूर्वपरंपरा कोलटकर नाकारतात . हे त्यांच्या कवितेचे नसले तरी काव्यविचारांचे वेगळेपण ठरते . कविता वाचण्याबिचण्याच्या भानगडीत न पडणाऱ्या रसिकाला कोलटकर कोणत्या प्रकारची कविता देणार , हा प्रश्न आता तितकासा गूढ वाटणार नाही . कारण कुणी कुणाला देण्याची बाब म्हणून कविता उरणारच नाही . ती खरे तर कुणाही जवळ असते . . . . !

भाषा ही एक प्रकारची हालचाल असते , हावभाव असते किंवा आविर्भाव असतो , असा विचार आर पी ब्लॅकमर या अमेरिकन समीक्षकाने आपल्या 'लॅंग्वेज ॲज जेश्चर) लेखसंग्रहातील एका लेखात विशद केलेला आहे . कवितेतील शब्दांतून आशयाच्या हावभावांचे , आविर्भावांचे संवेदन कसे प्रतीत होते , याची कल्पना कोलटकरांच्या काही कवितांतून येते , असे मला वाटते .

"पायाळू इमारतीनं मला विचारलं
"आमचा पाय का धरला ?"
मी म्हणालो , "आमच्या अंगणात का आला ?"
म्हणते कशी , "तुमचं अंगण केवढं ?"
" अगं टवळे , माहित आहे मला ते सगळं . " (पृष्ठ ६)

या अवतरणातील 'म्हणते कशी' ही शब्दयोजना आणि 'अगं टवळे' हा उत्स्फूर्तपणे उमटलेला संबोधनात्मक आविष्कार हालचालीचा , आविर्भावाचा सुखद नाट्यात्म प्रत्यय देऊन जातो .

उसके रहाटके उपर बैठ गया ?
बिल्कूल . और गिर गया
पीयेला अंद (पृष्ठ ५९)

यांतील बैठ गया , बिलकूल , और गिर गया , पीयेला व अंदर या शब्दांचा जो वाक्यरचनाक्रम आहे , त्यातील थांबे किंवा विराम आणि हे शब्द यांतून एका कृतीचे सर्व

हावभावनाट्य हटकून जाणवते . बिलकूल , पीयेला व अंदर हे शब्द त्यांच्या आविर्भावासकट मनश्चक्षूंसमोर नाचून आपले लक्ष स्वतःकडे खिळवून ठेवतात . ' बिलकूल ' शब्द वाचल्यानंतर मी दहा मिनिटे डोळे मिटूनच बसलो होतो व त्या शब्दाचे खेळ बघत होतो .

' माझ्या पर्शियन पोषाकावर
काढशीलच काढशीलच नक्षी ,
एकदोन झाडंही असू देत बाजूला ,
नसला तर नसू दे पक्षी . ' (पृष्ठ ४७)

या अवतरणातील ' काढशील काढशील नक्षी ' या ओळीतून भाषा अभिनय कशी करू शकते हे जाणवते . ' काढशील काढशील ' ही खास अभिनयसंपन्न द्विरुक्ती । ही द्विरुक्ती एक भावाभिनय प्रतीत करून देते , तो अभिनीत भाव खरे तर शब्दांतून सांगणेही मला कठीण वाटते . ' नसला तर नसू दे ' पक्षी या वाक्यरचनेने ' काढशीलच काढशील ' यातील उत्कट आविर्भावाला कसा छान तोल दिला आहे !

' पिंपळाची पानं चघळत नाशकापर्यंत आलो
तिथं तुकाराम विकला , अन वर खिमापाव खाल्ला . ' (पृष्ठ ७६)

यातील ' अन वर ' या अव्ययांनी तुकारामाला विकणे व खिमापाव खाणे या दोन क्रियांना एका वेधक क्रियाशील आविर्भावाने जोडले आहे , असे वाटते . ' भाकर खाल्ली अन् वर पोटभर पाणी प्यालो ' या रूढ वाक्यसरणीत एक हालचाल सूचित होतेच . तुकोबांना विकले व खिमापाव खाल्ला , या क्रियांतील गर्भित हालचालीस ' अन् वर ' या शब्दांनी वेगळाच ढंग प्राप्त होतो असे जाणवते .

कोलटकरांच्या कवितेतील अनेक स्थळे वरीलप्रमाणे भाषेच्या अविभाज्य शक्तीचा प्रत्यय देतात . त्यांची काव्यभाषा ही एक प्रयोगीय (परफॉर्मिंग) कला ठरते . ती भाषा अभिनयकुशल वाटते .

' चर्र जळालेला कावळा ' या कवितेतील चर्र हे क्रियाविशेषण चर्र जळण्याची क्रिया व तिचे संवेदन एकाचवेळी प्रतीत करून देते .वस्तू काय किंवा अनुभव काय ,कोलटकर त्याच्याकडे मूर्त , गोचर ,सचेतन स्वरूपातच पाहतात किंवा अशा स्वरूपानच त्या त्यांना दिसतात . या दृष्टीतच हावभाव , हालचाल , आविर्भाव यांचे संवेदन अटळपणे प्रभावी ठरते .ॲनिमेशन याच नावाची त्यांची कविता (पृष्ठ १२७) पहा :

ट्युबमधनं टूथपेस्टचा ओंडका बाहेर येतो
स्क्वॅशच्या बाटल्या फेर धरतात
विमचा डबा टुणकण् उडी मारतो
रॅपर उमलून ब्लेड बाहेर पडतं
किंवा कपड्यांच्या आपोआप घड्या होतात
तेव्हा मी गपकन् डोळे मिटून घेतो .

जाहिरातींत हे चालते बोलते नाट्यमय प्रयोग आपणही पाहतोच पण त्यांचे गोचर निवेदन फारशा आस्थेने व कुतूहलाने आपण करून घेत नाही . कोलटकर अशा गोष्टींकडे पाहून गपकन् डोळे मिटून घेतात हे खरे , पण ते मिटण्यापूर्वी मात्र त्या गोष्टी त्यांच्या नाट्यपूर्ण आविर्भावासह

त्यांनी मार्मिकपणे टिपलेल्या असतात . अनुभवांकडे , त्यातील भावना , कल्पना , विचार यांच्याकडेही ते अशाच दृष्टीने बघतात . महानगरातील एक सामान्य खोली , स्टूल , रेडिओ (१९५० ते ८० या काळात आजच्याप्रमाणे प्रत्येक खोलीत टी.व्ही . नसे . मध्यमवर्गीय खोलीतही रेडिओच असे) , बूट , हँगर , नळ , धुण्याचे चिमटे हे सर्व त्या खोलीच्या सजीव सृष्टीचे घटक . ही खोलीची इको-सिस्टिम , म्हणजे परिसरविज्ञानाच्या भाषेतील सजीवांचा अधिवास . या सजीवांच्या अधिवासाचे चित्रण 'चट्टामट्टा' या प्रतिमेतून कोलटकर करतात . आता 'चट्टामट्टा' हा शब्द जी हालचाल सूचित करतो , ती हालचाल कवितेतील सजीवांचे जग करीत असते . ही कविता भाषा ही हालचाल वा आविर्भाव कशी ठरते , याची प्रतीती देते . (चट्टामट्टा - पृष्ठ १२४) काव्यविषय होणारा त्यांचा प्रत्येक अनुभव हा एका 'ॲनिमेटेड' सचेतन - नाट्यरूपातच त्यांनी पाहिलेला असतो . कोलटकरांइतकी मूर्ताची - कॉंक्रिटची - कविता साठोत्तरी कालखंडात नाहीच आणि हे मूर्ताचे संवेदन व आविष्करण साविर्भाव आहे हे महत्त्वाचे .

दुसरे म्हणजे रूढ बोलीभाषा हे कोलटकरी आविर्भावसंपन्न शैलीचे एक कारण असावे . कवितेच्या भाषेचा वेगळेपणा हा पुस्तकी , सांकेतिक , संस्कृतप्रचुर शब्दकळेने निर्माण होत नाही , तर तो बोलीभाषेच्याच अंतःशक्तीचे प्रकटीकरण करूनही होतो , हे साठोत्तरी कवितेने दाखवून दिले आहे . नारायण सुर्वे , नामदेव ढसाळ , ना . धों . महानोर , दिलीप चित्रे , अरुण कोलटकर इत्यादी अग्रेसर कवींनी आपल्या भाषिक धाटणीला बोलीभाषेचे प्रभावी सामर्थ्य प्राप्त करून दिले आहे . आणि बोलीभाषा ही प्रत्यक्षाची , साक्षात व जिवंत स्वरूपाची असल्याने ती निसर्गतःच आविर्भावसंपन्न असते . तिच्या या गुणांचा विशेष प्रत्यय कोलटकरांच्या कवितांतून येतो . त्यांच्या कवितांत वरेचदा हिंदीचा वापर दिसतो , इंग्रजी शब्द येतात , अनवट मराठी शब्द येतात . प्रमाण मराठी भाषेच्या दृष्टीने अशुद्ध ठरतील , अशी कितीतरी शब्दस्थळे , वाक्प्रचार , वाक्यरचना कोलटकरी काव्यात दिसून येतात .

> 'डोक्यावरनं रुमाल बांधून घे , काळा रुमाल
> त्यातला त्यात बरा . . .
> नाहीतर इलॅस्टिकची पट्टी शिऊन घे मागनं
> त्यात कायाम बायको शिऊन दील की तुला
> अरे दोन मिंटांचं काम . .' (काळा रुमाल , पृष्ठ १२८)

कवितेतून असे कुणाशी तरी बोलण्याचे , सांगण्याचे तंत्र कोलटकर अनेकदा वापरतात व मग ते अस्सल बोलीभाषेतच बोलू लागतात .

> 'जांघेत गोळा झालेलं
> धोतर सारखं करायला
> थबकलो दोन मैल स्टेशन
> पुढं गाव तीन मैल मागं . . . . ( पृष्ठ ७९)

अशा वर्णनपर आविष्कारातही वाक्यरचना , विरामचिन्हे यांची व्याकरणीय दक्षता ते घेत नाहीत , कारण बोलीभाषा तशी दक्षता घेत नसते .

यावरून कोलटकरी आविर्भावसंपन्न भाषाशैलीची सूत्रे लक्षात येतात . मूर्तीचे नाट्यात्म

संवेदन , बोलीभाषेचा स्वीकार आणि संवादशीलता यामुळे कोलटकरांची कविता हालचालींची कविता ठरते , असे म्हणता येईल .

कोलटकरांच्या कवितांचा लेखनकाल स्थूल मानाने १९५० ते १९७७ असा आहे . त्यांचा एकमेव काव्यसंग्रह १९७७ मध्ये प्रकाशित झाला व त्याच्या एक वर्ष आधी म्हणजे १९७६ मध्ये ' जेजुरी ' हे त्यांचे इंग्रजी काव्य प्रसिद्ध झाले . साठोत्तरी मराठी , कवितेत एक वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण सर्जनशील संवेदनशीलता प्रकट करून कोलटकरी कवितेने आपल्या जाणिवांना श्रीमंत केले आहे . तथापि साठोत्तरी कालखंड हा एकमुखी नवप्रवर्तनाचा नसून पाचामुखी नवप्रवर्तनाचा कालखंड आहे . त्याची जडणघडण नारायण सुर्वे , दिलीप चित्रे , अरुण कोलटकर , नामदेव ढसाळ , ग्रेस या श्रेष्ठ पंचकवींनी केलेली आहे . पश्चिमी आधुनिकतावादी (मॉडर्निस्ट) संस्कारांतून मराठी कवितेची देशीय घडण करून तिचे एक परिणत स्वरूप साकार करण्याचे महत्त्वाचे कार्य चित्रे - कोलटकरांनी पार पाडले . सुर्वे , ढसाळ व ग्रेस यांच्या निर्मितीने खास मराठी परंपरेतून व पर्यावरणातून काव्यात अभिनव प्रवर्तन घडवून आणले . मात्र १९८० नंतरच्या कालखंडात नवे सामाजिक सांस्कृतिक तसेच कलावाङ्मयीन संदर्भ रूजून वाढीस लागले आहेत याचा एक अर्थ वरील पंचकवींची साठोत्तरी कविता ही १९६० ते १९८० या वीस वर्षांच्या संदर्भातच लक्षात घ्यावी लागते . या वीस वर्षांच्या कालखंडाशी या पंचकवींचा जेवढा निकटचा व अर्थपूर्ण संबंध आहे , तेवढा निकटचा व अर्थपूर्ण संबंध १९८० नंतरच्या कालखंडाशी नसावा . या दोन दशकांचे चैतन्यतत्त्व व अंतःस्वर या कवींच्या काव्यातून प्रभावीपणे जाणवतात . कोलटकरांची कविता , तिचे स्वरूप व तिचा सामाजिक - सांस्कृतिक संदर्भ हे सर्व त्यांच्या मुख्य कालखंडाचे म्हणजे १९६० ते ८० या कालखंडाचे भान ठेवूनच लक्षात घेतले पाहिजे .

कोलटकरी काव्याचा सामाजिक -सांस्कृतिक संदर्भ पूर्वकालीन अभ्यासकांनी स्पष्ट केलेला आहे . या बाबतीत माझा विचार थोडक्यात मांडतो .

कोलटकरांच्या सर्जनशील व्यक्तिमत्त्वात एक रीतिमानव लपलेला असावा , असे मला वाटते . त्यांचा ग्राफिक कलेचा व्यवसाय , त्यातील त्यांची प्रातिभिक गुणवत्ता , तीमधून सतत आत्मदक्ष व विकसनशील होत जाणारी मूर्ताची , दृश्यात्मकतेची , इंद्रियगोचराची आणि त्याच्या स्थिरतेची व गतिमानतेची डोळस संवेदनशीलता , त्यांचा पश्चिमी व अत्याधुनिक कलासाहित्यक्षेत्राशी असणारा आवडीचा व घनिष्ठ संबंध व त्यांचे महानगरातील वास्तव या सर्वांचा परिणाम म्हणून , किंवा या सर्वांना परिणामक्षम करणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे म्हणून , कोलटकरातील रीतिमानव निर्माण झाला असावा , असे वाटते .

१९६० ते १९९० या कालखंडातील कोणत्याही विचारप्रणालींचा प्रभाव त्यांच्या कवितेवर झाल्याचे जाणवत नाही . एखाद्या ठळक विचाराने प्रसंगपरत्वे त्यांची कविता प्रेरित होते हे खरे , अथवा अस्तित्ववादी , व्यस्ततावादी , अवमानवीकरणात्मक , मध्यमवर्गीय वांझपणाची निदर्शक , तुच्छतावादी , उपरोधिक , विडंबनात्मक इत्यादी स्वरूपाची प्रस्फुरणे व संवेदने त्यांच्या कवितांतून जाणवतात . हेही खरे ! पण विचार , विचारप्रणाली किंवा वैचारिक भूमिका यांपैकी कोणातही कोलटकरांची गोवणूक ही त्यांच्या समग्र व्यक्तिमत्त्वाची गोवणूक आहे , असे वाटत नाही . त्यांची गोवणूक गोचराच्या , प्रत्यक्षाच्या रीतिलाघवात असते .

कोलटकर या सर्व आधुनिक जाणिवांत गुंततात , पण त्या गुंतीचा गोफ विणण्याचे टाळतात . याा अर्थ आपल्या कालखंडातील आपल्यासारख्या व्यक्तीचे व गोचर सृष्टीचे कालसंदर्भाशी व संस्कृतीसंदर्भाशी अटळ असणारे नाते ते झिडकारत नाहीत , त्या नात्याशी सन्मुख होतात , त्याला सामोरे जातात . १९६० ते १९८० या कालखंडात कोलटकरांसारख्या संदर्भभान असणाऱ्या व्यक्ती होत्याच . अशा व्यक्ती जेवढ्या अर्थाने कालाच्या प्रतिनिधी ठरतात , तेवढ्या अर्थाने कोलटकर हे देखील आपल्या काळाचे प्रतिनिधी ठरतात . पण एवढेच . एक कवी म्हणून ही काळाशी असणारी अनिवार्य गोवणूक कोलटकर एक विशिष्ट अंतरापलीकडे आपल्या अंतःस्थात शिरू देत नाहीत . एक प्रकारच्या तटस्थपणाने , अलिप्तपणाने ते कालभानाला व सांस्कृनिक भानाला साद व प्रतिसाद देत राहतात . ' कोलटकरांची कविता बौद्धिक असूनही विचारघन नाही ' असा एक मार्मिक अभिप्राय प्रा . स . ह . देशपांडे यांनी ' जेजुरी ' कवितेवरील परीक्षणात व्यक्त केला आहे . (ऋचा पृष्ठ ८६) विचारांची घनता म्हणजे काय हे स्पष्ट नसले , तरी विचारांचा मागोवा , त्यांचे संश्लेषण , विश्लेषण , वर्गीकरण , सुसूत्रीकरण , वैचारिक आकलनाचा कल , वैचारिक निष्कर्षांची आवड , विचारप्रणालीय ग्रहण व प्रकटन यांसारख्या बाबी कोलटकरांच्या मराठी कवितेतही प्रधान व प्रभावी ठरत नाहीत . ही बाब खरे तर काहींशी दुर्मिळ ठरणारी आहे व म्हणूनच बहुदा दुसरे कोलटकर आजवर होऊ शकले नाहीत .

प्रति-नायकवादी (अँटी - हिरॉइक), प्रति - आकादमिक (अँटी - ॲकॅडमिक), अस्तित्ववादी , अतिवास्तववादी , यांसारख्या लेबलांनी कोलटकरांची कविता अंशतः समजून देता– घेता येईलही , पण ती पूर्णपणे समजल्याचे समाधान मिळणे कठीण आहे . अनेकदा ती कविता ' अभिव्यक्तिवादी ' (पश्चिमी एक्सप्रेशनिझम) आहे . असे वाटते आणि एका विशिष्ट अर्थाने ती आकारवादी (फॉरमॅलिस्ट) आहे , असेही वाटते मात्र शब्द , वाक्यप्रचार , व्याकरण , प्रतिमा , रचना व आशय यांच्या आकारासंबंधीच्या कोलटकरांच्या कल्पना रूढ कल्पनांपेक्षा वेगळ्या आहेत . रूढ आकृतिवादात अभिप्रेत असलेले कवितेच्या आशय - अभिव्यक्तीचे स्वरूप अर्थातच कोलटकरांना अभिप्रेत नाही . पण वेगळ्या अर्थाने का होईना , कोलटकरांची कविता ही आशयवादी नसून आकृतिवादी आहे , असे मला वाटते . कोलटकरांचा आकृतिवाद वेगळा आहे हे दाखविण्यासाठीच त्याला रीतिवाद म्हणावे , कारण त्यांचा संबंध साठोत्तरी काळात जागृत झालेल्या व संपर्कमाध्यमांनी प्रभावित होत राहणाऱ्या एक प्रकारच्या सर्जनशील संवेदनशीलतेशी आहे , असे मला वाटते

पण याचा अर्थ कोलटकरांची सगळीच कविता रीतिलाघव संवेदनशीलतेची निदर्शक टरते , असा मुळीच नाही . त्यांच्या काव्याचे नावीन्य व वेगळेपण हे त्या संवेदनशीलतेचे द्योतक आहे . एवढे मात्र खरे ! कोलटकरांच्या अनेक कविता वैशिष्ट्यपूर्ण आहेत . ' वेहद्द नाममात्र घोडा (पृष्ठ ८-९) , चरित्र (पृष्ठे ८१-८३) , मुंबईनं भिकेस लावलं (पृष्ठे ७६-८०) मेणवर्त्ती (एकूण ३ कविता , पृष्ठे ५०-५५ , श्रीज्ञानेश्वर समाधिवर्णन (पृष्ठ ४९) इराणी (पृष्ठ ४०-४१) , आडगावच्या हॉटेलातील (पृष्ठ ३३) यासारख्या कविता आशय , अभिव्यक्ती , विषय , संवेदन या बाबतीत अगदी वेगळ्या आहेत . या वेगळेपणाचा संबंध एक भाषिक धाटणी सोडली , तर रीतिप्रवण संवेदनशीलतेशी नाही , हे उघड आहे .

महानगरीय वास्तवात व्यक्ती आपल्या संवेदनशक्तीची स्वायत्तता व विशिष्टता उत्तरोत्तर

हरवत चालली आहे . दृक-श्राव्य माध्यमांनी व त्यांच्या तंत्रकुशल आविष्कारांनी आपले दृष्टिगोचर-कर्णगोचर जगच नव्या रीतीने प्रतीत होऊ लागले आहे . ' ॲनिमेशन ' या कवितेत या जगाची चुणूक कोलटकरांनी दाखविली आहे . कोलटकरांच्या काव्यात माणसाचे अमानवीकरण होते व वस्तूंचे , प्राण्यांचे मानवीकरण घडून येते , याचे कारण महानगरातील दृष्टिगोचर व कर्णगोचर वास्तव तशा प्रकारची नवी रीत सतत दाखवत असते . वस्तू , वास्तू , निसर्ग व पशुपक्षी यांचे रूढ नाते या नव्या रीतियुगात वेगळे व रूढ दृष्टीने विपर्यस्त होत चालल्याचे जाणवते . पण मुख्यतः या प्रकारचे संवेदन रीतीशी अधिक संवद्ध आहे . ' तक्ता ' (पृष्ठे १३०-३१) या कवितेतील मराठी वर्णमालेची स्थिर चित्रे गतिचित्रे म्हणून कोलटकर पाहतात . ही पाहण्याची रीत आहे . ' चट्टामट्टा ' या कवितेत (पृष्ठ १२४) ते लिहितात .

' थांव तरी कुणाला म्हणशील
वघता वघता .....
वस्तूंच्या रक्तात साखर होऊन जाशील ...

घरातील पेपर , स्टूल , रेडिओ , वूट , हँगर , नळ , धुण्याचे चिमटे , आणि दुर्मिळ वेल या सर्व गोष्टी व्यक्तीचा चट्टामट्टा करणार व त्यांच्या रक्ताची रक्तता सांभाळणारी प्रमाणशीर साखर बनणार . चट्टामट्टा करणारे घर हे महानगरीय घराच्या नव्या रीतीचे संवेदन आहे . किंवहुना त्यातील नवता रीतिदर्शक आहे . अवमानवीकरणाचे मूल्यमापन तसे नवीन नाही . त्याचे प्रकटीकरण वरवरच्या फरकाने केशवसुतांपासून मराठी कवींनी वरचेवर केल्याचे दिसते . तथापि ज्या रीतीमधून कोलटकर अवमानवीकरणाचे संवेदन स्वतः प्रतीत करून घेतात व देतात , ती रीती वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण आहे .

' एकटी ' या कवितेत (पृष्ठ ४२) कोलटकर एका वेढव वाईला उद्देशून म्हणतात . ' पण तुला एक कविता मी देऊ लागतो ! ' कविता करणे म्हणजे देणे चुकते करणे आणि हे देणे म्हणजे काही खास सांस्कृतिक ऋण नव्हे ! वैचारिक , विचारप्रणालीय , मूल्यात्मक , नैतिक या प्रकारचे हे देणे नाही , नसावे / हे देणे म्हणजे मनाने स्वीकारलेली एक रीतभात होय . आपली कविता अशा रीतीभातीच्या जाणिवेतून निर्माण होते , असेच जणू कोलटकरांना सुचवायचे आहे .

दृक्श्राव्य माध्यमांच्या आधीन झालेली वा आहारी गेलेली संवेदनशीलता आपल्या काव्यविषयांकडे त्या माध्यमांच्या नजरेनेच पाहू लागते . ही नजर प्राधान्याने आकारिक ठरते . वस्तूंचे , व्यक्तींचे , वास्तूंचे , पशुपक्ष्यांचे , कलाकृतींचे सगळेच गोचर जग एक ग्राफिक रूपांचे जग बनते . रंग , रेषा , आकार यांच्या चल आणि अचल स्वरूपांतच ते प्रतीत होत राहते . त्यामुळे प्रत्येक कविता ही एक प्रकारचे ग्राफिक निदर्शन (रिप्रेझेंटेशन) ठरते . ज्ञानेंद्रियांनी संवेद्य होणाऱ्या जगाप्रमाणेच मनाला जाणवणारेही एक संवेद्य विश्व मनुष्याला उपलब्ध असते . या अंतःस्थ संवेद्य जगाची चित्रे कविता रेखाटते पण या प्रकारची चित्रेही कोलटकर ग्राफिक निर्मिती म्हणूनच रेखाटतात . त्यातही रंग , रेषा , आकार , गती यांनाच किंवा त्याच्या रीतिलाघवालाच ते महत्त्व देतात , असे वाटते . ' हॉस्पिटलमधील त्यांच्या कविता (पृष्ठे ९१-१०८) किंवा पर्शियन मिनिचर (पृष्ठे ४६-४७) सारख्या प्रेमजाणिवेची कविता या दृष्टीने उल्लेखनीय होत . पर्शियन लघुचित्ररूपातच ते प्रेमभावना अनुभवतात व व्यक्तही करतात .

प्रेमभावनेचे लघुचित्रीकरणातून एक यांत्रिक , तांत्रिक अवमानवीकरणाची वेदना सूचित होते हे खरे . पण नावीन्य आहे तो या वेदनेत नाही , तर ते तिच्या नावीन्यपूर्ण रीतीमध्ये आहे . हे रीतिलाघव हेच या कवितेचे वैशिष्ट्यच आहे .

ग्राफिक कलेत आकृतिबंध व रंग यांच्या संवेदनाला महत्त्व असते . ग्राफिक कवितेत अनुभवाच्या आकृतिबधाला व भावनेच्या रंगाला महत्त्व असते . या प्रकारच्या ग्राफिक कविता कोलटकरांनी निर्माण केल्या आहेत व त्यांतूनच त्यांचे वेगळेपण दडलेले आहे . काळा रुमाल (१२७) , मलखांब (१२२) , पाव (१२३) , गणपती (१२१) , कांबळं (११७) , बिल्डिंग (११५) , खेकडे (१११-११४) , रद्दी (१०९-११०) यांसारख्या कविता या संदर्भात उल्लेखनीय आहेत .

दृक्‌श्राव्य अशा प्रभावी माध्यमांनी माणसाला रात्रंदिवस घेराव घातलेला आहे आपल्या गोचर अगोचर वास्तवाच्या रंगरूपाच्या अनंत नवनव्या कला व कक्षा त्यामुळे आपल्या आवाक्यात आणून ठेवल्या आहेत . आपल्या सांस्कृतिक , मूल्यात्मक संवेदनशीलतेवरही या माध्यमांचा ठसा अपरिहार्यपणे उमटत आहे . लेखन , रेखाटन , चित्रण , अंकन यांच्या शेकडो संभाव्य रूपांचे आकारविश्व प्रत्यही माणसाच्या समोर साकार होत आहे . जैविक (ऑरगॅनिक) , 'प्रतिजैविक , भौमितिक , कार्यप्रवण (फंक्शनल) अशा आकाराचे रूढ वस्तुजगत व जीवजगत अनपेक्षित अशा वेगवेगळ्या आकारांतून आविर्भूत होत आहे . या माध्यमिक प्रभावयुगात म्हणूनच सर्जनशील संवेदनशीलतेला एक अभिनव रीतिलाघवी दृष्टी प्राप्त होऊ लागली आहे . या रीतिप्रवोधन - युगाचे कोलटकर हे प्रतिनिधी आहेत . कोलटकरांचा काव्यलेखनकाल १९५० ते १९८० हा असला व रीतिप्रवोधनाचा प्रभाव सर्वसामान्य माणसावर १९८० नंतरच ठळकपणे पडू लागला असला तरीही कोलटकरांच्या ग्राफिक्सच्या व्यवसायामुळे व मुंबईतील वास्तव्यामुळे त्या रीतिप्रवोधनाचे संवेदन त्यांना काहीसे अगोदर होणे स्वाभाविक होते . या रीतिसंवोधनयुगाचे मराठी काव्यक्षेत्रातील ते अग्रदूत होत असेही म्हणता येईल .

तथापि रीतिप्रवोधनयुगाचा सांस्कृतिक संदर्भ दोन प्रकारचे प्रश्न निर्माण करतो .एक प्रश्न भाषेचा , की ज्या भाषेतूनच कविता रूपास येते . भाषेला केवळ रीतिसंदर्भ नसतो . रंगरेषाआकारांचे ग्राफिकीय माध्यम व कवितेचे भाषिक माध्यम यांत फरक आहे . ग्राफिक माध्यमांना सांस्कृतिक दृष्टीने निस्संदर्भ करता येते वा होता येते . भाषा ही कधीही सांस्कृतिक निस्संदर्भता धारण करू शकत नाही . भाषा निस्संदर्भ होऊच शकत नाही . तिला केवळ रीतिसापेक्ष अर्थ व अर्थपूर्णता यांनी वापरता येत नाही . भाषेला रीतिनिरपेक्ष अर्थ व असतो . व कविता नकळतपणे त्यांतून निवड करीत असते . केवळ रीतीच्या दृष्टीने निवड केली असे म्हणून व समजून ती निवड फक्त रीतिदर्शकच ठरते , असे घडत नाही .

कोलटकरांच्या थेरडी या कवितेत (पृष्ठ ४४) एका वृद्धेचे चित्र रेखाटले आहे . वृद्धा , म्हातारी , आणीबाई , थोरली माय यांसारखे शब्द कोलटकरांनी टाळले व ' थेरडी ' हाच शब्द निवडला . 'प्रक्षुब्ध रणांगणावर मेलेली घोडी ' अशा वर्णनाने ही कविता संपते . हे एक वार्धक्याचे काहीसे करुण वाटणारे चित्र ! पण अशा भावाशी ' थेरडी ' हा शब्द रूढ दृष्टीने

म्हातारी ' असे ठेवले आहे , ' काही थेरडे व एक थेरडी ' असे ठेवले नाही . रीतिदृष्टीने पाहिले तर कोलटकरांची ' थेरडी ' या शब्दाची निवड व घाटयांची ' म्हातारी ' या शब्दाची निवड यांत फरक नाही . पण या शब्दांना जे सहचर अर्थ व अर्थपूर्णता आहेत , ते रीतिविवेकाला जुमानत नाहीत थेरडी शब्दातील निंदाव्यंजकता , तुच्छतावादी दृष्टी आणि म्हातारी शब्दातील ममत्व व आदरभाव आपणास जाणवल्याखेरीज रहात नाही कोलटकरांनी काही कवितांच्या एका गटाला ' काळ्या ' कविता असा मथळा दिला होता . हे रंगनाथ चित्रकलेतील काळ्या रंगाप्रमाणे केवळ रंगसंवेदना जाणवून देत नाही , तर काळवा रंगाशी निगडीत अशा परंपरागत सहचरी कल्पनाही मनात जागृत करते . कोलटकरांच्या काही कवितांना नावेच नाहीत , पण अनेक कवितांना मात्र नावे आहेत . नावांची अनुपस्थिती म्हणजेही शब्दांचीच अनुपस्थिती ! शब्दांच्या कवितेला दिलेली या प्रकारची शब्दांच्या अनुपस्थितीची जोड ही देखील काही एक अर्थ मनात सुचवून जातेच .

याचा अर्थ एवढाच की माध्यमिक रीतिप्रधान संवेदनशीलतेला कवितेच्या क्षेत्रात निस्संदर्भ माध्यम उपलब्ध नसते . तिचे माध्यम भाषा आणि भाषा नेहमीच संदर्भबहुल असते , तिला निस्संदर्भ करता येत नाही . भाषेला फक्त रीतिप्रवणच वळण द्यावयाचे , तर कविता ही निःशब्दच राखावी लागेल . कोलटकर कविता वाचण्याच्या भानगडीत न पडणाऱ्या ज्या रसिकाच्या शोधात निघाले आहेत , तो शोध रीतिलाघव व म्हणून निःशब्द कवितेलाच लागेल , असे म्हणता येईल .

रीतिप्रबोधनयुगाच्या कोलटकरी आविष्काराचा दुसरा प्रश्न म्हणजे कवितापणाचा प्रत्यय काव्याचा अनुभव रीतिलाघवातून . निदान रसिकांच्या दृष्टीने तरी संपूर्ण काव्यप्रत्यय समजून घेता येत नाही . स्पष्टही पूर्णपणे होणे कठीण आहे . कोलटकरांची इमारत अभिसारिका बनते , फर्निचर माणसाचा चट्टामट्टा करण्यास टपून बसते यातील रीतिसंवेदन अगदी अभिनव वाटते . अपूर्व ठरते . पण या कविता जो समग्र अनुभव वाचकाला देतात . तो या अपूर्व रीतिसंवेदनापुरताच वा तेवढ्यामुळे स्पष्ट होत नाही . पण बहुधा याचेही कारण कवितेचे भाषामाध्यम हेच असावे !

दृक-श्राव्य माध्यमांनी अतिप्रभावित होणारी व रीतिप्रवणतेकडे झुकणारी सर्जनशील संवेदनशीलता इतर चित्रशिल्पादी ललितकलांतून जी नवनवी क्षितिजे गाठू शकेल , तशी किमया शब्दमाध्यमिक काव्याला अशक्य नाही . पण अखेर काव्य हे रीतिलाघवात संपत नाही . कोलटकरांची कविता ही देखील रीतिलाघवात संपत नाही . ती त्यात असूनही त्याच्या बाहेर ही असते .

कोणत्याही प्रकारच्या स्पष्ट व अस्पष्ट कवितावाह्य संदर्भांना स्वीकारून अशा संदर्भांच्या पलीकडे जाण्याची चांगल्या व श्रेष्ठ कवितेची धडपड असते . या अर्थाने कोलटकरांची कविता रीतिप्रबोधनयुगांच्या आतलीही आहे आणि बाहेरचीही आहे , असे मला वाटते .

**(रा .ग .जाधव , राजीव लॉज , ५६५ नाराजण पेठ , पुणे ३०)**

०००

विश्वनाथ शिंदे

# लोकसाहित्याची संकल्पना

निखळ वाङमयीन भूमिकेतून लोकसाहित्याचा विचार मराठीतील लोकसाहित्याच्या अभ्यासकांनी केलेला नाही, त्यामुळे मराठी वाङमयाच्या विद्यार्थ्यांनी लोकसाहित्याचा अभ्यास कसा करायचा यासंबंधीची दिशा निश्चित झालेली नाही.

लोकसाहित्याच्या अभ्यासाची नीट मांडणी करावयाची असेल तर फोकलोअर या शब्दातील लोअर याचा अर्थ विद्या असा असल्याने 'साहित्य' शब्द नाकारून त्याऐवजी लिटरेचर म्हणजे वाङमय या शब्दाचा स्वीकार करणे अपरिहार्य आहे. म्हणजेच लोकसाहित्य या संज्ञेऐवजी 'लोकवाङमय' या संज्ञेचा स्वीकार करावा लागेल. किंवा 'साहित्य' हा शब्द ज्या व्यापक अर्थाने लोकसाहित्यात योजिला जातो, तो व्यापक अर्थ नाकारून साहित्य म्हणजे वाङमय असा मर्यादित अर्थ स्वीकारावा लागेल.

'स्टॅन्डर्ड डिक्शनरी ऑफ फोल्कलोअर, लिजंड अँड मायथॉलॉजी' मध्ये २१ अभ्यासकांच्या व्याख्या समाविष्ट करण्यात आल्या आहेत. त्यापैकी १८ अभ्यासक लोकसाहित्य ही वाङमयाची सामग्री आहे असे सांगतात. ही गोष्ट या संदर्भात लक्षणीय आहे. त्यामुळे वाङमयाच्या विद्यार्थ्यांसाठी लोकसाहित्याच्या अभ्यासी कक्षा निश्चित करताना फोकलोअर मधील जी केवळ व्हर्बल म्हणजे 'शाब्द' सामग्री आहे तिचाच समावेश करावा असे मला वाटते. या संदर्भात वुईल्यम बास्कम याने १९५३ मध्ये लोकवाङमयाच्या अभ्यासाची सीमारेषा स्पष्ट करणारी केलेली पुढील व्याख्या उपयुक्त ठरेल.

" Folklore to the anthropologist is a part of culture but not the whole of culture. It includes myths, legends, tales, proverbs, riddles, the texts of ballads and other songs, and other forms of lesser importance, but not folkart, folkdance, folkmusic, folkcostume, folkmedicine, folkcustom or folkbelief. All of these are unquestionably worthy of study, whether in literate or nonliterate societies. All folklore is orally transmitted, but not all that is orally transmitted is folklore." [1]

मानवशास्त्राच्या दृष्टीने लोकसाहित्य म्हणजे संपूर्ण संस्कृती नव्हे, तर तो संस्कृतीचा एक भाग आहे. लोकसाहित्यात दंतकथा, आख्यायिका, कथा, म्हणी, कोडी, कथाकाव्ये, इतर गीते, आणि साहित्याच्या इतर काही स्फुट रचनांचा अंतर्भाव होतो. परंतु लोककला, लोकनृत्य, लोकविशेष, लोकवैद्यक, लोकपरंपरा, किंवा लोकसमजुती यांचा अंतर्भाव त्यात होत नाही. ज्यांचा अंतर्भाव होत नाही त्या सगळ्या गोष्टी निःशंकपणे सुशिक्षित व अशिक्षित समाजामध्ये अभ्यासयोग्य असतात. सगळेच लोकसाहित्य हे मौखिक परंपरेने चालत आलेले असले तरी जे मौखिक परंपरेचे आहे ते सर्व लोकसाहित्य नसते, असे विवेचन बास्कमने केले

आहे . या विवेचनात बास्कमने निखळ वाङ्मयीन दृष्टिकोन स्वीकारलेला आहे हे स्पष्ट दिसते . फ्रॅन्सिस ली उटले यांनाही वाङ्मयीन दृष्टीने लोकवाङ्मयाचा विचार केला असून वास्कमच्या भूमिकेशी तो मिळताजुळता आहे . रुढी . श्रद्धा , हस्तकला आणि भाषा यांना वगळून मौखिक परंपरेने संक्रमित होणाऱ्या कला आणि वाङ्मय यांचा समावेश लोकवाङ्मयामध्ये करावा अशी उटले यांची भूमिका आहे . Art and literature orally transmitted excluding custom, belief and language. [2] येथे भाषेचा शास्त्रीय अभ्यास लोकवाङ्मय यातून वगळला असला तरी त्याचा समावेश लोकवाङ्मयात करावा लागेल .

१९५५ साली बास्कमने पुन्हा एक लेख लिहून लोककथा , म्हणी , कूटकोडी (रिडल्स) इत्यादींना विधी , विश्वास , श्रद्धा , यांच्यापासून वेगळे काढून ' शाब्दकला ' (व्हर्बल आर्ट) [३] मानावे असे सुचवले . शाब्दकलेचा अभ्यास म्हणजे लोकवाङ्मयाचा अभ्यास असे मला सुचवावयाचे आहे . बास्कमचा हा दृष्टिकोन ध्यानात घेऊन लोकवाङ्मयाच्या अभ्यासाची मांडणी करता येईल . वाङ्मयाच्या अभ्यासकाने लोकसाहित्यातील कला(क्राफ्ट) , समजुती , आणि रुढी या गोष्टी ' शाब्द ' सामग्रीपासून वेगळ्या करणे आवश्यक आहे . याबद्दल उटले खालीलप्रमाणे मत मांडतात:

" The separation of the study of craft, belief and custom from the study of folkart should be no deterrent to collector concerned with a living process. It should be a challenge to him to understand that the whole has its parts, each of which needs special attention. The student of Literature per se makes his choice because special equipment is always needed to study any kind of literature, because much of the record of folktale and ballad has been crippled by faulty documentation, because a total field of culture demands division of labour. As well as interdisciplinary breadth, and because the specialist in literature, written or folk, can never pretend to complete competence in psychology, sociology, anthropology, history and other sciences, however, he may need to call upon their informed pracititioners. Hence he demands of right to ulitmate definition of his field of operation."

इतर गोष्टींपासून लोकसाहित्याच्या सीमा ' शाब्द ' कलेपर्यंत निश्चित कराव्या लागतील .

वरील विवेचन ध्यानात घेता मराठीतील लोकवाङ्मयाच्या अभ्यासाची मांडणी आणि एकूणच लोकवाङ्मयाकडे पाहण्याची आपली दृष्टी चुकीची आहे . हे लक्षात येते .

लोकवाङ्मयाचा अभ्यास प्रस्थापित , पारंपरिक पद्धतीने न करता तो नव्या वाङ्मयीन दृष्टीने करणे आवश्यक आहे . हिंदीतील एक अभ्यासक त्रिलोचन पांडे लिहितात : " पाश्चात्य जगत में लोकवार्ता के आख्यानपूलक अंशों को (लोकसाहित्यादि) लोकविश्वास अथवा लोकाचार जैसे विषयों से भिन्न करके देखा जाना लगा है। इसका प्रमाण नार्वे और स्वीडन की तत्संबंधी नवीन गतिविधियों में भी मिलता हैं। वहाँ लोकजीवन की अनुसंधान (फोक लाईफ रिसर्च) के नाम से लोकवार्ता के अध्ययन की जो अनुसंधान प्रकृति विकसित हुई है , उसमें लोकाख्यानों अर्थात धर्मगाथाओं के विवेचन को सम्मिलित नहीं किया जाता। इस प्रकार वहाँ लोकाख्यानों (फोक नॅरेटिव्ह) तथा लोकजीवन (फोक लाईफ) के दो अलग अलग

शीर्षकों के अंतर्गत लोकवार्ता का अध्ययन किया जाने लगा है। "

मराठी विषयाच्या अंतर्गत लोकवाङ्मयाचा अभ्यास करताना जे मौखिक परंपरेने चालत आलेले " शाब्द " वाङ्मय आहे , त्याचाच समावेश लोकवाङ्मयात करावा ; असे सुचवावेसे वाटते . लोककथा , लोकगीत ज्या शब्दरूप आहेत तेवढ्याच कलाप्रकारांना शाब्द स्वरूपातील मंत्र , वाक्प्रचार , म्हणी , प्रहेलिका , उखाणे अहाणे , शिव्या अशा शाब्द सामग्रीचा समावेश लोकवाङ्मय अशी संज्ञा त्यासाठी स्वीकारावी . मौखिक परंपरेने चालत आलेल्या ज्या सामग्रींची संहिता उपलब्ध होऊ शकेल त्या सर्व " शाब्द " सामग्रीचा अंतर्भाव लोकवाङ्मयात करावा अशा रितीने प्राप्त झालेली संहिता परिपूर्ण असेलच असे नाही . लोकवाङ्मयाची मूळ संहिता आणि तिचे प्रयोगरूपातील सादरीकरण यात बराच फरक असतो . नाटकासारख्या दृक्श्राव्य अशा मिश्र वाङ्मयप्रकारांचा अभ्यास आपण करीतच असतो . लोकवाङ्मयाची संहिता आणि तिचे प्रयोगरूप यातील अनुबंध ध्यानात घेऊन तसा अभ्यास करता येईल .

यंत्रतंत्र , तोडगे , लोकभ्रम , वनस्पतीविद्या , वैद्यकविद्या , विधिनिषेध , जादूटोणे , रूढी , परंपरा , विधी इत्यादी गोष्टी लोकवाङ्मयाच्या अभ्यासातून वगळाव्या लागतील . असे केल्याने लोकवाङ्मयाच्या अभ्यासात अडचण निर्माण होईल अशी भीती काही अभ्यासकांना वाटते . प्रभाकर मांडे यांनाही तशी शंका वाटते . " लोकवाङ्माच्या (फोक लिटरेचर) अभ्यासात केवळ संहिता वाङ्मयकृती म्हणूनच अभ्यासावी लागते . लोकसाहित्यप्रकार म्हणून तिचा अभ्यास शक्य होत नाही . संस्कृतीच्या अभ्यासाचे साधन म्हणून त्या संहितेचे असलेले महत्त्व क्षीण होते . त्यासंबंधीचा सामाजिक संदर्भ किंवा समाजजीवनातील त्याचे स्थान लक्षात घेणे महत्त्वाचे असते , नव्हे अनिवार्य असते .[६] '(लोकसाहित्याचे स्वरूप . पृष्ठ ३५)' . डॉ . मांडे म्हणतात तशी अडचण येण्याचे कारण नाही . मराठी वाङमयाच्या अभ्यासकांचे लक्ष्य लोकसंस्कृतीचा अभ्यास करणे हे नसून वाङमयाचा अभ्यास हे असते . त्यामुळे संहितेचे वाङमयीन मूल्य काय ही गोष्ट महत्त्वाची ठरते . मांडे म्हणतात त्याप्रमाणे संहितेकडे लोकसंस्कृतीच्या अभ्यासाचे साधन म्हणून पाहण्याची वाङमयाच्या अभ्यासकांना गरज नाही . संस्कृतीच्या अभ्यासातच विशेष स्वारस्य असलेल्या अभ्यासकांनी सामाजिक , सांस्कृतिक मानवशास्त्रज्ञाच्या दृष्टिकोनातून हवे तर अभ्यास करावा . लोकवाङमयाकडे पाहण्याचा साहित्य-अभ्यासकांचा दृष्टिकोन आणि सामाजिक-सांस्कृतिक मानवशास्त्राच्या अभ्यासकांचा दृष्टिकोन यात भेद आहे . त्यादृष्टीने लोकवाङमयाची संकल्पनाही निश्चित करणे आवश्यक आहे . याचा अर्थ असा नव्हे की वाङ्मयाच्या अभ्यासकाने इतर गोष्टींकडे ध्यान देऊच नये . संहितेचे आकलन करताना इतर सामाजिक शास्त्रांची मदत हवी असेल तेव्हा संदर्भ म्हणून त्यांचा विचार करणे योग्य होईल पण संस्कृतीचा अभ्यास करणे हे वाङमयाच्या अभ्यासकांचे प्रमुख उद्दिष्ट नसते लोकवाङमयाचा अभ्यास आपण वाङमयीन दृष्टीने करतोय हे निश्चित केले की अडचणी येणार नाहीत .[७]

थोडक्यात लोकवाङमयाच्या अभ्यासाला नेमकी आणि निश्चित दिशा द्यावयाची असेल सीमारेषा स्पष्ट करायला हव्यात . वाङमयीन दृष्टीने लोकवाङमयाचा अभ्यास व्हायला हवा कोणती वाङमयीन वैशिष्ट्ये त्यात आहेत हे पहावे . त्यात केवळ ' शाब्द ' सामग्रीचा समावेश हवा . आणि या अभ्यासासाठी ' लोकवाङमय ' अशी संज्ञा स्वीकारणे उचित ठरेल असे मला

वाटते.

[1] William Bascom- Quoted by Francis Lee Utley. Folk Literature : An Operational Definition' in The Study of Folklore' (ed) Alan Dundes, Prentice-Hall Inc. Englewood Cliffs J.J. 1965 P. 11

[2] Ibid P. 12 (Folk Literature: An Operational Definition, The Study of Folklore (Ed) Alan Dundes 1965, Page 12.)

[3] Willian Bascom : Verbal Art, Journal of American Folklore, Vol 68 (1955) Ed. Alan Dundes, 1965, Page 12.

[4] फ्रॉन्सिस ली उटले, उनि, पृ. २१. २२

[5] त्रिलोचन पांडे, लोकसाहित्य का अध्ययन, लोकभारती, इलाहावाद. १९७८ पृ. ८८

[6] प्रभाकर मांडे, लोकसाहित्याचे स्वरूप, उनि. पृ. ३५

[7] डॉ. प्रभाकर मांडे यांनी निखळ वाङ्मयीन भूमिकेतून संहितेचा अभ्यास केल्यास तिचे सांस्कृतिक मूल्य क्षीण होते असे म्हटले आहे. पण सामाजिक संदर्भ आणि समाजजीवनातील संहितेचे महत्त्व शोधण्यास संहिता अपुरी वाटत असेल तर ते संदर्भ आपण सामाजिक शास्त्राच्या आधारे शोधू शकतो. प्रस्तुत निवंधात फ्रॉन्सिस उटले यांनी इंटर डिसिप्लिनरी स्टडीच्या संदर्भात जे विवेचन केले आहे ते ध्यानात ठेवले. उदा. चिं. त्र्यं. खानोलकरांच्या कोंडुरा कादंवरीचे आकलन करताना अशी अडचण येत नाही. आपण ज्या संस्कृतीत वाढलो तिच्यातील अनेक गोष्टी आपणांस परंपरेने ज्ञात असतात. कलाकृतीचे आकलन चांगल्या प्रकारे होण्यासाठी संहितेच्या अनुषंगाने तिच्या सामाजिक सांस्कृतिक संदर्भाची आवश्यकता भासत असेल तर तसा शोध जरूर घ्यावा. मात्र वाङ्मयीन अभ्यासाच्या दुय्यम गरजा म्हणून या अवांतर गोष्टींकडे पहावे.

(डॉ. विश्वनाथ शिंदे, ५८ सी. अधिव्याख्याता निवास, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर)

ooo



अनुक्रमणिका





डॉ. गं. ग. बारचे

# ' दिलासा ' : शैलीवैज्ञानिक रसग्रहण

कविवर्य कुसुमाग्रज यांची कविता बहुआयामी व बहुस्पर्शी आहे . एका बाजूला ही कविता बहुश्रुत आणि बुद्धिवादी व्यक्तीला भावते तर दुसऱ्या बाजूला भावुक किंवा सर्वसामान्य वाचकालाही प्रभावित करते . ' दिलासा ' या कवितेच्या शैलीवैज्ञानिक रसग्रहणावरून हे स्पष्ट करता येईल .

**दिलासा**

भेट अशी की जिला पालवी
कधीच फुटली नाही
कोर शशीची घनपटलांतून
कधीच सुटली नाही .
मिठीविना कर रिते राहिले
दिठीही फुलली नाही .
अधरामधली आदिम ऊर्मी
तशीच मिटली नाही .
युगायुगांचा निरोप होता
तोही कळला नाही .
समीप येऊनि स्वर संवादी
राग न जुळला काही .
खंत नसे , पण एक दिलासा
राहे हृदयी भरूनी
अलौकिकाची अशी पालखी
गेली दारावरूनी .

कविता वाचल्यानंतर सहजगत्या . जाणवलेला अर्थ पुढीलप्रमाणे: एका (भक्त)(रसिक) व्यक्तीच्या जीवनात भूतकाळात एके दिवशी एक अविस्मरणीय घटना घडली . त्या दिवशी त्याच्या दारावरून एक पालखी गेली . ती पालखी होती ' अलौकिकाची ' . ' अलौकिका ' हा शब्द कवितेचा केंद्रबिंदू मानावा लागेल कारण या शब्दाद्वारे कोणत्या व्यक्तीचा बोध होतो त्याचा उलगडा होत नाही . हा शब्द प्रमुखतः दोन प्रकारच्या व्यक्तींचे प्रतिनिधित्व करतो . एक स्त्री: जिचे नाव अलौकिका व जी नावाप्रमाणेच लावण्यवती असावी . दोन: जी व्यक्ती लौकिक नाही म्हणजेच ' दैवी ' असावी . या व्यक्तीची पालखी जेव्हा दारावरून गेली तेव्हा तिचा (देवीचा) चंद्रम्यासारखा चेहरा , कमळासारखे डोळे , थोडक्यात तिचे (देवीचे) अप्रतिम सौंदर्य कवीने ओझरते पाहिले . परन्तु त्याने जे पाहिले ते त्याच्या तन-मन-आत्म्याशी निगडीत झाले . ती घटना घडली व संपली . पण त्या अनुभूतीचे भावनिक ओझे कायमच राहिले . हे

ओझे कमी व्हावे म्हणून तो आपल्या एका जिवलग मित्राला या ठिकाणी ती प्रसंगानुभूती सांगत आहे .

तो आपल्या मित्राला सांगतो की ती भेट शब्दरहित होती व नंतरही ती भेटानुभूती शब्दरूप घेऊ शकली नाही . त्या स्त्रीचे (देवीचे) ओझरते पाहिलेले सुंदर रूप त्याच्या मनातून कधीच लुप्त होऊ शकले नाही . त्या सौंदर्यसम्राज्ञीला (देवीला) आलिंगन देता न आल्याने त्याला त्याचे हात अर्थहीन वाटतात . तसेच डोळ्यांनी तिला पूर्णपणे पाहण्याच्या आधीच ती (देवी) गेल्याने त्याचे डोळे आनंदाने उमलू शकले नाहीत . तिला (देवीला) पाहिल्यावर त्याच्या मनांत पद्मदलाप्रमाणे सहज उमललेली इच्छा त्याच सहजतेने संतुष्ट झाली नाही . तिच्या (देवीच्या) कमलनयनांमध्ये कायमचा निरोप होता पण तोही त्याला कळला नाही . तिच्या (देवी) सारखी अनुरागी व्यक्ती जवळ येऊनसुद्धा , कुठलेही नाते जुळू शकले नाही . हे सर्व असे घडले असूनही त्याला कुठलीच खंत वाटत नाही . कारण ' अलौकिका ' ची (देवीची) पालखी त्याच्या दारावरून गेली हे सत्य ' दिलासा ' या रूपात त्याच्या हृदयकमलामध्ये एखाद्या दवबिंदूसारखे भरून आहे .

थोड्या सूक्ष्म चिंतनानंतर लक्षात येते ते असे की कवितेचे मर्म किंवा गाभा त्या व्यक्तीने अलौकिक रूप पाहिल्यावर त्याच्या अंतर्मनात उमटणाऱ्या वेगवेगळ्या रूप सौंदर्यात आहे . त्या पालखीतल्या व्यक्तीला पाहिल्यावर एकाच वेळेस मानवी व दैवी (अलौकिकाची पालखी) , मानवी व नैसर्गिक (कोर शशीची) , नाद (स्वर संवादी) इ . विविध सौंदर्य त्याला जाणवते . तसेच पालखीतील व्यक्ती पाहिल्यावर त्याच्या मनात उमलणाऱ्या भावनासुद्धा वेगवेगळ्या आहेतः पूज्यतेची भावना (पालखी) , माधुर्य भावना (राग न जुळला) व शारीरिक व नैसर्गिक (मिठीविना कर- पानाविना झाड , दिठी-फूल , ओठ - पद्मदल) . अशा पद्धतीने या कवितेत दैविक , नैसर्गिक , नादीय , शारीरिक सौन्दर्य व भावनांचा चतुर्विध संगम झालेला आहे . म्हणूनच ही कविता सर्व प्रकारच्या वाचकांच्या मनात एक अव्यक्त हुरहूर निर्माण करते .

अंतःप्रेरणेतून पाहिलेल्या वरील व्याख्येचे रचनागत भाषिक घटकांच्या माध्यमांतून औचित्य पाहू या . सर्व प्रथम व्याख्येच्या सुरुवातीला दिलेली संवादीय स्थिती पुढीलप्रमाणे प्रस्तुत करता येईल .




अशा संवादीय स्थितीचा भाषिक आधार म्हणजे कवितेत प्रयुक्त क्रियापदे . कवितेत सर्व क्रियापदे- फुटली , सुटली , रिते राहिले , फुलली , मिटली , कळला- जुळला , गेली- ही साध्या

भूतकाळात असून फक्त एक क्रियापद -नसे- साध्या वर्तमानकाळात व ' राहे ' हे पूर्ण-अपूर्ण वर्तमानकाळातील आहे . ही क्रियापदं धडलेली घटना , घटनेचा झालेला , असलेला व पुढे चालू रहाणारा परिणाम दर्शवितात . तसेच पाहणारी व अनुभव घेणारी व्यक्ती पुरुषच असून पालखीतील व्यक्ती स्त्री (देवी) आहे हे ' अलौकिका ' या शव्दावरून सूचित होते . शिवाय हा अनुभव व्यक्तिगत व अतिशय नाजूक असल्याने तो केवळ जिवलग मित्रालाच कथन करीत असणार हे रचनागत संदर्भावरून लक्षात येते .

वेगवेगळ्या जाणवणाऱ्या सौन्दर्यछटा व भावना यांचा आधार पुढे अर्थसमांतर रचनेवरून (Semantic Parallels) कळतो . या अर्थ समांतर रचना पुढीलप्रमाणे दाखविता येतील :-

[फांदी / भेट] अशी की जिला [वाचा / पालवी]
कधीच फुटली नाही

[झलक चेहऱ्या / कोर शशी] ची [मन / घन] पटलातून
कधीच सुटली नाही .

[फळ / मिठी] विना [वृक्ष / कर] रिते राहिले

[फुल / दिठी] ही फुलली नाही

[पद्मदला / अधरा] मधली आदिम ऊर्मी
तशीच मिटली नाही .

[युग्म नयनां / युगायुगां] चा निरोप होता
तोही कळला नाही

समीप येऊनि [प्रिय अनुरागी / स्वर संवादी]

[योग / राग] न जुळला काही .

खंत नसे , पण एक [दवबिंदू / दिलासा]

राहे [पद्मदली / हृदयी] भरूनी

[रमणी/ देवी / अलौकिका] ची अशी पालखी गेली दारावरूनी .

कवितेतील वरच्या चौकटीतील शब्द माझे असून ते वापरल्यास कवी या कवितेत प्रमाणित भाषेपासून का , कुठे व कशा पद्धतीने लांब गेला आहे ते लक्षात आणून देतात . दुसरे असे की , चौकटीमधील माझे शब्द व त्यांना समांतर कवितेतील शब्द कोणत्या ना कोणत्या स्वरूपात विरोध दर्शवितात . हा विरोध मूर्त-अमूर्त (फांदी- भेट , अनुरागी-संवादी) , मानव-निसर्ग (दाचा-पालवी) , मानव-देव (चेहरा-शशी) अशा रीतीने प्रकट होतो . म्हणूनच निष्कर्ष निघतो की या भाषाविचलन उपयोजनेमुळेच मानवीय- नैसर्गिक- नादीय व दैविक असे चतुर्विध प्रवाह शक्य झाले आहेत .

ही कविता वाचताना प्रभावी वाटते व लगेच पाठ होते , कारण कवितेत दोन स्तरावर एकसंधता (Cohesion) आहे , ती म्हणजे शब्द एकसंधता व ध्वनी एकसंधता आणि कवितेत असलेले विशिष्ट ध्वनींचे प्राधान्य . कवितेतील शब्द एकसंधता (Lexical- Cohesion) पुढील प्रमाणे दिसते:

मानवी→भेट , मिठी , शशी (रमणी) , कर , दिठी , अधर , ऊर्मी , निरोप , खंत , दिलासा , अलौकिका (स्त्री) , पालखी , दार

प्रकृती/ निसर्ग → पालवी , शशी (चंद्र) , घनपटल

नाद → स्वर संवादी , राग

दैविक → अलौकिका (देवी) , शशी

तद्वतच ध्वनी एकसंधता पुढील प्रमाणे आढळते :-

अ) यमक ( End Rhyme) - नाही- नाही , वरूनी - भरूनी

ब) Cross Rhyme - कळला - जुळला , फुटली- सुटली , अशी-अशी , कधीच- कधीच

क)Reverse se Rhyme - पालवी- पालखी .

ड)Para Rhyme - फुटली- फुलली .

इ)Imperfect Rhyme -जिला- कळला .

फ) Consonance कधीच- तशीच , मिठी- दिठी , मधली- फुलली .

ग)Alliteration अधरा- आदिम , रिते- राहिले , समीप- स्वर संवादी , अलौकिकाची अशी , युगायुगांचा .

शिवाय कवितेत प्रयुक्त स्वर व व्यंजनांचा विचार केल्यास पुढील निष्कर्ष काढता येतो : व्यंजनाकडे पाहिल्यावर अल्पप्राणिक अघोष (Unaspirated Voiceless) क , च , ट , प , त आणि अल्प महाप्राणिक घोष (Unaspirated- aspirated Voiced) ग , घ , द , ध यांचे प्राधान्य आहे . तर स्वरांमध्ये इ , ई , अ , आ , उ , ऊ . शिवाय तर ध्वनी (लिक्विड साऊंड) म्हणजे म , न , र , ल , यांना प्राधान्य आहे . या अशा प्रकारच्या ध्वनींच्या उपयोगितेमुळेच कवितेला सहजगती व गेयता प्राप्त झाली आहे .

कवितेत शेवटचे कडवे पृथकृत (Foregrounded) आहे . अर्थाच्या दृष्टीने कवितेत असणारी एखादी क्रिया व तिचा परिणाम हा साचा येथे नाही. तसेच यमकाचाही Rhyme system) साचा येथे बदललेला दिसतो . कवितेच्या शेवटच्या कडव्याच्या दोन ओळीत कवितेचा शेवट असून त्यातच कवितेची सुरुवात आहे . रचनेच्या दृष्टीने या कडव्याची पहिली

ओळ विचलीत Deviant) आहे . तर तिसरी ओळ संदिग्ध (Ambiguous) असून या ओळी घडून गेलेल्या घटनेनंतर व्यक्तीच्या मनाची आजची स्थिती व पालखीतल्या व्यक्तीवद्दलची वस्तुस्थिती व्यक्त करते . याचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करता येईल . 'पण' वाक्ये आधी होकारार्थी व मग नकारार्थी तथ्य व्यक्त करतात . उदा . 'गड आला पण सिंह गेला' किंवा 'मला सर्व काही समजते पण कविता समजत नाही' . या कवितेत या तथ्यापेक्षा उलट स्थिती दिसते : 'खंत नसे पण एक दिलासा राहे . . . .' या ठिकाणी रचनेत बदल आहेच पण 'खंत' हा शब्द ओळीच्या सुरुवातीला आणून विशेष महत्त्वदर्शक केला आहे . यावरून त्या व्यक्तीला विशेष खंत वाटत आहे असा सूरच निघतो . तसेच 'अलौकिकाची अशी पालखी . . .' हे वाक्य संदिग्ध आहे , कारण ते द्व्यर्थी होऊ शकते , ते असे :

१) जी अलौकिक आहे तिची अर्थात देवीची पालखी

२) अलौकिका नावाची स्त्री व तिची पालखी . या संदिग्धतेमुळे कवितेला विचलनता (Deviation) आणि संदिग्धता (Ambiguity) आजून कवीला एका बाजूला 'Willing Suspension of disbelief' अशी स्थिती निर्माण करता आलेली आहे तर दुसऱ्या वाजूला व्यक्ती निरपेक्षता Objective Corelative साध्य झालेली आहे .

या कवितेचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तिची शोधनशक्ती (Cathartic effect) जबरदस्त आहे . एक उत्कृष्ट काव्यकृती अनेक गोष्टी देते . उदा . सौंदर्यदर्शन , आनंदानुभूती , जीवनाचे वेगवेगळे आयाम इ . परंतु याच्याही पुढे जाऊन एका उत्कृष्ट काव्यकृतिद्वारे वाचकाला ताणमुक्त करण्याची क्षमता प्रभावी आहे . योगाभ्यासामध्ये एक शिथिलीकरण- रिलॅक्शेसन टेक्निक- शिकविले जाते . यात व्यक्तीला आधी शरीर ताणण्याच्या व आकुंचित करण्याच्या सूचना दिल्या जातात आणि लगेच संपूर्ण शरीर पूर्णपणे मोकळे किंवा ढिले सोडण्यास सांगितले जाते . अगदी दोन मिनिटात व्यक्ती ताणमुक्त होते . या कवितेची प्रक्रियासुद्धा अशीच आहे . कवितेची सुरुवात ताणात होते- 'भेट अशी' ताणात पुढे सरकते- मिठी विना कर रिते राहिले- राग न जुळला- आणि मग शेवटी फक्त 'खंत नसे' पण एक दिलासा राहे हृदयी भरूनी' . . . . . यावरोवर संपूर्ण ताण निघून जातात . वाचकाला ताणमुक्तता व हलकेपणा दाटतो . एका नवीन स्वास्थ्याची अनुभूती येते .

डॉ . गं .ग . वारचे , प्रपाठक , इंग्रजी विभाग श्री . शि . वि . प्र . संस्थेचे
कला व वाणिज्य महाविद्यालय , धुळे ४२४ ००५

००० 



अनुक्रमणिका






म. श्री. दीक्षित

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

१९१२ च्या अकोला संमेलनात परिषदेला घटनात्मक रूप प्राप्त झाले. मुंबई कचेरीमार्फत जे उपक्रम हाती घेण्यात आले त्यात 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या नियतकालिकाचा आरंभ हा सर्वाधिक महत्त्वाचा म्हणावा लागेल.

'पत्रिका' ऑगष्ट १९१३ पासून सुरू झाली. पण ती स्वतंत्ररीत्या नव्हे तर 'विविध ज्ञान विस्तार' या मासिकाचा भाग म्हणून. पहिली दोन वर्षे ती मासिक स्वरूपात प्रसिद्ध होत होती. त्रैमासिक स्वरूपात तिचे दर्शन होऊ लागले ते १९१६ पासून आणि ते ही 'विस्तारा'ला जोडूनच. 'विस्तार' आणि 'पत्रिका' यांचा एकत्र संसार मे १९२५ पर्यंत चालू होता.

१९२५ च्या मे महिन्याचा (वर्ष १३ अंक १, वास्तविक वर्ष १२) अंक प्रसिद्ध झाल्यानंतर 'पत्रिका' बंद पडण्याचे नेमके कारण सांगता आले नाही तरी ती चालू ठेवण्याला कोणी खंबीर शास्ता राहिला नव्हता हे एक कारण संभवते. सर भालचंद्र भाटवडेकर (निधन १९२२) आणि विष्णू मोरेश्वर महाजनि (निधन १९२३) हे दोघे परिषदेचे आधारस्तंभ कोसळून पडल्यामुळे दा.ग. पाध्ये एकाकी पडले. 'पत्रिका' चालविण्याची धडाडी त्यांचे अंगी नव्हती. चिटणीस 'विविधज्ञानविस्तार' कर्ते रा.र. मोरमकर यांनाही 'पत्रिके' चे काम पेलवेनासे झाले असावे. अशा स्थितीत 'पत्रिका' त्रैमासिक स्वरूपात पुन्हा सुरू करावी असा ठराव दि. १३ ऑक्टोबर १९२७ रोजी मुंबई येथे भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेने मंजूर केला. आणि तीन वर्षांच्या खंडानंतर 'साहित्य पत्रिका' स्वतंत्रपणे (कचेरी-भाई जीवनजी लेन, मुंबई २) प्रकाशित होऊ लागली.

निवृत्त न्यायाधीश आणि समाजजीवनाचे एक अभ्यासक रा. सा. ना. गो. तथा नानासाहेब चापेकर यांच्यासारखा एक कर्ता पुरुष परिषदेला लाभल्यामुळे 'पत्रिके'चे प्रकाशन सुलभ झाले. २२ मार्च १९२७ रोजी वर्ष प्रतिपदेच्या मुहूर्तावर 'पत्रिके'चा पहिल्या वर्षाचा पहिला अंक पुण्याच्या आर्यसंस्कृती मुद्रणालयात नानासाहेबांनी छापून प्रसिद्ध केला. या अंकावर संपादक म्हणून कोणाचेही नाव नसून 'प्रकाशक' म्हणून त्यांचे नाव आहे. मुद्रक म्हणून वा. गो. परांजपे, आर्यसंस्कृती मुद्रणालय यांचे नाव आहे. हा पहिला अंक पुस्तकाच्या आकारात होता. त्याच्या मुखपृष्ठावर 'सहवीर्यं करवावहै। तेजस्विनावधीतमस्तु' हा वैदिक मंत्र छापलेला होता. पुढे काही वर्षे ही प्रथा चालू होती.

१९१३ ते १९२५ या 'पत्रिके'च्या 'विविधज्ञानविस्ताराच्या सहप्रवासात तिचे संपादन कोण करीत होते, संपादकीय धोरण, उद्देश वगैरे काय होते हा एक कुतुहलाचा विषय होऊन बसला होता. पण द. वा. पोतदार आणि शं. ना. नवरे यांनी विचारपूस करून, तसेच जुने अंक चाळून या विषयाचा छडा लावला. उभयतांच्या इतिहासग्रंथावरून माहिती मिळते ती अशी-

पहिली नवलाची नि महत्त्वाची गोष्ट म्हणजे संपादक म्हणून कोणाचेच नाव छापले जात नसे . प्रकाशक आणि मुद्रक यांची नावे छापणे आवश्यक असावे म्हणून ती छापली जात होती . (आगरकर 'केसरी' चे पहिली सहासात वर्षे संपादक होते . त्यांचे नावही संपादक म्हणून 'केसरी' वर छापले जात नसे) . सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या गिरगावातील निवासी मार्च १९१३ मध्ये भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या ठरावानुसार बारा पृष्ठांची 'साहित्य पत्रिका' मासिक 'विविधज्ञानविस्ताराला' जोडून असल्याने सभासदांसाठी व इतरांसाठी काढण्याचे ठरल्यावर पहिला अंक ऑगस्ट १९१३ या महिन्यात निघाला व 'A Monthly Magazine of Marathi Literature for ladies and gentlemen (कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरिता)' असा इंग्रजी-मराठी मजकूर अंकाच्या पृष्ठभागी छापलेला असे . या अंकाची आणखी गंमत सांगायची म्हणजे पहिल्या पानावर 'मंगलाचरण' या मथळ्याखाली श्लोक आणि आर्यावृत्तात दा . ग . पाध्ये आणि गं . रा . मोगरे यांच्या भक्तिभावयुक्त कविता छापलेल्या आहेत . त्यामधील वेधक पंक्ती अशा-

**श्लोक**

जी बाल्यिं भक्तिरसपानपवित्र झाली।
तारुण्यि वीररसपुष्टि तया मिळाली।
पोषी प्रगल्भ अजि जे सकलां रसांला।
भाषा मराठि जननी नमितो तियेला ।।४।।
तत्सेवनार्थ महिम्न्यासहि वाढवाया।
तद्भक्तसत्कृतिस तेविंच गौरवाया।
ही 'पत्रिका' जनन घे , तिज साह्य द्याया।
या दाक्षिणात्य जन! ही समजा स्वकीया ।।५।। **(दा . ग . पाध्ये)**

**आर्या**

योग्य स्थान मिळेना साहित्याची करावया चर्चा।
म्हणूनी वाग्देवींची होय न व्हावी जशी तशी अर्चा ।।१।।
आपत्ति दूर व्हाया ती हा पहिलाच रोवुनि स्तंभ।
आज **महाजनि** हस्ते केला ह्या मंदिरास आरंभ ।।२।।
अल्पारंभाच्या ह्या होऊनि विस्तार फार वाढावे।
वैभव वाग्देवींचे , पूर्ण मनोरथहि आपले व्हावे ।।३।।
यास्तव सर्व मराठी भाषेचे भक्त हो! पुढे या . या।
ह्या मंदिरास घालू प्रेमाच्या खोल आपल्या पाया ।।४।। **(गं . रा . मोगरे)**

वरील दुसऱ्या आर्येत 'महाजनि' यांचा केलेला उल्लेख परिषदेचे पहिले अध्यक्ष विष्णू मोरेश्वर महाजनि यांचा आहे व तेच आरंभीच्या काळात 'पत्रिके' चे संपादकीय काम पाहत . त्यांचे सहीने या अंकात तीन पृष्ठांचा जो मजकूर प्रसिद्ध झाला त्यात 'साहित्याकरिता वाहिलेले' पत्र असा स्पष्ट उल्लेख असून 'नवीन पुस्तकांची माहिती देण्यात येईल' , अभिप्राय विवेचक राहतील , संस्थेतर्फे होणाऱ्या सभा-परिषदांची हकिकत देण्यात येईल , साहित्य संमेलनांना प्रोत्साहन दिले जाईल , ग्रंथकर्तृत्व , कवित्व , भाषासौष्ठव , अलंकारशास्त्र इ . विषयांवरील निबंधाचे स्वागत होईल' या शब्दांत स्वरूपवर्णन आहे . 'पत्रिके'चे हे स्वरूप जवळजवळ आजमितीला टिकून आहे .



अनुक्रमणिका

ना . गो . चापेकर यांनी १९२८ पासून ' पत्रिके ' ची धुरा खांद्यावर घेतल्यानंतर त्यांच्या प्रास्ताविकातील काही महत्त्वाची वाक्ये तिच्या स्वरूपावर आणखी प्रकाश टाकणारी आहेत . ' परिषदेचे सभासद जे साहित्यसेवक त्यांच्या विद्वत्तेचा हे मासिक म्हणजे एक थर्मामीटरच आहे . या गोष्टीनेच इतर मासिकाहून या परिषदेच्या मासिकाचे भिन्नत्व , स्थापित होते . मासिक खपेल कसे इकडे लक्ष न देता परिषदेची इभ्रत वाढविणारे ते कसे होईल इकडे लक्ष दिले पाहिजे .

महाजनि , दा . ग . पाध्ये आणि मोरमकर यांनी १९२५ पर्यंत संपादन- प्रकाशनाचे नेटाने कार्य केले म्हणून ' पत्रिका ' परिषदेच्या सभासदांना हवीशी वाटू लागली होती . पुढे चापेकर यांनी मुंबई कचेरी द्वारा पत्रिका चालवली असली तरी १९३३ पर्यंत तिचे संपादक-प्रकाशन पुण्यात राहून नेच करीत असत . त्यांच्या कारकिर्दीपासून पत्रिकेच्या अंकांना जे सातत्य नि दर्जा लाभत गेला तो आजपर्यंत टिकून आहे .

१९२८ ते १९९५ या ६७ वर्षात ' पत्रिकेला ' सव्वीस संपादक (त्यातले काही दोनदा , एक तीन वेळा ) लाभले नि त्यांनी आपापल्या आवडीनुसार , कुवतीनुसार संस्थेच्या उद्देशांनुसार नि घटनेत दिलेल्या अधिकाराच्या मर्यादेत तिचा दर्जा आणि उपयुक्तता राखण्याचा प्रामाणिक यत्न केला आहे .

अंकाच्या छपाईबाबत सांगायचे तर ' विविधज्ञानविस्तार ' कालखंडानंतर चापेकरांच्या कारकिर्दीपासून छपाई पुण्यातच होऊ लागली . आर्यसंस्कृती मुद्रणालय (सर्वाधिक काळ) , आर्यभूषण प्रेस , कल्पना मुद्रणालय (लाटकर) , भंडारी , माणूस मुद्रण , बालोद्यान प्रेस आणि स्मिता प्रिंटर्स (बापट) ही पत्रिकेची आजवरची मुख्य मुद्रणस्थळे होत . या सर्व मुद्रणालयांच्या कमीअधिक योगदानामुळे ' पत्रिके ' च्या वाङमयीन स्वरूपाला झळाळी लाभली यात शंका नाही . श्री . चिंतामणी लाटकर यांच्या कल्पना मुद्रणालयात छापलेल्या ' पत्रिके 'च्या ऑक्टोबर १९७५ च्या पोथीसदृश ज्ञानेश्वर विशेषांकास (संपादक भालचंद्र फडके) मुद्रण आणि मांडणी बद्दल ताम्रपटाच्या रूपाने केंद्र शासनाचा पुरस्कार लाभला .

परिषदेच्या हीरकमहोत्सवानिमित्त साहित्यपत्रिकेच्या अंकांतील सर्व प्रकारच्या लेखनाची (सप्टेंबर १९७१ अखेरची)सूची प्रसिद्ध झाली आहे . ती सूची विषयावर आहे . ती नुसती वरवर चाळली तरी तिच्यात प्रसिद्ध झालेल्या मजकुराची विविधता आणि दर्जा यांची कल्पना येते . भाषा , व्याकरण , व्युत्पत्ती , वाङमयसंशोधन , समीक्षा , ग्रंथपरीक्षणे , ललितलेख , कविता , वाङमयीन वाद इ . नाना विषयांवरचे लेखन पत्रिकेत सतत येत राहिले . अलीकडच्या वीसपंचवीस वर्षांत कवितांना रजा मिळाली असली तरी वार्षिक वाङमय समालोचन आणि प्रसंगपरत्वे निघालेले विशेषांक ही तिची खास कामगिरी ठरली आहे . १९७० ते १९७५ या पाचसहा वर्षातील वार्षिक वाङमय समालोचने संदर्भ म्हणून फार उपयोगाची ठरली .

१९५८ ते ६२ या काळात ' पत्रिके 'त प्रतिवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची विषयवार सूची मी देत असे . ती प्रथा पुढे तशीच चालू राहती तर अभ्यासकांची चांगली सोय झाली असती .

१९७१ ते १९९१ या वीस वर्षांत जे वाङमयीन स्वरूपाचे विशेषांक प्रकाशित झाले त्यांची नोंद येथे करणे उपयुक्त ठरेल . कालानुक्रमाने ते अंक असे- श्रीपाद कृष्ण कोल्हटकर (जुलै- सप्टेंबर १९७१) , न . चिं . केळकर (जुलै- सप्टेंबर १९७२) , नाट्याचार्य खाडिलकर (आक्टो- डिसेंबर ७२) , महर्षी शिंदे (एप्रिल-जून ७३) , भा . रा . तांबे (डिसेंबर ७३) , पु . ल .

अनुक्रमणिका

देशपांडे (जुलै- सप्टेंबर ७४), ज्ञानेश्वर (आक्टो ७५), शरश्चंद्र चटोपाध्याय (जुलै - सप्टे ७६), ग्रामीण साहित्य (जुलै-डिसें ८०), संशोधन (ऑक्टो- डिसें ८१), विनोद (जुलै-सप्टें ८२), वरेरकर सावरकर जोडअंक (जाने-जून ८३), आत्मचरित्र (दीपावली ८३), डॉ. केतकर (एप्रिल-जून ८४), वाङ्मयीन वाद व वादळे (दिवाळी ८४), गडकरी (जाने-जून ८५), साहित्यसंस्था (एप्रिल-जून ८६), श्री. म. माटे (जुलै-सप्टें ८६), गझल (दिवाळी ८६), दलित साहित्य (ऑक्टो- डिसें ८७), आत्मभानाचे दिवस- लेखकांची जडणघडण (दिवाळी १९८९), काव्य (आवडत्या कवितेची जन्मकथा- दिवाळी १९९०), साहित्य आस्वाद (जाने-मार्च ९१), कथा - कथेची जन्मकथा (ऑक्टो-डिसें ९१) विनोद विशेषांक दिवाळी १९९५). जन्मशताब्दी, स्मृती शताब्दी, साहित्य संमेलन, इ. प्रसंगाच्या निमित्ताने त्या त्या वेळच्या संपादकांनी मोठ्या तळमळीने नि जिद्दीने हे विशेषांक प्रकाशित केले आणि पर्यायाने वाङ्मयेतिहासाला नवनवी साधने उपलब्ध करून ठेवली.

'पत्रिके'च्या ऐंशी-ब्याऐंशी वर्षातील या अंकांमधून किती संशोधकांनी, लेखकांनी, समीक्षकांनी आपापले नवे लेखन सादर केले याची गणती करणे कठीण आहे. त्यासाठी 'पत्रिके'ची १९७१ मधील सूची १९९५ पर्यंत वाढवून परिषदेने सिद्ध करायला हवी आहे. १९७१ च्या काहीशा घाईत उरकून घेतलेल्या सूचीपेक्षा नवी सूची जाणकाराकडून तयार करून घेतली पाहिजे.

स्वातंत्र्योत्तरकाळातील केशवसुत म्हणून ज्यांना संबोधले जाते त्या कविवर्य वा.सी. मर्ढेकरांचे आरंभीचे म्हणजे १९४२ ते ४६ काळातले लेखन प्रथम 'पत्रिके'द्वारा वाचकांपुढे आलेले आहे. उदा. कर्ण, औक्षण आणि 'आर्टस अँड द मॅन'ची अनुवादित प्रकरणे (अनुवाद- रा. भि. जोशी) मर्ढेकरांच्या आणि कवितांच्या आणि 'रात्रीचा दिवस' या कादंबरीचा परामर्श मं. वि. राजाध्यक्ष आणि ना. ग. जोशी यांनी प्रथम विस्तृतपणे 'पत्रिके'तून घेतलेला आहे. 'आणखी काही कविता' चे सविस्तर परीक्षण रा. श्री. जोगांकडून झालेले आहे. मर्ढेकरांवरील मृत्युलेख संपादक या नात्याने वा. रा. ढवळे यांना लिहावा लागला. आणि तो त्यांनी मोठ्या जिव्हाळ्याने लिहिला. मर्ढेकरांचा इथे इतका निर्देश करण्याचे कारण असे की, 'पत्रिका' नेहमीच जुन्या-नव्या लेखनाचे स्वागत करीत आली, नव्हे त्यास उत्तेजन देत आली आहे हे लक्षात यावे.

साहित्य परिषदेचे सांप्रत महाराष्ट्रात आणि इतरत्र मिळून ५००० वर सभासद आहेत. त्यातले बहुसंख्य आजीव आहेत. या सर्वांना म.सा.पत्रिका आर्थिक झीज सोसून विनामूल्य पाठवली जात आहे. सभासदांव्यतिरिक्त काही स्वतंत्र ग्रंथालये आणि महाविद्यालयीन ग्रंथालये 'पत्रिके'ची वर्गणीदार आहेत. अंकांना उत्पन्न म्हणावे तर थोडेफार जाहिरातीचे होते. ५ रु, ३ रु, आणि २ रु, असे जाहिरात दर १९४० पूर्वी होते. अलिकडे चारसहा वर्षात जाहिरातीचे दर वाढविल्यामुळे बऱ्यापैकी आणि ह. ल. निपुणगे यांच्यासारख्यांनी लक्ष घातल्यामुळे वर्षाकाठी तिला २५-३० हजार रु. उत्पन्न मिळते. 'पत्रिका' हे परिषदेचे वाङ्मयीन त्रैमासिक मुखपृष्ठ असल्यामुळे संस्थेच्या कार्याची वृत्तांत सभासदांपर्यंत आपोआप पोहोचतो. वाङ्मयीन नियतकालिकांच्या इतिहासात तिचे निश्चितच आगळे स्थान आहे. साहित्य संस्थांच्या नियतकालिकात वयाच्या आणि दर्जाच्या दृष्टीने तिचा पहिला क्रमांक लागेल.

देशपांडे (जुलै- सप्टेंबर ७४), ज्ञानेश्वर (आक्टो ७५), शरश्चंद्र चटोपाध्याय (जुलै - सप्टे ७६), ग्रामीण साहित्य (जुलै-डिसें ८०), संशोधन (ऑक्टो- डिसें ८१), विनोद (जुलै-सप्टें ८२), वरेरकर सावरकर जोडअंक (जाने-जून ८३), आत्मचरित्र (दीपावली ८३), डॉ. केतकर (एप्रिल-जून ८४), वाङ्मयीन वाद व वादळे (दिवाळी ८४), गडकरी (जाने-जून ८५), साहित्यसंस्था (एप्रिल-जून ८६), श्री. म. माटे (जुलै-सप्टें ८६), गझल (दिवाळी ८६), दलित साहित्य (ऑक्टो- डिसें ८७), आत्मभानाचे दिवस- लेखकांची जडणघडण (दिवाळी १९८९), काव्य (आवडत्या कवितेची जन्मकथा- दिवाळी १९९०), साहित्य आस्वाद (जाने-मार्च ९१), कथा - कथेची जन्मकथा (ऑक्टो-डिसें ९१) विनोद विशेषांक दिवाळी १९९५). जन्मशताब्दी, स्मृती शताब्दी, साहित्य संमेलन, इ. प्रसंगाच्या निमित्ताने त्या त्या वेळच्या संपादकांनी मोठ्या तळमळीने नि जिद्दीने हे विशेषांक प्रकाशित केले आणि पर्यायाने वाङमयेतिहासाला नवनवी साधने उपलब्ध करून ठेवली.

'पत्रिके'च्या ऐंशी-ब्याऐंशी वर्षातील या अंकांमधून किती संशोधकांनी, लेखकांनी, समीक्षकांनी आपापले नवे लेखन सादर केले याची गणती करणे कठीण आहे. त्यासाठी 'पत्रिके'ची १९७१ मधील सूची १९९५ पर्यंत वाढवून परिषदेने सिद्ध करायला हवी आहे. १९७१ च्या काहीशा घाईत उरकून घेतलेल्या सूचीपेक्षा नवी सूची जाणकाराकडून तयार करून घेतली पाहिजे.

स्वातंत्र्योत्तरकाळातील केशवसुत म्हणून ज्यांना संवोधले जाते त्या कविवर्य बा.सी. मर्ढेकरांचे आरंभीचे म्हणजे १९४२ ते ४६ काळातले लेखन प्रथम 'पत्रिके'द्वारा वाचकांपुढे आलेले आहे. उदा. कर्ण, औक्षण आणि 'आर्टस अँड द मॅन'ची अनुवादित प्रकरणे (अनुवाद- रा. भि. जोशी) मर्ढेकरांच्या आणि कवितांच्या आणि 'रात्रीचा दिवस' या कादंबरीचा परामर्श मं. वि. राजाध्यक्ष आणि ना. ग. जोशी यांनी प्रथम विस्तृतपणे 'पत्रिके'तून घेतलेला आहे. 'आणखी काही कविता' चे सविस्तर परीक्षण रा. श्री. जोगांकडून झालेले आहे. मर्ढेकरांवरील मृत्युलेख संपादक या नात्याने वा. रा. ढवळे यांना लिहावा लागला. आणि तो त्यांनी मोठ्या जिव्हाळ्याने लिहिला. मर्ढेकरांचा इथे इतका निर्देश करण्याचे कारण असे की, 'पत्रिका' नेहमीच जुन्या-नव्या लेखनाचे स्वागत करीत आली, नव्हे त्यास उत्तेजन देत आली आहे हे लक्षात यावे.

साहित्य परिषदेचे सांप्रत महाराष्ट्रात आणि इतरत्र मिळून ५००० वर सभासद आहेत. त्यातले वहुसंख्य आजीव आहेत. या सर्वांना म.सा.पत्रिका आर्थिक झीज सोसून विनामूल्य पाठवली जात आहे. सभासदांव्यतिरिक्त काही स्वतंत्र ग्रंथालये आणि महाविद्यालयीन ग्रंथालये 'पत्रिके'ची वर्गणीदार आहेत. अंकांना उत्पन्न म्हणावे तर थोडेफार जाहिरातीचे होते. ५ रु, ३ रु, आणि २ रु, असे जाहिरात दर १९४० पूर्वी होते. अलिकडे चारसहा वर्षात जाहिरातीचे दर वाढविल्यामुळे वऱ्यापैकी आणि ह. ल. निपुणगे यांच्यासारख्यांनी लक्ष घातल्यामुळे वर्षाकाठी तिला २५-३० हजार रु. उत्पन्न मिळते. 'पत्रिका' हे परिषदेचे वाङमयीन त्रैमासिक मुखपृष्ठ असल्यामुळे संस्थेच्या कार्याची वृत्तांत सभासदांपर्यंत आपोआप पोहोचतो. वाङमयीन नियतकालिकांच्या इतिहासात तिचे निश्चितच आगळे स्थान आहे. साहित्य संस्थांच्या नियतकालिकात वयाच्या आणि दर्जाच्या दृष्टीने तिचा पहिला क्रमांक लागेल.

## आनंद साधले

ज्येष्ठ साहित्यिक आनंद साधले (वय ७५) यांचे हैद्राबाद येथे ४ एप्रिल १९९६ रोजी हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले.

आपल्या शैलीदार लिखाणाने मराठी वाचकांना संस्कृत साहित्याची ओळख करून देणारे आनंद साधले त्यांचा जन्म पाच जुलै १९२० रोजी सावंतवाडी जिल्ह्यातील साळगाव येथे झाला. सावंतवाडीत शालेय शिक्षण झाल्यानंतर मुंबईच्या रुईया व खालसा कॉलेजात त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण घेतले. बी.ए.ची पदवी घेतल्यानंतर १९४० ते १९७५ अशी ३५ वर्षे त्यांनी सरकारी नोकरी केली. १९३५ मध्ये त्यांची हिंदी अनुवादित कथा 'मौज 'मध्ये प्रकाशित झाली. हा त्यांच्या लेखनाचा श्रीगणेशा. १९३९ मध्ये त्यांनी 'लढाई संपल्यावर' ही पहिली कादंबरी लिहिली; पण ती सहा वर्षांनी १९४५ मध्ये प्रसिद्ध झाली.

संस्कृत साहित्यावर आधारित कथा, कादंबऱ्या, नाटके, गंभीर प्रबंध, आत्मवृत्तपर बालसाहित्य, व्यक्तिरेखा असे विविध विषयांवरील विपुल लेखन श्री. साधले यांनी केले. 'अजून यौवनात मी', 'अभिसार', 'अमृतमेघ', 'अशीच एक रात्र होती', 'असेन मी मातीची', 'आनंदध्वजाच्या कथा', इसापनीती : १ व २, 'उर्वशी', 'कुमारसंभव', 'गीत-गोविंद', 'चाणक्य', 'जानकीहरण', दहा उपनिषदे : १ व २, 'धन्य अंजनीचा सुत', पंचतंत्र : १ व २, 'प्रणयिनी', 'बिल्वदल', 'महापुरुष' (कादंबरी), 'महापुरुष' (नाटक), 'महाभारतातील मानदंड', 'मी राधा मीच उमा', 'रुक्मिणी स्वयंवर', 'वासवदत्ता', 'शकुंतला', 'सुगंधाचा पैस', हितोपदेश : १ व २ आदी त्यांची सुमारे ५० पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या 'हा जय नावाचा इतिहास आहे' व 'मातीची चूल' (आत्मचरित्र) या पुस्तकांनी मराठी साहित्य क्षेत्रात खळबळ उडविली होती.

या दोन्ही पुस्तकांनी राज्य सरकारची पारितोषिके पटकावली होती. 'हा जय नावाचा इतिहास आहे 'ला १९६६ मध्ये, 'मातीची चूल 'ला १९७२ मध्ये, तर 'परि हरि हा ब्रह्मचारी' या लेखसंग्रहासाठी १९७६ मध्ये त्यांना राज्य शासनाने पारितोषिक देऊन गौरविले होते. त्यानंतर पारितोषिकासाठी पुस्तके पाठविणे त्यांनी स्वत:हून बंद केले. १९३९ ते १९७६ पर्यंत त्यांचे मुंबईत वास्तव्य होते. १९७६ मध्ये ते हैदराबादला राहावयास गेले.

'महाराष्ट्र रामायण' हे त्यांचे खंडकाव्य वाचून संस्कृतचे गाढे अभ्यासक डॉ. रा. ना. दांडेकर यांनी त्यांना 'महाकवी' म्हणून गौरविले होते. वयाला सत्तर वर्षे पूर्ण झाल्याबद्दल दोन मे, १९९० रोजी पुण्यात त्यांचा सत्कार करण्यात आला होता. 'शृंगार कथाकार' असा साधले यांचा उल्लेख केला जातो. त्यासंदर्भात बोलताना, "स्त्री हे विलोभनीय सौंदर्य आहे. मी संस्कृत साहित्याचा भोक्ता आहे. संस्कृत साहित्य शृंगाररसाशी संबंधित आहे, म्हणून माझ्या साहित्यात शृंगार येणे अपरिहार्य आहे. त्यात गैर काहीही नाही. कारण स्त्री पुरुष परस्परआकर्षण ही परमश्रेष्ठ भावना आहे," अशी भूमिका त्यांनी मांडली होती.

श्री. ना. पेंडसे

# दोन प्रश्न : उत्तर नसलेले ?

(२७ मे १९९६ रोजी सत्काराला उत्तर देताना श्री. ना. पेंडसे यांनी केलेले भाषण.)

माननीय अध्यक्ष आणि मित्रहो, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे ह्या संस्थेचा सत्कार स्वीकारताना मला फार आनंद होत आहे. माझ्या आधीच्या मानकऱ्यांची नावे पाहिली तरी हा सन्मान किती प्रतिष्ठेचा आहे त्याची कल्पना येते.

माझी पस्तिशी ओलांडेपर्यंत मी कादंबरीकार होणार आहे ह्याचा वाससुद्धा मला नव्हता. एवढेच काय 'एल्गार' ही माझी पहिली कादंबरी लिहिली तेव्हा ती दीर्घकथा नसून कादंबरी आहे हे इतरांनी मला सांगावे लागले! एका अर्थाने मला ही आदर्श अवस्था वाटते. शेवटी लघुकथा, कादंबरी, ललित गद्य ह्यांची लक्षण वेगळी असली तरी तिन्ही प्रकार माणसाच्या मनाचा शोध घेत असतात. अंतिमतः तोच त्यांचा महत्त्वाचा निकष.

गेल्या पन्नास वर्षांच्या साहित्य उद्योगात मी जीवनाचा नाना प्रकारे शोध घेत आलो. चिंतन करीत आलो. उत्तर न सापडलेले प्रश्न माझ्यासमोर आले. अजूनही मी जीवनाचा शोध घेतच आहे. हा शोध म्हणजे तळ नसलेला डोह आहे. म्हणूनच महाभारत काळापासून माणसाने शोध घेऊनही तो संपलेला नाही, संपणार नाही.

'उत्तर नसलेले प्रश्न' असे म्हटले त्यापैकीच एक प्रश्न आपल्या पुढे ठेवीत आहे. कोणा विचारवंताला उत्तर सापडले तर मलाच काय सगळ्या समाजाला ते हवे आहे.

तो प्रश्न म्हणजे इंग्रजी माध्यमाचा वाढता प्रसार आणि त्यामुळे मराठी भाषेची होणारी आबाळ. माझ्यापुढे पहिला प्रश्न येतो तो असा की इंग्रजी माध्यमामुळे मातृभाषेची खरोखरच आबाळ होते का? की आपण तो सोईचा गैरसमज करून घेतला आहे? कारण दाक्षिणात्य राज्ये आणि बंगाल ह्या ठिकाणी इंग्रजीचा प्रसार कितीतरी पटीने अधिक आहे. तेथील टॅक्सी ड्रायव्हरसुद्धा इंग्रजी बोलतात. असे असून त्या सर्वांचे साहित्य आपल्यापेक्षा उजवे असे आपण म्हणतो. राष्ट्रीय पातळीवरील साहित्यातील पारितोषिके हेच सांगतात. हा गुंता मला सुटला नाही. खरोखरच ह्या दोन विषयांचा संबंध आहे की आपण बादरायण संबंध लावला आहे?

हा विचार मला अस्वस्थ करतो तो पुढच्या पिढ्यांकरिता. आपण सर्व इंग्रजी भाषेवर पोसलेले. व्यासपीठे गाजवतो ती इंग्रजी भाषेने - तिनेच आपल्याला ज्ञानसंपन्न केले. त्यामुळे सारे श्रेष्ठ ज्ञान - विज्ञान इंग्रजी भाषेत बंदिस्त झालेले. त्यालाच आमच्या पुढील पिढ्या वंचित होणार असतील तर त्यांनी जगावे कसे हा प्रश्न निर्माण होईल. जग आंकुचित होऊन आता गावपातळीवर येत आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्रजी भाषेची घोडदौड सुरू झाली. चीन, जपान, रशिया ह्यासारख्या राष्ट्रांनासुद्धा त्यांची

अनुक्रमणिका

दखल घ्यावी लागत आहे . आम्ही मात्र इंग्रजी माध्यमामुळे चिंतेत पडलो आहे . खुद्द महाराष्ट्राच्या राजधानीत , मुंबईत इंग्रजीशिवाय निभाव लागत नाही . त्यापायी मराठी माणूस मागे पडत आहे . आमच्या मुलांना उत्तम इंग्रजी लिहिता बोलता आलेच पाहिजे असे वास्तवाचे आव्हान आहे . त्याला आमच्याकडे काय उत्तर आहे ? माझ्याकडे नाही . म्हणून तुम्हाला विचारतो आहे .

इंग्रजी भाषेप्रमाणेच व्यासपीठे गाजवण्याचा आणखी एक विषय म्हणजे मराठी साहित्यात काही कस नाही . हा विचार बोलताना समोर इतर भारतीय भाषा असतात . माझा अनुभव वेगळा आहे . काही वर्षांपूर्वी एका समारंभाकरिता दिल्लीला गेलो असता योगायोगाने शेजारी डॉ . हरेकृष्ण मेहताब बसले होते . एके काळी ते महाराष्ट्राचे राज्यपाल होते . ते मराठी लघुकथा इतर भारतीय भाषांच्या तुलनेने किती पुढे आहे त्याचे वर्णन करीत होते . त्यांना शब्द अपुरे पडत होते . लांब कशाला जावे ? ह्याच पुण्यनगरीतील एक श्रेष्ठ लघुकथालेखक श्री . अरविंद गोखले ह्यांची एक कथा जागतिक स्पर्धेत पहिली आली . आपण नतद्रष्ट असे की त्यांचे साधे अभिनंदनही केले नाही . श्री . गोखले ह्यांनीच व्यथित स्वरात मला सांगितले . कोणत्याही भारतीय भाषेत मानाने बसतील अशा कादंबऱ्या मराठीत गेल्या पन्नास वर्षांत लिहिल्या गेल्या . त्यांची तर मी यादीच देऊ शकेन . श्री . शिवाजीराव सावंतांना ' मृत्युंजय ' करिता सरस्वती सन्मान मिळाला . आपण त्यांची कितीशी दखल घेतली ? केरळच्या ज्ञानपीठ विजेत्या कादंबरीकाराची मुंबईतील केरळीयांनी मिरवणूक काढली .

एका तमिळ समीक्षकाने एका मराठी कादंबरीला भारतातील दहा श्रेष्ठ कादंबऱ्यांपैकी एक म्हटले . आमचे समीक्षक त्यांची दखल न घेता मराठीतीलच दोन कादंबऱ्या तागडीत घालून किलो वजनावर कोणती कादंबरी श्रेष्ठ ते ठरवीत आहेत . असले भाकड उद्योग करण्यापेक्षा समीक्षकांपुढे किती तरी मोठी आव्हाने ठेवली आहेत . इंग्रजी नको ; मग त्यांचे ज्ञान , साहित्य मराठीत भाषांतरीत करा . पण आम्हाला फक्त व्यासपीठे गाजवायची आहेत . भाषांतरांना वेळ नाही . कोणी केलीच तर तागडी समीक्षक त्या भाषांतरांकडे पाह्यला तयार नाहीत . हरिभाऊ वाचले जात नाहीत , शरदबाबू मात्र देशभर वाचले जातात . असे का ? त्याचा शोध समीक्षकांनी घ्यायचा नाही तर कोणी घ्यायचा ? प्रा . सुधीर रसाळ म्हणतात , समीक्षकांना आव्हान देईल असं साहित्यच निर्माण होत नाही . मी त्यांच्याशी सहमत आहे , पण पुढचा कमप्राप्त प्रश्न - असे का होत आहे ? आजार नेमका कोठे आहे ? कोणाही समीक्षकाने हा प्रश्न उपस्थित केल्याचे माझ्या वाचनात नाही . समीक्षक हा रत्नपारख्यासारखा असतो . त्याच्या विश्लेषणाने उद्याच्या कादंबरीकारांना मार्गदर्शन करणे त्याचे काम आहे .

माझ्यापुरता मी ह्या प्रश्नाचा विचार केला . मला जाणवले ते असे की आजचा जमाना झटपटचा आहे . तिथे कादंबरीला स्थान नाही . कादंबरी म्हणजे सहा महिने , वर्ष लेखक गुंतून पडतो . चिंतन , कष्ट ही कादंबरीची पहिली मागणी असते . मामला अक्रोड वृक्षासारखा असतो . कित्येक वेळा कादंबरी पुन्हा पुन्हा लिहावी लागते . तेव्हा कोठे मनासारखी उतरते किंवा मनासारखी नसली तरी कादंबरीकाराने आपली कमाल क्षमता पणास लावलेली असते .

आजच्या जमान्यात लेखनाला हा व्यवहार परवडत नाही . लघुकथा कशी

छाटछूट . आज लिहिली , उद्या प्रसिद्ध झाली , पुढच्या दिवशी चेक आला . लेखक मोकळा झाला ! किती छान ! प्रसिद्धी , पैसे . सारं महिन्याभरात .

अर्थात कादंवरीत कस नाही त्याला एवढेच कारण नसेलही . विचारवंतांनी , समीक्षकांनी त्याचा शोध घेतला पाहिजे . पण भाषातरांना समीक्षक मिळत नाहीत . ही डोकेदुखी कोण ओढवून घेतो ? मराठीतील ललित साहित्याची आज शोचनीय अवस्था झाली आहे . त्याला झटपटचा जमाना कारण असावा . कादंबरीकार , समीक्षक दोघेही एनकॅशमेंटच्या मागे लागले असावेत .

कोणत्याही भारतीय भाषेत मानाने बसतील अशा कादंबऱ्या गेल्या पन्नास वर्षात आपल्या कादंवरीकारांनी लिहिल्या असे म्हटले , पण भारतीय संदर्भात हा फार छोटा संदर्भ आहे . आपल्यापुढे ' जागतिक संदर्भ ' हवा . त्यामुळे मराठी कादंवरी नगण्य ठरेल . हरकत नाही . कादंवरीकारांच्या डोक्यात हवा तरी जाणार नाही . आज शोचनीय परिस्थिती अशी आहे की एक कादंवरी लिहिली जाते . त्याला कोणी तरी ' महान , श्रेष्ठ ' ही विशेषणे वहाल करतो . त्याकरिता यंत्रणा उभी केली जाते आणि कादंवरीकाराचे जमिनीवरील पाय सुटतात . असा प्रकार दलित साहित्याच्या बावतीत आपण केला . दलित साहित्य हा प्रकार भारतीय भाषांत सर्वप्रथम मराठीत झाला असावा . तो समर्थ होता . तेजस्वी होता . दाहक होता . एका ज्वालामुखीला जाग आली होती . पण प्रमाणावाहेर प्रशंसा करून आम्ही दलित लेखकांची दिशाभूल केली . चरित्रांनाच कादंवरी म्हटले . दलित साहित्याचे जे स्वागत झाले ते व्हायलाच हवे होते ; पण साहित्य म्हणजे सवर्णांना शिव्या असे सोपे समीकरण लेखकांनी मानले ते आपल्या अवास्तव प्रशंसेमुळे . केवळ चौदाशे पानांची कादंवरी लिहिली म्हणून कादंवरीकाराला महान ठरवून आपण ' महाराष्ट्राचा डास्टोव्हस्की ' करतो . इथे ' थोर ' व्हायला काही कष्टच पडत नाही . महान , थोर ही विशेषणे इतकी स्वस्त होतात तेव्हा त्या समाजाला काही भवितव्य राहत नाही . पाऊणशे वर्षांपूर्वी आपल्यातील एक महान व्यक्तीने ' मराठी कादंवरी ' ह्या विषयावर निबंध लिहिला . हरिभाऊ सोडले तर इतर कादंवरीकार त्याच्या जमेतच नव्हते ; पण तुलनेला डोस्टोव्हस्की काढताच हरिभाऊंच्या कादंवऱ्या त्याला एरंडाच्या झाडासारख्या वाटल्या . आपले निकष इतके उंच हवेत . समोर गौरीशंकरचे शिखर हवे . त्यामुळे निदान छोट्या यशाने कादंबरीकार हुरळून जाणार नाही .

ह्याच महाराष्ट्रात अशी शिखरे नजिकच्या भूतकाळात होती . एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध आणि विसाव्या शतकाचा आरंभ त्या काळाकडे नुसती नजर टाकली तरी डोंगराएवढी माणसे दिसतात . डॉ . भांडारकर , फुले , टिळक , राजवाडे आणि नंतरच्या काळात आपल्यात असलेले र . धों . कर्वे . आणखी कितीतरी नावे घेता येतील . आयुष्यभर ही माणसे पछाडलेली राहिली . थोर , महान असली विशेषणे अशा व्यक्तींकरिता आहेत . र . धों . कर्वे तर असे दुर्दैवी त्यांना ही विशेषणे मिळालीही नाहीत . वास्तविक मरणोत्तर ' भारतरत्न ' करावे अशा योग्यतेचा हा माणूस . आज त्यांचे नावही नव्या पिढीला माहीत नसेल . मला एवढेच म्हणायचे आहे की हातून काही घडले नाही तरी चालेल ; पण आपण आपले निकष खाली आणू नयेत . आपली स्वप्ने उत्तुंग असू देत . कोणी तरी महान कादंबरीकार जन्माला येईल . त्याला आपण

एवढा तरी वारसा द्यायला हवा. २

निकष उत्तुंग हवेत असं म्हटलं तेव्हा साठ वर्षांपूर्वी वाचलेल्या एका ग्रंथाचं स्मरण झालं. तो ग्रंथ म्हणजे श्री. ना. बनहट्टी ह्यांचा भारतीयांचा ज्ञानोपासना. एके काळी प्राचीन काळी आपल्याच पूर्वजांनी जगाच्या ज्ञानात केवढी मौलिक भर टाकली ह्याचे वर्णन त्या ग्रंथात आहे. आज कोणत्याही ज्ञानाच्या शाखेत थक्क करणारी भर टाकायची ती पाश्चात्यांनी अशी परिस्थिती आहे. प्राचीन काळात नेमकी उलटी परिस्थिती होती. आपले तपस्वी पूर्वज अशी भर टाकीत होते. ज्ञानाविषयी त्यांची निष्ठा इतकी प्रखर की शाई, कागद, छापखाने नसताना आपले ज्ञान पुढच्या पिढ्यांना मिळावे म्हणून त्यांनी मुखोद्गत करून आपल्या संतानाच्या स्वाधीन केले. ह्या प्रक्रियेला साहित्यही अपवाद नव्हते. एवढा मोलाचा वारसा मिळाला. त्याचे आपण काय केले?

अपार चिंतन, अपार कष्ट आणि उत्तुंग स्वप्नं ही आज आपली गरज आहे.

मित्रहो, जगण्यातून निर्माण झालेल्या माझ्या ज्या अनेक व्यथा आहेत त्यापैकी दोनांचा उच्चार केला. मी नेहमी म्हणत असतो की आपण फार बोलतो. मीच त्याचा पुरावा बनू नये म्हणून इथेच थांबतो.

धन्यवाद.

(श्री. ना. पेंडसे, १०, तुकाराम निकेतन, बादल-बिजली जवळ,
माहीम, मुंबई १६)

०००









# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## ग्रंथ पारितोषिके व सन्मान पुरस्कार

## माहिती व सूचना

म.सा. परिषदेतर्फे विविध प्रकारची ग्रंथ - पारितोषिके सातत्याने दिली जातात. ठरलेल्या वेळी इतक्या प्रकारची परितोषिके देणारी म. सा. परिषद ही एकमेव साहित्यसंस्था आहे. अनेक साहित्यप्रेमी रसिकांनी परिषदेकडे सुपूर्त केलेल्या रकमांच्या व्याजातून ही पारितोषिके देण्यात येतात. ललित व ललितेतर अशा बहुतेक सर्व वाङ्मयप्रकारांसाठी ही पारितोषिके असून 'म.सा. परिषद पारितोषिक' मिळणे ही लेखकांच्या व प्रकाशकांच्या दृष्टीने गौरवाची बाब मानली जाते. मराठीत उत्कृष्ट स्वरूपाची ग्रंथनिर्मिती व्हावी व लेखकांना प्रोत्साहन मिळावे हा या पारितोषिकांचा मुख्य हेतू आहे. उत्कृष्ट प्रकाशन, उत्कृष्ट संपादित ग्रंथ, उत्कृष्ट अनुवाद यांसाठीही पारितोषिके आहेत. काही पारितोषिके लेखकांप्रमाणे प्रकाशकांनाही देण्यात येतात.

दरवर्षी १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीत प्रकाशित झालेली पुस्तके विचारात घेतली जातात. (उदा. १ जानेवारी १९९६ ते ३१ डिसेंबर १९९६ या मध्ये प्रकाशित पुस्तकांचा विचार १९९७ मधील पारितोषिकांसाठी केला जातो.)

पुढे पारितोषिकांच्या संदर्भात लेखक व प्रकाशक यांच्यासाठी तपशीलवार सूचना दिल्या आहेत. तसेच प्रत्येक पारितोषिकाची आवश्यक ती माहितीही दिली आहे. परिषदेच्या काही खास सन्मान पारितोषिकांचा समावेशही या माहितीपत्रकात केला आहे. लेखकांनी / प्रकाशकांनी आपल्या नव्या पुस्तकांच्या प्रत्येकी दोन प्रती कार्यवाह, म. सा. परिषद यांच्याकडे पाठवून सहकार्य करावे ही विनंती.

**लेखक - प्रकाशकांना**

### विशेष सूचना

१) सर्व ग्रंथ पारितोषिके पहिल्या आवृत्तीसाठी आहेत.

२) विशिष्ट पारितोषिकासाठी योग्य पुस्तक न आढळल्यास त्यावर्षी ते पारितोषिक दिले जात नाही.

३) सर्व पारितोषिकांसंबंधीचे निर्णय त्या त्या वेळी वृत्तपत्रांतून जाहीर केले जातात. पारितोषिक विजेत्या लेखकास व प्रकाशकास पत्राने त्याबद्दल कळविण्यात येते.

४) लेखकांनी आणि प्रकाशकांनी संबंधित पुस्तकात आपले नाव व तपशीलवार पत्ता नोंदविण्याची काळजी घ्यावी. तसेच पुस्तक प्रकाशनाची तारीख व पहिली आवृत्ती असल्याचा निर्देशही पुस्तकात अवश्य करावा.

५) एका पारितोषिकासाठी एका व्यक्तीची एकदाच निवड होते. तेच पारितोषिक त्या व्यक्तीस पुन्हा दिले जात नाही. (ही अट प्रकाशकांना लागू नाही.)

६) म .सा . परिषदेच्या ग्रंथ पारिंतोषिकांसाठी लेखकास अगर प्रकाशकास कसलेही आवेदन पत्र भरावे लागत नाही .

७) लेखकांनी / प्रकाशकांनी आपल्या नवीन पुस्तकांच्या दोन प्रती परिषदेकडे अवश्य पाठवाव्या . ही पुस्तके पारितोषिक समितीच्या निर्णयानंतर परिषदेच्या ग्रंथालयात जमा केली जातात .

८) पारितोषिक स्वीकारण्यासाठी उपस्थित राहणाऱ्या लेखकास / प्रकाशकास वेगळा प्रवासखर्च किंवा निवासखर्च देणे शक्य होत नाही . आवश्यकतेनुसार पारितोषिक विजेत्या व्यक्तींची परिषदेच्या अतिथी निवासात निःशुल्क निवासव्यवस्था करण्यात येते . यासाठी संबंधितांनी परिषदेच्या कार्यवाहांना तसे लेखी कळवावे .

पत्रव्यवहाराचा पत्ता :
कार्यवाह (ग्रंथपारितोषिक विभाग)
महाराष्ट्र साहित्य परिषद ,
टिळक रस्ता , पुणे - ४११ ०३०

## विविध प्रकारची पारितोषिके

### अ) विशेष पारितोषिके

**१) म .सा . परिषद सन्मान पारितोषिक** (रु . ५ ,०००/-) व स्मृतिचिन्ह दीर्घकाळ दर्जेदार लेखन केलेल्या ज्येष्ठ ग्रंथकारास परिषदेच्या वर्धापन समारंभात हे पारितोषिक प्रदान करण्यात येते .

**२) कै . प्रा . भीमराव कुलकर्णी पुरस्कार** (रु . १ ,०००/-)
साहित्यसंस्था , वाङ्मयमंडळे इत्यादी क्षेत्रात दीर्घकाळ कार्य करणाऱ्या ज्येष्ठ कार्यकर्त्यास वर्धापन-समारंभात हा पुरस्कार देण्यात येतो .

**३) कै. प्रा . बाबूराव शिरोळे स्मृती पारितोषिक** (रु . २ ,५००)
बालसाहित्याच्या क्षेत्रात दीर्घ काळ दर्जेदार लेखन केलेल्या लेखकास प्रतिवर्षी १४ जुलै रोजी , प्रा . बाबूराव शिरोळे यांच्या स्मृतिदिनी समारंभपूर्वक हे पारितोषिक दिले जाते .

**४) कै . वि . मो . महाजनी स्मृती पुरस्कार** (रु . ७५१/-) कोश , संदर्भग्रंथ इत्यादी लक्षणीय कार्य केलेल्या लेखकास वर्धापन समारंभात दर दोन वर्षांतून एकदा हा पुरस्कार देण्यात येतो .

**५) अभिजात मराठी पारितोषिक** (रु . ५ ,०००/-) 'सामाजिक शास्त्रे' या अंतर्गत राज्यशास्त्र , इतिहास , अर्थशास्त्र , समाजशास्त्र , मानसशास्त्र , मानववंशशास्त्र , नागरिकशास्त्र इत्यादी ज्ञानशाखांमध्ये मराठीत स्वतंत्रपणे लिहिलेल्या ग्रंथासाठी दर दोन वर्षांतून एकदा वर्धापन समारंभात हे पारितोषिक देण्यात येते . आधीच्या दोन वर्षात प्रकाशित झालेल्या संबंधित विषयांवरील ग्रंथामधून निवड करण्यात येते .

**६) प्रा . रा . श्री . जोग समीक्षा पारितोषिक**
प्रतिवर्षी मराठीतील उत्कृष्ट समीक्षा-ग्रंथासाठी हे पारितोषिक आहे . ग्रंथाच्या

लेखकासाठी रु. ३,५००/- प्रकाशकासाठी रु. ७५०/- असे या पारितोषिकाचे स्वरूप असून आधीच्या दोन वर्षांतील समीक्षाग्रंथ विचारात घेतले जातात. २१ फेब्रुवारीच्या सुमारास पारितोषिकाचा निर्णय जाहीर केला जातो आणि लेखक - प्रकाशकांना पारितोषिके पाठविण्यात येतात.

**(आ) उत्कृष्ट दिवाळी अंकांसाठी पारितोषिके**

परिषदेतर्फे प्रतिवर्षी उत्कृष्ट दिवाळी अंकांना खालीलप्रमाणे पारितोषिके दिली जातात:

१) 'रत्नाकर' मासिकाचे संपादक
अ. स. गोखले स्मृती पारितोषिक रु. १००१/-

२) 'मासिक मनोरंजन' कार
का. र. मित्र स्मृती पारितोषिक रु. १०१/-

३) 'विविधज्ञानविस्तार' कर्ते
रावसाहेब मोरमकर स्मृती - पारितोषिक रु. १०१/-

४) 'किर्लोस्कर' चे आद्य संपादक
शं. वा. किर्लोस्कर स्मृती पारितोषिक रु. २००/-

दिवाळी अंकांची पारितोषिके जाहीर झाल्यावर संबंधितांना पाठविली जातात. [दिवाळी अंक प्रकाशित होताच संपादकांनी / प्रकाशकांनी त्याच्या दोन प्रती त्वरित पाठवाव्या. सामान्यतः जानेवारीमध्ये दिवाळी अंकांबद्दलची पारितोषिके जाहीर करण्यात येतात.]

**(इ) प्रतिवर्षी विशिष्ट दिनांकास समारंभपूर्वक देण्यात येणारी पारितोषिके**

१) १९ जानेवारी : कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक : विनोदी वाङ्मय या प्रकारातील पुस्तकासाठी लेखकास रु. १२००/- व प्रकाशकास रु. ९००/-

२) २७ फेब्रुवारी : कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक: उत्कृष्ट काव्यसंग्रहासाठी कवीस रु. १२००/- व प्रकाशकास रु. ९००/-

३) ९ मार्च : महाराष्ट्रकवी यशवंत पारितोषिक रु. १००१/- उत्कृष्ट काव्यसंग्रहाच्या कवीस.

४) २९ मार्च : प्रा. शं. ना. जोशी स्मृती पारितोषिक रु. ५०००/- ऐतिहासिक, सामाजिक, सांस्कृतिक इ. विषयावरील दर्जेदार वैचारिक ग्रंथासाठी लेखकास.

५) १९ एप्रिल : स. ह. मोडक पारितोषिक रु. १५००/- उत्कृष्ट अनुवादित ग्रंथास अगर दीर्घ काळ दर्जेदार अनुवादकार्य केलेल्या अनुवादकास.

६) २९ जून : दि. वा. मोकाशी स्मृती पारितोषिक रु. १०००/- कथा, कादंबरी, देशांतर्गत प्रवासवर्णन या प्रकारातील [आलटून - पालटून एका] प्रथम प्रकाशित पुस्तकाच्या लेखकासाठी हे पारितोषिक असून आधीच्या तीन वर्षांतील त्या त्या वाङ्मयप्रकारातील पुस्तकांमधून निवड करण्यात येते.

७) २२ जुलै : ग. ल. ठोकळ स्मृती पारितोषिक रु. १००१/- 'ग्रामीण साहित्य' या प्रकारात मोडणाऱ्या आधीच्या वर्षातील उत्कृष्ट पुस्तकाच्या लेखकास.

८) ९ ऑगस्ट : शंकर पाटील स्मृती पारितोषिक (रु. २०००/-)

सर्वोत्कृष्ट कथासंग्रहासाठी किंवा कादंबरीसाठी ( आलटून - पालटून ) लेखकास देण्यात येणारे पारितोषिक .

९ ) ६ ऑक्टोबर : दत्तो वामन पोतदार स्मृती पारितोषिक (रु . २५१) इतिहासविषयक वैचारिक किंवा ललित ग्रंथाच्या लेखकास .

१० )९ ऑक्टोबर : विद्याधर पुंडलिक स्मृती पारितोषिक (रु . १०००/-) एकांकिका किंवा व्यक्तिचित्र या प्रकारातील उत्कृष्ट पुस्तकाच्या लेखकास . [आधीच्या दोन वर्षातील एकांकिका संग्रह किंवा व्यक्तिचित्रसंग्रह विचारात घेतले जातात . दोन्ही वाङ्मयप्रकार आलटून पालटून घेण्यात येतात .]

**(इ) परिषदेच्या वर्धापनदिनाच्या वार्षिक पारितोषिक वितरण समारंभात देण्यात येणारी पारितोषिके**

| पारितोषिकाचे नाव वाङ्मय प्रकार | रक्कम |
|---|---|
| १ ) ह . स . गोखले पारितोषिक (कवितासंग्रह) | रु . ३००/- |
| २ ) आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथासंग्रह) | रु . १०००/- |
| ३ ) नी . स . गोखले पारितोषिक (कथासंग्रह) | रु . ३००/- |
| ४ ) ह . ना . आपटे पारितोषिक (कादंबरी) | रु . १००/- |
| ५ ) वा . म . जोशी पारितोषिक (कादंबरी) | रु . १०००/- |
| ६ ) ह . श्री . शेणोलीकर पारितोषिक(समीक्षा) | रु . ५००/- |
| ७ ) रा . ना . नातू पारितोषिक (इतिहासविषयक) [ ऐतिहासिक कादंबरी , नाटक , चरित्र किंवा संशोधन इ . ] | रु . ७५०/ |
| ८ ) तुळशीराम बाघ पारितोषिक (संतवाङ्मयविषयक) | रु . २५०/- |
| ९ ) वासुदेव धोंडो आणि भागीरथीबाई दीक्षित पारितोषिक (धार्मिक वाङ्मय) | रु . १०००/- |
| १० ) विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमार वाङ्मय) | रु . १०१/- |
| ११ ) सुशील प्रधान पारितोषिक (बालवाङ्मय) | रु . २००/- |
| १२ ) अ . स . गोखले पारितोषिक (उत्कृष्ट प्रकाशनासाठी) | रु . ३००/- |
| १३ ) गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक (संपादित ग्रंथ) | रु . १००/- |
| १४ ) म . वि . गोखले पारितोषिक (नाट्यसमीक्षा / नाटक) | रु . ७५०/- |
| १५ ) विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक(ललितेतर वैचारिक) | रु . १५०/- |
| १६ ) ना . गो . चापेकर पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | रु . २५०/- |
| १७ ) शि . म . परांजपे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | रु . २५०/- |
| १८ ) लोकहितवादी देशमुख पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | रु . ७५१/- |
| १९ ) सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | रु . १०००/- |
| २० ) गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई पारि . (ललितेतर वैचारिक) (वर्षाआड) | रु . ४००/- |
| २१ ) गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई पारि . (ललितेतर वैचारिक) (वर्षाआड) | रु . ४००/- |
| २२ ) डॉ . ज . रा . कदम कृषी पारितोषिक(शेतीशी संबंधित पुस्तकाबद्दल) | रु . ७५१/- |
| २३ ) कै . वासंती काळे पारि . (व्यवहारोपयोगी कला पुस्तक) (वर्षाआड) | रु . ७५१/- |

## कार्यवृत्त

दि . १९ जाने .९६: कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे पुरस्कृत चिं . वि .जोशी पारितोषिक ( १९९५ ) यंदा ' हसरा ऋतु ' ले . प्रकाश पाठारे , प्रकाशक अरुण जाखडे , पद्मगंधा प्रकाशन , पुणे व ' चिंमाजी अप्पा पुणेकर ले . अनंत गाडगीळ , प्रकाशक उल्हास लाटकर , अमेय प्रकाशन , पुणे यांना श्री रामदास फुटाणे यांच्या हस्ते देण्यात आले .

दि . २२ जाने .९६ : महाराष्ट्र फौंडेशन ट्रस्टचा पुरस्कार प्राप्त झाल्याबद्दल कॉन्टिनेंटल प्रकाशनाचे संचालक व म . सा . प . चे माजी कोषाध्यक्ष व म . सा . प . चे उपाध्यक्ष गो . म . कुलकर्णी यांचा परिषदेचे अध्यक्ष राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला . श्रीपाद जोशी व डॉ . द . दि . पुंडे यांची गौरवपर भाषणे झाली .

दि . २६ फेब्रु . ९६: कॉन्टिनेंटल प्रकाशन , पुणे पुरस्कृत १९९५ चा कवी कुसुमाग्रज पुरस्कार ' काहिलीचे पाणी ' कवि आनंद जोर्वेकर , अक्षर चळवळ प्रकाशन , मुंबई या काव्यसंग्रहास शांता शेळके यांच्या हस्ते देण्यात आला .

दि . ९ मार्च . ९६: म . सा . प . चे महाराष्ट्र कवी यशवंत पारितोषिक अंजली कुलकर्णी रचित ' मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा ' मानसन्मान प्रकाशन ; पुणे या काव्यसंग्रहास डॉ .

अश्विनी धोंगडे यांच्या हस्ते देण्यात आले .

दि . २९ मार्च ९६ : म . सा . प . चा कै . शं . ना . जोशी पुरस्कार श्री . दिलीप चित्रे यांच्या ' शतकांचा संधिकाल ' पाप्युलर प्रकाशन , मुंबई , या वैचारिक ग्रंथाला डॉ . आनंद यादव यांच्या हस्ते देण्यात आला .

दि . २४ जाने . ९६ : कै . द . रा . वेंद्रे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांचे व्यक्तिमत्त्व व कवित्व या विषयावर डॉ . पंडित आवळीकर यांचे भाषण झाले .

दि . २१ मार्च . ९६ : कै . वि . द . घाटे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ नरेंद्र सिंदकर यांचे ' रशिया - काल , आज व उद्या ' या विषयावर भाषण झाले .

**म . सा . प . ठाणे जिल्हा शाखा**

दि . १८ जाने . ९६ : ६९ व्या अ . भा . म . साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा शांता शेळके यांचा सत्कार झाला . नीलिमा पाळवणकर व प्रवीण दवणे यांची गौरवपर भाषणे झाली .

**म . सा . प . डोंबिवली शाखा**

दि . १७ फेब्रु . ९६ : ज्ञानदेवे रचिला पाया या विषयावर बाळासाहेब भारदे यांचे प्रवचन आयोजित केले होते .

दि . ३० मार्च . ९६ : कै . वा . सी . मर्ढेकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ' मर्ढेकरांची कविता एक नादानुभव ' हा कार्यक्रम वसंत आजगावकर आणि सहकारी . यांनी सादर केला होता . हा कार्यक्रम म . सा . प . डोंबिवली शाखा व ब्राम्हण सभा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आला होता .

**म . सा . प . श्रीरामपूर शाखा**

दि . १० जाने . ९६ : ' ज्ञानेश्वर-जीवन व कार्य ' या विषयावर रवींद्र भट यांचे भाषण झाले . अध्यक्षस्थानी ॲड . रावसाहेब शिंदे होते .

**म . सा . प . धुळे जिल्हा शाखा**

दि . २४ जाने . ९६ : कै . भाऊ देशपांडे यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला . अध्यक्षस्थानी पुरुषोत्तम पाटील होते . स्वागत व प्रास्ताविक भगवान ठाकूर यांनी केले . या निमित्ताने कविसंमेलन झाले .

दि १८ फेब्रु . ९६ : कविवर्य नारायण सुर्वे यांचा काव्यमैफलीचा कार्यक्रम प्राचार्य जे . जी . खैरनार यांच्या अध्यक्षतेखाली झाला . सूत्रसंचालन प्रा . भगवान ठाकूर यांनी केले .

**म . सा . प . उल्हासनगर शाखा**

दि . २४ फेब्रु . ९६ : उल्हासनगर शाखेचा उद्‌घाटन समारंभ सुप्रसिद्ध विनोदी लेखक वि . आ . बुवा यांच्या हस्ते संपन्न झाला . श्री . प्रभाकर संत निमंत्रक म . सा . प . , पुणे यांच्या मार्गदर्शनाखाली कार्यकारी मंडळाची विनविरोध निवड झाली . कार्यक्रमाचे आयोजन कार्यवाह प्र . ना . चौधरी यांनी केले . सूत्रसंचालन सौ . अरगुळकर यांनी केले . अध्यक्षस्थानी श्री . शिवराम परब होते . तर कार्याध्यक्षा सौ . शेकटकर यांनी आभार मानले .

## म . सा . प . सोनई शाखा

दि . ३० सप्टें . ९५ : ' विवेकजागराचा एक वादसंवाद ' हा कार्यक्रम आयोजित केला होता . त्यात श्रीराम लागू व डॉ . नरेंद्र दाभोलकर यांनी भाग घेतला होता . अध्यक्षस्थानी श्री . यशवंतराव पाटील होते . कार्याध्यक्ष वि . वि . आंवरे यांनी स्वागत केले . तर कार्यवाह नामदेवराव देसाई यांनी श्रीराम लागू व डा . दाभोलकर यांची प्रकट मुलाखत घेतली . आण्णा पाटील सोनावणे यांनी आभार मानले .

दि . १७ मार्च ९५ : अहमदनगर जिल्ह्यातील साहित्यिक संघाची बैठक व कविसंमेलन












आयोजित करण्यात आले होते . साहित्यिक संघटनेच्या बैठकीच्या अध्यक्षस्थानी श्री . खोसे होते . कविसंमेलनाचे अध्यक्षस्थानी अशोकराव शिंदे होते . कविसंमेलनात चंद्रकला अरगडे , सुनील महाजन , गिताराम नरवडे , दाते गुरुजी , आण्णा साळवे , यमनाथ आढाव , दिलीप जगदाळे , जमधडे सर , एकनाथ गवळी , विजय नांगरे , एस . बी . शेटे , अशोक औटी , दिलीप शहापूरकर , कु . नांगरे , संजय बोरुडे , बाबासाहेब वांडे , का . बा . शिरसाठ , कैलास पायमोडे , कटारिया , मुळे सर , आदींनी भाग घेतला . वरील दोन्ही कार्यक्रम मुळा सह . साखर कारखाना साईट येथे संपन्न झाले .

## म . सा . प . इस्लामपूर शाखा

दि . १३ व १४ जाने . ९६ : शाखेच्या वतीने ८ वे विभागीय साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले होते . पूर्वतयारीसाठी दि . १० डिसें . ९५ रोजी म . सा . प . पुणे च्या वतीने राजा फडणीस , रत्नाकर कुलकर्णी इस्लामपूरला गेले होते . म . सा . प . पुणे व राजारामबापू ज्ञान प्रबोधिनीच्या सहकार्याने हे संमेलन झाले . संमेलनाचे उद्घाटन आ . जयंतराव पाटील यांनी केले .श्री . शिवाजी सावंत यांची प्रकट मुलाखत प्रा . अविनाश सप्रे यांनी घेतली . परिषदेचे उपाध्यक्ष रामदास फुटाणे यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले . परिषदेच्या वतीने त्यात भगवान ठाकूर , डॉ . शंतनू चिंधडे व डॉ . निशिकांत श्रोत्री यांनी आणि परिसंवादात डॉ . कल्याणी दिवेकर व हरी नरके यांनी भाग घेतला .माजी संमेलनाध्यक्ष द . मा . मिरासदार यांच्या अनुपस्थितीत परिषदेचे कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी ८ व्या विभागीय संमेलनाचे नियोजित अध्यक्ष रावसाहेब कसब यांना अध्यक्षपदाची सूत्रे प्रदान केली . कार्यवाह सु . प्र . कुलकर्णी यांनी परिषदेच्या वतीने आभार मानले .म . सा . प ..पुणे सदस्यांशिवाय , वेगवेगळ्या परिसंवादात व चर्चासत्रात सर्वश्री डॉ . हरिश्चंद्र निर्मळे , डॉ . अच्युत माने , शिवाजीराव कुंभार , डॉ . अनुराधा गुरव , शैला सायनाकर , दीपा देशपांडे यांनी भाग घेतला .तसेच कविसंमेलनात विलास माळी , उद्धव काकडे , राजकुमार कवठेकर ; प्रकाश पठारे , शंकरराव साळुंखे , राजेंद्र टिळे , दीपक स्वामी , मोहन पाटील , चंद्रकांत देशमुख , राम गोसावी , नारायण सुमंत आदी कवींनी भाग घेतला . ८वे विभागीय साहित्य संमेलन यशस्वी करण्यात अध्यक्ष- शामराव पाटील , उपाध्यक्ष- डी . आर . सलगर , सौ . दीपा देशपांडे , कार्याध्यक्ष- शरद भोसले , कोषाध्यक्ष - दशरथ पाटील , कार्यवाह- शिरसट-पाटील , शहानवाज मुल्ला , विलास कुलकर्णी आणि म . सा . प . पुणे सदस्य डॉ : मधुकर हसमनीस यांनी विशेष प्रयत्न आणि परिश्रम घेतले .

रत्नाकर कुलकर्णी
कार्यवाह , म . सा . म . पुणे











महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

# नवती महोत्सवानिमित्त आवाहन

महाराष्ट्र साहित्य परिषद ही महाराष्ट्राची आद्य साहित्य संस्था आहे. इतकेच नव्हे तर ती महाराष्ट्रातल्या इतर सर्व साहित्यसंस्थांची मातृसंस्था आहे. साहित्य परिषदेची स्थापना लोकमान्य टिळकांच्या आशीर्वादाने दि. २७ मे १९०६ रोजी झाली. साहित्य परिषद ही नोंदणीकृत (रजिस्टर्ड) आणि शासनमान्य संस्था असून महाराष्ट्रात आणि महाराष्ट्रावाहेरही तिचे सुमारे पाच हजार आजीव सभासद आहेत. आणि महाराष्ट्रातल्या सर्व प्रमुख शहरांमध्ये तिच्या पंचवीस शाखा आहेत. त्यामुळे केवळ पुण्यातच नव्हे तर महाराष्ट्रात तालुकापातळीपर्यंत परिषदेचे वाङ्मयीन कार्य गेली नव्वद वर्षे अव्याहतपणे चालू आहे.

**परिषदेची वास्तू**

पुण्यातल्या टिळक रस्त्यावरची परिषदेची वास्तू ही महाराष्ट्रातल्या वाङ्मयीन कार्याचे केंद्र आणि पुणे शहरातील एक महत्त्वाचे ठिकाण आहे. औंधचे राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांनी दिलेल्या भूखंडावर परिषदेची सुरेख वास्तू उभी आहे. ती उभारण्यात सर्वश्री वि.द. घाटे, र.लु. जोशी, श्री.म. माटे, न.वि. गाडगीळ यांचा फार मोठा वाटा आहे. वास्तूत या संस्थेचे कार्यालय, माधवराव पटवर्धन सभागृह, चिपळूणकर सभागृहातील वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालय आणि अतिथी गृह आहे.

**वाङ्मयीन आणि सांस्कृतिक कार्यक्रम**

वाङ्मयीन कार्यक्रम हा परिषदेच्या कार्याचा गाभा आहे. पटवर्धन सभागृहात वर्षभरात पन्नासपेक्षा अधिक व साहित्यिक-सांस्कृतिक कार्यक्रम परिषदेतर्फे केले जातात. त्यात महाराष्ट्रातील, देशातील तसेच परदेशातील नामवंत साहित्यिकांचा सहभाग असतो. स्मृतिदिन, व्याख्यानमाला, चर्चा, परिसंवाद, कविसंमेलने, मुलाखती, मेळावे अशा विविध प्रकारच्या वाङ्मयीन कार्यक्रमांनी परिषदेचे सभागृह नित्य गजबजलेले असते. दरवर्षी दिनांक २७ मे रोजी साजरा होणारा परिषदेचा वर्धापनदिन समारंभ हा पुण्याच्या आणि परगावच्या साहित्यप्रेमी रसिकांना आकर्षित करणारा देखणा वाङ्मयीन सोहळा असतो.

**वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालय**

वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय हे परिषदेचे भूषण आहे. ग्रंथालयात सुमारे

४० ,००० जुने-नवे ग्रंथ , दुर्मिळ नियतकालिकांचे बांधीव अंक आणि सर्व प्रकारचे कोश व संदर्भ ग्रंथ आहेत . सुमारे बाराशे वर्गणीदार सदस्य आणि अनेक मान्यवर संशोधक व अभ्यासक ग्रंथालयाचा प्रत्यही लाभ घेत असतात .

**ग्रंथप्रकाशन**

केवळ ग्रंथालय आणि ग्रंथसंग्रहच नव्हे तर सातत्याने मौलिक ग्रंथांचे प्रकाशन हे परिषदचे एक महत्त्वाचे कार्य आहे . शुद्धलेखन नियमावली , शास्त्रीय परिभाषा कोश , संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती , भाषाः अंतःसूत्र आणि व्यवहार , उदयोन्मुख कवींचा 'उमलते अंकुर' हा कवितासंग्रह यासारखे अनेक उत्कृष्ट ग्रंथ परिषदेने प्रकाशित केले आहेत . याशिवाय तीन खंडांतील 'भाषा व साहित्य' संशोधन आणि आरंभापासून १९५० पर्यंतचा मराठी वाङमयाचा पाच हजार पृष्ठांचा सहा खंडातील इतिहास प्रकाशित करून परिषदेने बहुमोल कार्य केले आहे .

**पारितोषिके**

साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी विविध वाङमयप्रकारांतील उत्कृष्ट पुस्तकांना दिली जाणारी सुमारे ४० ग्रंथ पारितोषिके ही अतिशय प्रतिष्ठेची मानली जातात . सर्व वाङ्मयप्रकारातील पुस्तकांत या प्रकारे प्रतिष्ठेची पारितोषिके देणारी महाराष्ट्र शासनाशिवाय अन्य दुसरी संस्था नाही . आणि ही पारितोषिके दरवर्षी नियमितपणे आणि वेळेवर देणारी तर साहित्य परिषद ही एकमेव संस्था आहे .

ग्रंथ पारितोषिकांशिवाय दरवर्षी परिषदेच्या वर्धापनदिनाच्या समारंभात एका ज्येष्ठ साहित्यिकाला रु . ५०००/- चा ' साहित्य परिषद पुरस्कार ' आणि ज्येष्ठ वाङमयीन कार्यकर्त्यास रु . १०००/- चा 'भीमराव कुलकर्णी' पुरस्कार देऊन गौरव केला जातो .

**साहित्यिक साहाय्यनिधी**

अपंग , वृद्ध आणि निराधार अशा साहित्यिकांना दरमहा मानधन देण्याची साहित्य परिषदेची ही एक अपूर्व योजना आहे . यासाठी परिषदेने अडीच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविला असून या निधीच्या व्याजातून दरवर्षी एका योग्य साहित्यिकाला सन्मानपूर्वक मानधन दरमहा आजन्म देण्यात येते . अनेक गरजू साहित्यिकांना या योजनेचा लाभ आतापर्यंत मिळालेला आहे .

**मराठीच्या परीक्षा**

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अध्ययनाच्या प्रसारासाठी १९३८ सालापासून साहित्य परिषद मराठीच्या विविध स्तरावरील परीक्षांचे आयोजन करीत आहे . या परीक्षांसाठी परिषदेने महाराष्ट्रात ठिकठिकाणी केंद्रे स्थापन केली असून प्रथमा , प्रवेश , प्राज्ञ , विशारद या परीक्षांचा आताषर्यंत हजारो विद्यार्थी -विद्यार्थिनींना फायदा झालेला आहे .

**विभागीय साहित्य संमेलने**

ग्रामीण भागात साहित्याचा प्रसार व्हावा आणि साहित्याची अभिरुची निर्माण व्हावी यासाठी साहित्य परिषद दरवर्षी तालुक्याच्या ठिकाणी विभागीय संमेलने भरवत असते . या संमेलनाचे संयोजन साहित्य परिषदेच्या शाखांतर्फे करण्यात येते अशी संमेलने आतापर्यंत परिषदेने यशस्वीरीत्या आयोजित केली आहेत .

**'नवती महोत्सव'**

**आणि त्या निमित्ताने आयोजिलेले संकल्प**

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या सर्वांगीण अभिवृद्धीसाठी ग्रंथनिर्मितीपासून ते ग्रंथ पारितोषिकांपर्यंत सर्व प्रकारचे सर्जनशील, विधायक आणि संघटनात्मक वाङ्मयीन कार्य अखंडपणे करणारी साहित्य परिषद आता शताब्दीकडे वाटचाल करीत आहे. येत्या २७ मे १९९६ रोजी साहित्य परिषदेला नव्वद वर्षे पूर्ण होत असून, परिषदेचा नवती महोत्सव भव्य प्रमाणात साजरा होणारा आहे. या महोत्सवाच्या निमित्ताने परिषदेचे कार्य अधिक कार्यक्षम, अधिक व्यापक आणि अधिक जोमाने होण्यासाठी परिषदेने पुढील संकल्प केले आहेत.

**भव्य, सुसज्ज इमारत**

वाढती सभासदसंख्या, विविध प्रकारचे उपक्रम आणि कार्यक्रम यासाठी परिषदेला किमान पाच-सहा मजली सुसज्ज इमारतीची अतिशय गरज आहे. गोंगाटाचा त्रास होणार नाही असे मोठे वातानुकूलित सभागृह, ग्रंथालय, संशोधन विभाग, परीक्षा विभाग, कार्यालय, अतिथी निवास, बालविभाग, महिलाविभाग इत्यादींसाठी सर्व सुविधायुक्त इमारत बांधण्याची परिषदेची योजना आहे.

**मराठी वाङ्मयाचा इतिहास**

आरंभापासून ते १९५० पर्यंतचा मराठी वाङ्मयाचा इतिहास सहा खंडात परिषदेने प्रसिद्ध केला आहे. १९५० पासून पुढचा अद्यावत मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा सातवा खंड सिद्ध करण्याचे परिषदेचे ठरवले आहे. तसेच अमराठी वाचकांसाठी मराठी वाङ्मयाचा संपूर्ण इतिहास इंग्रजीत व हिंदीत तयार करण्याचा अपूर्व प्रकल्प परिषदेने हाती घेतला आहे.

**अक्षरवाङ्मय योजना**

अक्षर वाङ्मयात गणली जाणारी मराठीतील १०० उत्कृष्ट पुस्तके केवळ हजार रुपयात मराठी वाचकांना देण्याची अभिनव योजना परिषदेने आखली आहे. या महत्त्वाकांक्षी योजनेस मूर्त स्वरूप द्यायचे आहे.

**संदर्भ ग्रंथांचे प्रकाशन**

परिषदेने यापूर्वी प्रकाशित केलेल्या अनेक संदर्भ ग्रंथांच्या आवृत्त्या संपल्या आहेत. या ग्रंथांना सतत मागणी असल्यामुळे त्यांच्या नव्या आवृत्त्यांचे प्रकाशन परिषदेस करायचे आहे.

**साहित्यिक साहाय्यनिधी**

साहित्य परिषदेने अडीच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमवला आहे. परंतु जास्तीत जास्त गरजू साहित्यिकांना मानधन देता यावे या उद्देशाने आणखी दहा लाख रुपयांचा हा निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे.

**हे सर्व संकल्प**
**सिद्धीस नेण्यासाठी साहित्यप्रेमींनी**
**अर्थसहाय्य करावे**
**असे**
**आवाहन आहे!**



अनुक्रमणिका

## नवती महोत्सवानिमित्त आवाहन

सोबतच्या पत्रकातील सर्व संकल्पयोजना व उपक्रम
प्रत्यक्षात आणण्यासाठी किमान एक कोटी रुपयांचा निधी
उभारावा लागेल
हे लक्ष्य साध्य करण्यासाठी
या आद्य व ज्येष्ठ
साहित्य संस्थेस सभासद बंधु-भगिनी आणि
साहित्यप्रेमी रसिक यांनी उदारपणे अर्थसाहाय्य करावे
अशी विनंती आहे
या निधीसाठी अर्थसाहाय्य करणाऱ्यांना
प्राप्तीकर सवलत संदर्भात '८० जी' या प्रमाणपत्राचा
लाभ मिळणार आहे.
देणगीचा धनादेश 'महाराष्ट्र साहित्य परिषद,पुणे'
या नावाने पाठवावा, ही विनंती.

**आपले**

राजेंद्र वनहट्टी
अध्यक्ष

गो. म. कुलकर्णी
रामदास फुटाणे
शिवाजी सावंत
उपाध्यक्ष

गं. ना. जोगळेकर
कार्याध्यक्ष

ना. गो. जोशी
कोषाध्यक्ष

राजा फडणीस
निमंत्रक
निधी समिती

कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, सु. प्र. कुलकर्णी
कार्यवाह

सर्जेराव घोरपडे, म. श्री. दीक्षित, एम. आर. परांजपे
विश्वस्त

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
दूरध्वनी - ४७५९६३

